# आदरणीय प्रेषित

# मुहम्मद (स.)

# यांचे दहा सोबती


❋ लेखक ❋

**तालिब हाशमी**

❋ अनुवादक ❋

**सय्यद ज़ाकिर अली**

# अनुक्रमणिका


| | |
|---|---|
| आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले, | ४ |
| प्रेषितसोबत्यांचा महिमा | ६ |
| इस्लामी विधिज्ञ माननीय अब्दुल्लाह बिन उमर(र.) | २९ |
| माननीय अब्दुल्लाह बिन अब्बास (र.) दिव्य कुरआनाचे प्रवक्ते | ४२ |
| माननीय अब्दुलाह बिन जुबैर (र.) | ६३ |
| माननीय खालिद बिन वलीद (र.) 'सैफुल्लाह' | ७१ |
| माननीय अबू हुरैरा दौसी (र.) | ९३ |
| माननीय अमरु बिन आस (र.) - इजिप्तजेते | ९९ |
| माननीय झैद बिन साबित (र.) अन्सारी | १०९ |
| माननीय अम्मार बिन यासिर तय्यबुल मुतय्यिब (र.) | ११३ |
| माननीय हस्सान बिन साबित अन्सारी (र.) इस्लामी कवि | ११७ |
| माननीय नोअमान बिन बशीर अन्सारी (र.) | १२१ |

*“अल्लाह, असीम दयावंत व कृपावंतच्या नावाने”*

## आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले,

“लोकहो ! माझ्या (मृत्यू) पश्चात माझ्या सोबत्यांना टीकेचे लक्ष्य बनवू नका. (लक्षात ठेवा !) ज्यांनी माझ्या सोबत्यांवर प्रेम केले, त्यांनी हे प्रेम माझ्यावर असलेल्या प्रेमाखातर केले. तसेच ज्यांनी त्यांचा द्वेष केला, त्यांनी माझाच द्वेष केला. माझा द्वेष करणारेच माझ्या सोबत्यांचा द्वेष करतात. प्रत्यक्षपणे माझा द्वेष न करता माझ्या सोबत्यांच्या द्वेषांच्या पडद्याआड ते माझा द्वेष करतात. (लक्षात ठेवा !) ज्यांनी त्यांना त्रास दिला, त्यांनी अप्रत्यक्षरीत्या मलाच त्रास दिला आणि मग ज्यांनी मला त्रास दिला त्यांनी जणू ईश्वरालाच त्रास दिला आणि ईश्वरास त्रास देणाऱ्यास लवकरच जाब विचारण्यात येईल.

म्हणून लोकहो! माझ्या सोबत्यांना टीकेचे लक्ष्य बनवून ईश्वराची नाराजी ओढवू नका. ईश्वराच्या नाराजीचे भय बाळगा.

(कथन : माननीय अब्दुल्लाह बिन मुग़फल जामेअ - तिर्मिज़ी)

# प्रेषितसोबत्यांचा महिमा

ज्याप्रमाणे प्रेषित मुहम्मद (स.) यांचे व्यक्तिमत्त्व हे मानवतेच्या विशेष गुणधर्माचे सर्वोच्च शिखर आहे, त्याचप्रमाणे त्यांचे सोबतीसुद्‌धा सद्‌वर्तनाच्या आणि सत्यनिष्ठ भूमिकेच्या एवढ्या उच्चस्थानावर विराजमान आहेत की, इतर सर्व प्रेषितांचा अपवाद वगळता त्यांच्याहून महान व्यक्ती आजपर्यंत जगाने कधीच पाहिली नाही व पाहणारही नाही. या प्रेषितसोबत्यांना इस्लाम स्वीकारण्याच्या स्थितीमध्ये आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांना आपल्या डोळ्यांनी पाहण्याचे सौभाग्य प्राप्त झाले. ते जीवनमार्गातील अत्यंत प्रखर कांतिमय नक्षत्र असून त्यांची सत्यनिष्ठा, पवित्र अंत:करण, अनामतदारी, त्याग, बंधुत्व, न्याय आणि समतेचा प्रखर प्रकाश आजसुद्धा आपल्या कर्ममार्गासाठी मार्गदर्शक सिद्‌ध होतो. त्यांनी संस्कृती व शिष्टाचाराचे प्रमाण दिले. राज्यशास्त्र व अर्थशस्त्राचे आदर्श मांडले. मार्गभ्रष्टतेच्या आणि थोतांड, कर्मकांड आणि अंधश्रद्धांच्या अत्याचारी जोखडांतून मानवजात मुक्त केली. एकेश्वराच्या धर्मप्रस्थापनेसाठी त्यांनी आपले प्राण, संपत्ती, संतती आणि गरज पडेल त्या गोष्टीची आहुती दिली.

आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांनी एकदा लोकांना संबोधित करून म्हटले, "तुमच्यापैकी कोणताही माणूस तोपर्यंत श्रद्धावंत होऊ शकत नाही, जोपर्यंत त्यास माता-पिता, संतती आणि इतर सर्वांपेक्षा जास्त प्रेम माझ्यावर नसेल." अर्थात आपल्या माता पिता, संतती आणि इतर सर्वांवर असणाऱ्या प्रेमापेक्षाही जास्त प्रेम आदरणीय प्रेषितांवर असावे, तरच तो श्रद्धावंत असू शकतो. आदरणीय प्रेषितांनी घालून दिलेले हे प्रमाण आणि मापदंड त्यांच्या सोबत्यांनी आपल्या आचरणाद्वारे सिद्ध केले. हे सर्व इतिहासात केवळ आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या सोबत्यांनाच लाभले. या प्रेषितसोबत्यांनी सत्यमार्गात ज्या भयानक आणि कष्टदायक परिस्थितींचा सामना केला, त्याची ऐतिहासिक उदाहरणे डोळ्यांसमोर आल्यास मानवी जीवाचा थरकाप उडतो. आत्मा असीम वेदनांनी कळवळतो. सत्याचे दिवे ज्वलंत ठेवण्यासाठी आपल्या काळजाचे रक्त ओतणाऱ्या या लोकांची शानच काही वेगळी होती. सत्यधर्माच्या अर्थात इस्लामच्या प्रचार व प्रसारासाठी आणि सत्याचा झेंडा उंचावण्यासाठी त्यांनी जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रात एवढे मोठे योगदान दिले व आपले सर्वस्व पणाला लावले की, या बाबतीत त्यांची सामुदायिक व व्यक्तिगत भूमिका जग कायम असेपर्यंत संपूर्ण

प्रचारक व प्रसारकांसाठी मार्गद्वीप सिद्ध होईल. या पवित्रस्वभावी मानवांनी ईशप्रसन्नतेकरिता माता-पित्यांना सोडले, नातलगांपासून विभक्त झाले. कुटुंब, परिवार आणि कबिल्यांची व मातृभूमीचादेखील त्याग केला. उपासमार सहन केली. प्रत्येक तऱ्हेच्या शारीरिक यातना सहन केल्या. एवढेच नव्हे तर गरज पडताच सत्यमार्गात आपल्या प्राणांचे बलिदान सादर केले. हे सर्वकाही त्यांनी केवळ आदरणीय प्रेषितांच्या जीवनातच नव्हे, तर त्यांच्या मृत्यूपश्चातसुद्धा ज्या कळकळीने आणि प्रामाणिकतेने धर्माची अथक सेवा आणि संरक्षण केले, या गोष्टींचा सहर्ष स्वीकार करणे आपल्या श्रद्धेची मागणी व कसोटी आहे. या पवित्र जणांचे जगवासियांवर असीम उपकार आहेत आणि हे उपकार आपण आजीवन फेडू शकत नाही. आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांच्यावर जीव ओवाळणाऱ्या सोबत्यांसारखे इतर कोणत्याच प्रेषितांना असे सोबती लाभले नाहीत. वास्तविकता अशी आहे की, आदरणीय प्रेषितांचा प्रत्येक सोबती हा दिव्यबोध आहे, त्यांच्याचमार्फत, आपल्यापर्यंत ईश्वरीय ग्रंथ आणि प्रेषितांच्या पवित्र जीवनचरित्राचे ज्ञान पोहोचले.

या सोबत्यांची त्यागभावना आणि आत्मसमर्पितता ईश्वराला इतकी आवडली की, ईश्वराने स्वत: त्यांच्या या गुणधर्मांचा दिव्य कुरबत्यांचे तीन गुणधर्म स्पष्ट करण्यात आले आहेत. सत्यविरोधकांविरुद्ध कठोर आहेत आणि आपसांमध्ये खूप प्रेमळ आणि कृपाळू आहेत. ते ईश्वराची खूप उपासना करतात त्यांच्या सजद्यांच्या (ईश्वरासमोर नतमस्तक होण्याच्या) खुणा त्यांच्या चेहऱ्यावर स्पष्ट दिसतात.

ईशद्रोही अथवा सत्यविरोधक लोकांशी कठोर असण्याचा अर्थ असा मुळीच नाही की, ते ईशद्रोह्यांचे वैरी आणि शत्रू आहेत. याचा अर्थ असा आहे की, ते ईशद्रोह्यांच्या विरोधात एखाद्या पर्वताप्रमाणे धैर्याने टिकतात. कोणत्याही प्रकारच्या दबाव व धमक्यांना बळी पडून ते सत्यमार्ग सोडत नाही व ते आपल्या मार्गदर्शक असलेल्या प्रेषितांच्या समर्थनार्थ आपल्या प्राण, संपत्ती आणि सर्वस्वाची बाजी लावतात.

आपसात दयाळू असण्याचा अर्थ मुळात असा आहे की, श्रद्धावंत हे एकदुसऱ्यांचे बंधू असल्याने ते एकदुसऱ्यांच्या सुख-दुःखात सहभागी होतात. एकदुसऱ्यांना सलाम करतात, अर्थात शुभचिंतनास्तव प्रार्थना करतात. चांगल्या आणि गोड वाणीने संवाद साधतात. कोणत्याही कार्यासाठी आपसात सल्लामसलत करतात आणि एकदुसऱ्यांना पूर्णपणे सहकार्य करतात. ते आपसात कोणालाही किंचितही त्रास देत नाहीत, रक्तपात करीत नाहीत. निर्दयीपणा, अन्याय, अत्याचार, बदल्याची भावना, गैरसमज, वचनभंग, निंदा, आरोप, थट्टामस्करी, द्वेष, मत्सर, कलह, उपद्रव वगैरेसारख्या बाबींना जवळ फटकूही देत नाहीत. बंधुत्वाचे असाधारण उदाहरण हे देता

येईल की, जेव्हा माननीय अब्दुर्रहमान बिन औफ (र.) यांनी मक्का शहर त्याग करून मदीना शहराकडे स्थलांतर केले, तेव्हा त्यांनी मदीना शहरी माननीय साअद बिन रबीअ (र.) यांच्या घरी वास्तव्य केले. माननीय साअद (र.) यांना दोन पत्नी होत्या. त्यांनी माननीय अब्दुर्रहमान (र.) यांना सांगितले की, ''माझ्या संपूर्ण संपत्तीचे दोन भाग करून तिचा निम्मा भाग आपण घ्यावा.''

माननीय अब्दुर्रहमान (र.) यांच्या अंत:करणातही आपले परममित्र माननीय साअद (र.) यांच्याविषयी अपार सहानुभूती होती. म्हणून त्यांनी म्हटले की, ''मी आपल्या बंधूस इतके कष्ट देऊ शकत नाही.'' त्यांनी त्यांचे आभार मानले आणि म्हणाले की, ''ईश्वर तुमच्या संपत्ती आणि संततीमध्ये वृद्धी देवो आणि तुमच्यावर कृपांचा वर्षाव करो. मला कशाचीही गरज नाही. मला केवळ बाजाराची वाट दाखववावी. मी व्यापार करू इच्छितो.''

नमाजीमुळे ईशपारणतेच्या उच्चनीतिमत्तेच्या, सद्वर्तनाच्या आणि नम्रतेच्या खुणा त्यांच्या चेहऱ्यावर स्पष्टपणे दिसतात. एखाद्या गर्विष्ठ घमेंडीखोर आणि निर्लज्जजणांचे चेहरे किती विचित्र आणि विद्रुप दिसतात! परंतु शुद्ध आचरण आणि निर्मळ अंत:करणाच्या लोकांच्या चेहऱ्यावर नेहमीच कांति दिसत असते. दिव्य कुरआनाने प्रेषितसोबत्यांची हीच शान स्पष्ट केली आहे. या निर्मळ आणि कांतिमान चेहऱ्यांच्या बाबतीत इमाम मालिक (र.) यांनी म्हटले की, जेव्हा प्रेषितसोबत्यांचे लष्कर सीरियात दाखल झाले, तेव्हा तेथील ख्रिश्चनधर्मिय लोक म्हणू लागले की, 'येशू ख्रिस्तांच्या सोबत्यांची जी थोरवी आम्ही प्राचीन ग्रंथांत वाचली आहे ते सद्‌गुण' आम्ही या लोकांत पाहात आहोत.

'सूरह-ए-अन्फाल' मध्ये प्रेषितसोबत्यांची गुणवैशिष्ट्ये अशा शब्दांत वर्णन करण्यात आली आहेत की,

''श्रद्धावंत तेच लोक आहेत की, जे ईश्वराचे नाव ऐकताच त्यांच्या भयाने त्यांची अंत:करणे हादरतात आणि त्यांच्यासमोर ईशवाणी वाचताच त्यांच्यात ईश्वरावरील व प्रेषित आणि परलोकांवरील श्रद्धात्मक विश्वास वृद्धिंगत होतो आणि ते आपल्या पालनकर्ता ईश्वरावर विश्वास ठेवतात. तसेच नमाज कायम करणारे व आम्ही (ईश्वराने) प्रदान केलेल्या उपजीविकेतून ईशमार्गात खर्च करणारेच खरे श्रद्धावंत आहेत. त्यांच्याकरिता त्यांच्या पालनकर्त्यांजवळ विविध दर्जे आहेत. शिवाय मोक्ष आणि प्रतिष्ठित उपजीविकासुद्धा आहेच.'' (सूरह-ए-अल अनफाल : २,३,४)

'सूरह-ए-तौबा' मध्ये आहे की,

"श्रद्धावंत पुरुष आणि श्रद्धावंत स्त्रियां एकदुसऱ्यांचे सहकारी आहेत. ते एक दुसऱ्यांना चांगुलपणाची शिकवण देतात आणि वाईट कर्मांपासून रोखतात. तसेच नमाज कायम करतात व जकात देतात आणि प्रेषितांच्या आदेशांचे पालन करतात. हेच लोक आहेत की, ज्यांच्यावर ईश्वर दया व कृपा करेल. निश्चितच ईश्वर महान, सर्व काही जाणणारा आणि योग्य निर्णय घेणारा आहे." (सूरह-ए-तौबा : ७१)

जणू प्रेषितसोबत्यांची शान व वैशिष्ट्य हे आहे की, आपल्या कर्मांचा जाब विचारणाऱ्या ईश्वराच्या नाराजीमुळे त्यांच्या आत्म्यांचा थरकाप उडत असतो व त्यांच्यासमोर ईशवाणी अर्थात दिव्य कुरआन वाचण्यात आल्यास त्यांची श्रद्धा दृढ होत असते. या उलट ईशद्रोही ईश्वरीय ग्रंथाची खिल्ली उडवीत असत. प्रेषितसोबती आपल्या निर्माणकर्ता ईश्वरावरच पूर्ण विश्वास ठेवत असतात. नमाज वेळेवर अदा करीत असतात आणि आपल्या वैध कमाईचा मोठा भाग ईशमार्गात खर्च करीत असतात. एकदुसऱ्यांची प्राणापलीकडे मदत करीत असतात. सत्य आणि चांगुलपणाची प्रभावी शिकवण देत असतात. वाईट कर्मांपासून रोखतात. नमाज कायम करतात व जकात देत असतात. ('जकात' म्हणजे आपल्या कमाईचा अडीच टक्के भाग वार्षिक प्रमाणे दान करणे) तसेच ईश्वर आणि त्याच्या प्रेषिताच्या मार्गदर्शनावरच जीवन जगतात. 'सूरह-ए-तौबा' मध्येच आणखीन एकेठिकाणी 'मुहाजिरीन' (धर्मरक्षणार्थ भूमी त्यागणारे वा स्थलांतर करणारे) आणि अन्सार (धर्मरक्षणार्थ स्थलांतर करणाऱ्यांना आश्रय देणारे अर्थात मदीनावासी) यांना ईश्वराने आपली प्रसन्नतेचा शुभसंदेश व खूशखबर अशा शब्दांत दिली आहे की,

"ते मुहाजिर (स्थलांतरित) व अन्सार सर्वप्रथम श्रद्धेच्या हाकेला प्रतिसाद दिला व तसेच जे प्रांजळपणे त्यांच्या मागे आले, ईश्वर त्यांच्याशी प्रसन्न झाला व ते ईश्वराशी प्रसन्न झाले. ईश्वराने त्यांच्यासाठी (स्वर्गात) अशा बागा उपलब्ध केल्या आहेत की, ज्या खालून खळखळणारे कालवे वाहत असतील व ते त्या बागांमध्ये सदैव राहतील, हेच महान यश आहे." (सूरह-ए-तौबा : १००)

अशाच अर्थाचा एक मजकूर दिव्य कुरआनात 'सूरह-ए-अनफ़ाल' मध्येसुद्धा आहे.

"ज्या लोकांनी श्रद्धा बाळगली आणि ज्यांनी ईश्वराच्या मार्गात (धर्म रक्षणार्थ) आपले घरदार त्यागले आणि सत्य-धर्माखातर आटोकाट प्रयत्न केले व ज्यांनी त्यांना आश्रय दिला (व भरपूर मदत केली) तेच खरे श्रद्धावंत आहेत. त्यांच्या चुका माफ करण्यात आल्या आहेत. तसेच ज्यांनी त्यांच्यानंतर श्रद्धावंत आणि 'हिजरत' (स्थलांतर) करून आले व तुमच्याबरोबर ईशमार्गात प्रयत्न केले, तेदेखील तुमच्यातच सामील आहेत." (सूरह-ए-अनफ़ाल : ७४ : ७५)

या आयतींमध्ये ईश्वराने विशेषकरून त्या मुहाजिरीन आणि अन्सारचा उल्लेख केला आहे, ज्यांनी इस्लामचा स्वीकार करण्यात पुढाकार घेतला व त्यांना ईश्वराने 'अस्साबिकूनल अव्वलून' चा शानदार व महान पुरस्कार प्रदान केला.

'अस्साबिकूनल अव्वलून' म्हणजे इस्लामच्या सुरुवातीस हा दर्जा देण्यात आला की, केवळ त्यांना नव्हे तर त्यांच्या मार्गदर्शनावर जीवन व्यतीत करणाऱ्यांनादेखील ईश्वराने स्वर्ग प्रदान करण्याची खूशखबर दिली. मुहाजिरीन सोबत्यांच्यापैकी 'साबिक़ीन' व 'अव्वलीन' ते सोबती आहेत की, ज्यांनी आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या प्रेषितत्वाच्या प्रारंभीकाळात इस्लामविरोधी शक्तींचे जुलूम व अत्याचार सहन करून इस्लामचा स्वीकार केला, इस्लामखातर आपले सर्वस्व पणाला लावले, आपले घरदार आणि मायभूमी त्यागून बेघर झाले. त्यांच्या याच असीम त्यागामुळे त्यांना ईशदरबारी हा एवढा सन्मानित दर्जा मिळाला आणि ईश्वराच्या दृष्टीत ते सच्चे मोमीन अर्थात कसोटीवर पारखलेले श्रद्धावंत आणि स्वर्गाचे हक्कदार ठरले. त्यांच्या अद्वीतीय त्याग आणि आहुतीची काही उदाहरणे आपण पाहू या.

आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) हे प्रेषितत्वाच्या सुरुवातीच्या तीन वर्षांपर्यंत अत्यंत गुप्तपणे इस्लामचा प्रसार व प्रचार करीत होते. प्रेषितत्वाच्या चौथ्या वर्षीच्या सुरुवातीस ईश्वराकडून प्रेषितांवर आदेश अवतरित झाला की,

''ईश्वराचे आदेश स्पष्टपणे आणि सड़ेतोड़पणे लोकांना सांगा व अनेकेश्वरवाद्यांची मुळीच पर्वा करू नका.'' (संदर्भः दिव्य कुरआन)

या ईश्वरीय आदेशानुसार आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांनी उघडपणे कोणालाही न जुमानता इस्लामचा प्रचार व प्रसार सुरू केला. परिणामी इस्लामविरोधी अनेकेश्वरवाद्यांच्या मनात धुमसत असलेला इस्लामद्वेष ज्वालामुखीसारखा उफाळून आला. इस्लामचा स्वीकार करणाऱ्यांवर त्यांनी इतके क्रूर अत्याचार सुरु केले की, या अत्याचारांच्या केवळ कल्पनेनेच आत्म्याचा थरकाप उड़तो.

माननीय बिलाल (र.) हे एका अनेकेश्वरवादी असलेल्या धनाढ्य 'उमय्या बिन खल्फ़'चे गुलाम होते. इस्लामचे आवाहन ऐकताच निर्मळ अंतःकरणाने इस्लामचा स्वीकार केला. त्यांच्या मालक उमैयाला त्यांच्या इस्लाम स्वीकारण्याची वार्ता मिळताच त्याचा संताप अनावर झाला. त्याने इस्लाम स्वीकारलेल्या आपल्या गुलाम असलेल्या माननीय बिलाल (र.) याना छळण्याच्या नवनवीन क्लृप्त्या शोधून काढल्या. तो बिलाल यांच्या गळ्यात दोरखंड टाकून टवाळ मुलांच्या हाती देत असे आणि टवाळखोर मुले त्यांना मक्का शहराबाहेरील उन्हाने तापलेल्या पर्वतांवरून ओढत असत. मग अतिशय तप्त असलेल्या वाळूवर त्यांना छातीवर झोपवून त्यांच्या पाठीवर

जड वजनाच्या शिला ठेवत असे. प्रेषित दरबारातील कवीवर्य माननीय 'हस्सान बिन साबित अन्सारी (र.)' कथन करतात की, ''मी एकदा मक्का शहरी गेलो होतो. तेथे मी पाहिले की, माननीय बिलाल यांच्या गळ्यात दोरी अडकवून तेथील टवाळ मुले त्यांना ओढत व फरफटत होती आणि माननीय बिलाल (र.) यांच्या मुखी हे वाक्य होते की, ''मी लात, उज़्ज़ा, हुबल, असाफ़, नाइला आणि बबाना (तत्कालीन देवी-देवतांची नावे) यांना उपास्य स्वीकार करणार नाही!''

कधी कधी उमय्या बिन खल्फ़ हा स्वत: माननीय बिलाल (र.) यांना तेथील अतिउष्ण असलेल्या 'हर्रा' नावाच्या पर्वतावर घेऊन जाऊन त्यांना झोपवायचा आणि त्यांच्या पाठीवर एक वजनदार शिला ठेवायचा, कारण माननीय बिलाल (र.) यांना हलता व डुलताही येऊ नये. अशा प्रकारे छळ करून तो त्यांना बजावत असे की,

''मुहम्मद (स.) चे अनुकरण करणे सोडून दे! लात आणि उज़्ज़ाची आराधना व पूजा कर! अन्यथा असाच पडून राहशील!''

परंतु माननीय बिलाल (र.) यांच्या मुखी केवळ ''अहद! अहद!!'' हेच शब्द होते. अर्थात ईश्वर एकच आहे!

कधी कधी 'जमूह' परिवाराची टवाळ तरूण मुले त्यांना बेदम मारत असत. दिवसा त्यांचे कपडे काढून त्यांना लोखंडी चिलखत परिधान करायला लावून आणि हातपाय बांधून अरबस्तानाच्या रखरखत्या उन्हात शहराबाहेर फेकून देत असत आणि रात्री फटके देत असत. परंतु एवढे अत्याचार सहन करूनदेखील त्यांनी सत्यधर्मास पाठ दाखविली नाही.

माननीय अबू फ़कीहा यसाराज़वी (र.) हेसुद्धा उमैया बिन खल्फ़ याचे गुलाम होते. त्यांनीदेखील इस्लाम स्वीकार केला. त्यांच्यावरसुद्धा उमैया अशाच प्रकारे अतोनात अत्याचार करायचा. एकदा त्याने माननीय अबू फ़कीहा (र.) यांच्या गळ्यात दोर टाकून त्यांना खेचत शहराबाहेर नेऊन खूप बदडले आणि त्यांचा गळा दाबला. अबू फ़कीहा (र.) यांची जीभ बाहेर आली. उमैया त्यांना मृत समजून सोडून आला. योगायोगाने 'माननीय अबू बकर (र.)' हे तिकडून जात असताना 'अबू फ़कीहा (र.)' यांना अशा अर्धमेल्या अवस्थेत पाहिले व त्यांना गहिवरून आले. त्यांनी तत्काळ उमैयाकडून 'अबू फकीहा' यांना खरेदी करून स्वतंत्र केले.

त्या काळात गुलाम आणि स्वतंत्र लोक विरोधकांच्या अत्याचारापासून सुरक्षित नव्हते. नाना प्रकारचे अत्याचार थांबता थांबत नव्हते. शेवटी हिजरी सन पूर्वी ७ मध्ये स्थलांतर करून हब्शा (ॲबेसेनिया देश) येथे जाऊन मुक्तीनंतरसुद्धा

अत्याचार न थांबल्याने अबुफकिहा यांनी आश्रय घेतला. सत्यमार्गात संकटे आणि अत्याचार सहन करून करून त्यांचे आरोग्य खूपच बिघडले होते. 'बदर'च्या युद्धाच्या काही काळापूर्वी ते स्वर्गवासी झाले.

मक्का शहरातील एक गर्भश्रीमंत 'सुहैल बिन अमरु' याच्या 'अबू जंदल (र.) आणि अब्दुल्लाह' (र.) या दोन तरूण पुत्रांनी इस्लाम स्वीकारताच त्यांच्या पित्याने आपल्या या दोन्ही मुलांच्या पायात पोलादी बेड्या टाकून कैद केले. ही दोन्ही भावंडे बऱ्याच वर्षांपर्यंत आपल्याच पित्याच्या असह्य कैदेत पडून होती.

यासिर बिन आमेर (र.) 'सुमैया बिन्त खब्बात (र.) आणि त्यांची दोन मुले 'अब्दुल्लाह (र.)' व 'अम्मार (र.)' यांनी इस्लाम स्वीकारण्याचे सौभाग्य मिळविले, तेव्हा त्यांना जिवाचा थरकाप उडविणाऱ्या यातनांना तोंड द्यावे लागले. पाण्यात डुबक्या देऊन, गरम वाळूवर झोपवून तर कधी कोरड्याने फटके देऊन इस्लामचा त्याग करण्यास सांगण्यात येत असे. एके दिवशी आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांनी त्यांना अत्याचार सहन करताना आणि इस्लामखातर कोरड्याचा मार सहन करताना पाहून म्हटले, "हे यासेरच्या परिवारपुत्रांनो! धैर्याने काम करा. निश्चितच तुम्ही स्वर्गाचे हक्कदार आहात!"

इस्लामद्रोह्यांचा प्रमुख अबू जहल याने एके दिवशी इस्लाम स्वीकारलेल्या सुमैया (र.) या महिलेस गुप्तांगावर भाला मारून ठार केले. नंतर एके दिवशी या दुर्भागी माणसाने यासिरपुत्र अब्दुल्लाह (र.) यांचा बाण मारून वध केला. माननीय यासेर (र.) हेसुद्धा आपल्या वृद्धापकाळात यातना सोसून सोसून स्वर्गवासी झाले. माननीय अम्मार (र.) यांनादेखील ठार करण्याचे खूप प्रयत्न झाले. परंतु त्यांना ठार करण्यात इस्लामद्रोह्यांना यश आले नाही.

माननीय जुबैर बिनुल अवाम (र.) यांनी जेव्हा इस्लामचा स्वीकार केला, तेव्हा त्यांचा पालक असलेला चुलता 'नोफ़िल' हा संतापाने अक्षरशः वेडा झाला. 'इब्ने कसीर (र.)' या इतिहासकारांनी लिहिले की, माननीय जुबैर (र.) यांना चटईत बांधून एका खोलीत विस्तव जाळून धूर निर्माण करून तेथे टाकण्यात येई आणि त्यांना बजावण्यात येत असे की, 'इस्लामचा त्याग करून आपल्या पूर्वजांच्या धर्माचा स्वीकार कर!' परंतु माननीय जुबैर (र.) हे आपल्या निश्चयावर अगदी पर्वतासारखे ठाम होते व मुखातून केवळ "मुळीच नाही! मुळीच नाही!! मुळीच नाही!!!" चे शब्द बाहेर पडत असे.

माननीय मुसऐब बिन उमैर (र.) हे अब्दुलदार या अतिशय श्रीमंत असलेल्या परिवाराचे अत्यंत लाडके सुपुत्र होते. मक्का शहरात त्यांच्यासारखा सुशील, देखणा तरूणच नव्हता. ते उच्च पोषाख आणि उच्चप्रतीचे अत्तर वापरत असत. गल्लीतून जाताना संपूर्ण परिसरात त्यांनी लावलेल्या अत्तराचा सुगंध दरवळत असे. ते वापरत असलेल्या

एकेका पोषाखाची किंमत दोनदोनशे दिरहम (सध्याचे जवळपास दोन लाख रुपये) असे. परिवाराशिवाय ते शहरामध्ये सर्वांचेच लाड़के होते. त्यांचा स्वभावदेखील अतिशय प्रेमळ आणि मनमिळाऊ होता. प्रेषितत्वाच्या सुरुवातीच्या काळातच त्यांनी आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या एकेश्वरवादी इस्लाम धर्माचा स्वीकार केला. परिवारजणांना याची वार्ता मिळताच त्यांनी त्यांच्या पायात बेड्या टाकून कैदेत डांबले. तरीदेखील इस्लामवर तठस्थ राहिले. शेवटी त्यांना घरातून हाकलून देण्यात आले आणि हिजरीसन पूर्वी ८ मध्ये प्रेषितांच्या इच्छेने त्यांनी ॲबेसेनिया देशी स्थलांतर केले. उच्च राहणीमान आणि मन मोहून टाकणारे सौंदर्य लाभलेला हा तरुण इस्लामद्रोह्यांच्या अत्याचारांमुळे पार करपून गेला. उच्च पोषाखाच्या ठिकाणी त्यांच्या शरीरावर घोंगडीचा केवळ अर्धा तुकडाच बाकी राहिला. हिजरी सन पूर्व १ मध्ये आदरणीय प्रेषितांनी त्यांना इस्लाम धर्माचे प्रमुख शिक्षक म्हणून मदीना शहरी पाठविले. त्यांनी मोठ्या तन्मयता, धैर्य व निश्चयाने इस्लामचा प्रचार व प्रसार सुरू ठेवला. हिजरी सन ३ मध्ये ओहदच्या युद्धात त्यांनी शत्रूंशी प्राणपणाने झुंज देताना वीरमरण पत्करले. जेव्हा त्यांचा मृतदेह आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांच्यासमोर ठेवण्यात आला तेव्हा प्रेषितांचे अश्रू अनावर झाले. त्यांच्या मृतदेहाजवळ उभे राहून प्रेषितांनी ही आयत पठण केली,

"श्रद्धावंतांपैकी बऱ्याच जणांनी ईश्वरास दिलेले वचन पूर्ण करून दाखविले. काहींनी आपली मुदत पूर्ण केली व काही वेळ येण्याची वाट पाहात आहेत आणि कोणीही आपल्या इराद्यात किंचितही बदल होऊ दिला नाही." (सूरह-ए-अहज़ाब : २३)

यानंतर आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांना खूप गहिवरून आले आणि ते म्हणाले,

"हे मुसऐब ! मी मक्का शहरात तुमच्यासारखा देखणा आणि उंची पोषाख वापरणारा कोणीच पाहिला नव्हता. परंतु आज मी पाहात आहे की, तुमच्या सुंदर केसांवर धूळ साचलेली आहे आणि ते विखुरलेले आहेत. तुमच्या शरीरावर केवळ एकच चादर आहे. मी साक्ष देतो की, तुम्ही लोक अंतिम निवाड्याच्या दिवशी ईश्वरदरबारी हजर व्हाल."

माननीय ख़ब्बाब (र.) यांच्यावरसुद्धा इस्लाम स्वीकारल्याने मनाचा थरकाप उडविणारे अत्याचार करण्यात आले. त्यांना तर जळत्या कोलितांवर झोपवून छातीवर मोठे दगड ठेवण्यात येत असत. आणि कधीकधी जळत्या कोलितांवर झोपवून एक धृष्टपुष्ट माणूस त्यांच्या छातीवर बसविण्यात येत असे. ख़ब्बाब (र.) यांनी मोठ्या धैर्याने या अमानवी यातना भोगल्या. इब्ने साअद (र.) या इतिहासकारांनी लिहिले की,

माननीय खब्बाब (र.) हे एका अत्यंत क्रूर स्त्रीचे गुलाम होते. ती नेहमी त्यांना लोखंडी चिलखत नेसवून मक्का शहरातील अत्यंत उष्ण तापमान असलेल्या उन्हात बांधून ठेवत असे. त्यांच्या डोक्यास तापवून लाल केलेल्या सळईने डाग देत असे. माननीय ख़ब्बाब (र.) यांनी एका दीर्घ मुदतीपर्यंत इस्लामद्रोह्यांचे अत्याचार सहन करता करता एके दिवशी ते प्रेषित दरबारी हजर झाले. त्या वेळी आदरणीय प्रेषित (स.) पवित्र काब्याच्या भिंतीच्या सावलीत पहुडलेले होते. माननीय ख़ब्बाब (र.) म्हणाले, "हे प्रेषिता ! आपण आमच्याकरिता ईश्वरदरबारी आमची अत्याचारांतून मुक्ती होण्यासाठी प्रार्थना का करीत नाहीत !" हे ऐकताच आदरणीय प्रेषित चटकण उठून बसले. त्यांचा चेहरा सहानुभूतीने लाल झाला. ते म्हणाले,

"तुमच्या पूर्वी भूतकाळात असे लोकदेखील होऊन गेले की, त्यांचे शरीर लोखंडी नखांनी ओरबाडले गेले. त्यांच्या शरीरात केवळ हाडे तेवढी सोडण्यात आली. अशा कठोर यातनांमध्येसुद्धा त्यांची सत्यधर्मावरील श्रद्धा गाढ होत गेली. त्यांची डोकी करवतींनी कापण्यात आली. त्यांना उभे चिरून दोन भाग करण्यात आले. तरीसुद्धा त्यांनी धर्म सोडला नाही. ईश्वर या सत्य धर्मास अवश्य यश प्रदान करेल आणि तुम्ही पाहाल की, एकटा प्रवासी येमेनपासून 'हजरमौत' पर्यंतचा (मैलो दूर) प्रवास एकटाच करेल आणि त्यास कशाचीच भीती राहणार नाही."(संदर्भ : बुखारी)

आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांचे संभाषण ऐकून माननीय ख़ब्बाब (र.) यांना प्रेषितांचा आशय समजला आणि गुपचूपपणे निघून गेले. इतिहासकार 'इब्ने यसीर (र.)' यांनी लिहिले की, एकदा माननीय उमर (र.) यांच्या इस्लामी शासनकाळात स्वत: इस्लामी शासक माननीय 'उमर बिन ख़त्ताब (र.)' यांनी माननीय ख़ब्बाब (र.) यांना विचारले की, "इस्लाम स्वीकारल्यावर तुमच्यावर कशा प्रकारचे अत्याचार करण्यात आले?" उत्तरादाखल माननीय खब्बाब (र.) यांनी आपला अंगरखा उचलून आपली पाठ दाखविली. त्यांची पाठ पाहून माननीय उमर (र.) यांना आश्चर्याचा धक्काच बसला. त्यांच्या पाठीवरील त्वचा जळून अतील पांढरीत्वचा दिसत होती. माननीय खब्बाब (र.) म्हणाले, "हे अमीरुल मुअमिनीन ! आगीचे कोलीत जाळण्यात येत असे आणि मला त्यावर उताणे झोपवून माझ्या छातीवर दगड ठेवण्यात येत असे. माझ्या पाठीची त्वचा आणि चरबी वितळून आग विझत असे.

माननीय अबू जर ग़फ़्फ़ारी (र.) यांनी मक्का शहरी येऊन इस्लाम धर्म स्वीकार केला. मक्कावासियांना ही वार्ता मिळताच त्यांनी अबू जर (र.) यांना रक्तबंबाळ होईपर्यंत बेदम चोप दिला. बरे झाले की, माननीय अब्बास (र.) वेळेवर घटनास्थळी पोहोचले आणि त्यांनी अबू जर ग़फ़्फ़ारी (र.) यांचा जीव शत्रूंच्या तावडीतून सोडविला.

माननीय उस्मान बिन मज़ऊन (र.) यांनी इस्लाम स्वीकारला त्या वेळी त्यांचादेखील शारीरिक आणि मानसिक छळ करण्यात आला व शेवटी त्यांना वतनत्याग करण्यास भाग पाडण्यात आले आणि त्यांनी 'ॲबिसीनिया' या देशात आश्रय घेतला.

माननीय अब्दुल्लाह बिन मसऊद (र.) यांना इस्लाम स्वीकारण्यास्तव त्यांचा चेहरा बिघडेपर्यंत मारले गेले. शत्रूंचे अत्याचार वाढत गेले आणि शेवटी त्यांनीदेखील ॲबिसीनियाला जाऊन आश्रय घेतला.

माननीय उस्मान गनी (र.) यांनी इस्लाम स्वीकारला तेव्हा त्यांच्या चुलत्याने त्यांना दोरीने बांधून खूप बेदम चोप दिला. शत्रूंच्या अत्याचारांना वैतागून शेवटी त्यांनी आपल्या पत्नीसह ॲबिसीनीयात आश्रय घेतला.

माननीय तलहा (र.) यांनी इस्लाम स्वीकारला, तेव्हा स्वत: त्यांच्या आईनेच त्यांच्यावर अत्याचार केले. इमाम बुखारी (र.) यांनी 'तारीखुस्सग़ीर' या इतिहास ग्रंथात लिहिले की, मसऊद बिन खराश (र.) यांचे कथन आहे की, बरेचसे लोक एका तरूणास फरफटत घेऊन जात होते आणि एक स्त्री मागून त्यांना रागावत होती. मसऊद बिन खराश (र) यांनी प्रकरणासंबंधी लोकांना विचारले तेव्हा त्यांना कळले की, ही रागावणारी आणि शिव्या देणारी स्त्री तलहा यांची आई आहे. त्यांनी इस्लाम स्वीकारल्यामुळे त्यांना चोप देण्यात येत आहे. अरब जमातीचा सिंह म्हणून ओळखला जाणारा अतिशय क्रूर पहिलावान 'नोफ़िल बिन खवीलद' याला भयंकर संताप चढला. त्याने तय्यीम परिवारातील तलहा (र.) आणि अबू बकर (र.) या दोघांना दोरीने बांधून बेदम मारहान केली. (संदर्भ : अलबदाया वल नहाया)

इब्नेयसीर आणि इमाम हाकिम या इतिहासतज्ञांनी लिहिले आहे की, माननीय तलहा (र.) यांच्या इस्लाम स्वीकृतीची वार्ता त्यांच्या चुलत्यांना आणि थोरल्या भावास मिळताच त्यांनी तलहा (र.) आणि अबू बकर (र.) यांना दोरीने बांधून बेदम चोप दिला की, जेणेकरून त्यांनी इस्लामचा त्याग करावा. परंतु इस्लामद्रोह्यांचे सर्वच अतिरेकी प्रयत्न निष्फळ ठरले आणि जसेजसे त्यांच्यावर अत्याचार होत राहिले, तसेतसे मुस्लिमांची धर्मश्रद्धा बळावत गेली.

माननीय आमिर बिन फ़हीरा (र.) हे माननीय आयशा (र.) यांच्या चुलत भावाचे गुलाम होते. इस्लामचा स्वीकार करताच सर्वच इस्लामद्रोही त्यांच्यावर तुटून पडले. सर्वच प्रकारच्या यातना त्यांना देण्यात आल्या. एके दिवशी माननीय अबू बकर यांनी पाहिले की, इस्लाम विरोधी 'आमिर (र.)' यांना त्यांची दाढी पकडून बेदम मारीत होते व त्यांच्या शरीरात काटे रुतवीत होते. अबू बकर (र.) यांनी त्यांना खरेदी करुन स्वतंत्र केले. नंतर त्यांनी आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांच्याबरोबर स्थलांतर केले.

माननीय इय्याश बिन रबिया (र.), माननीय सलमा बिन हिश्शाम (र.) आणि माननीय वलीद (र.) यांना इस्लाम स्वीकार करण्यासत्व वर्षानुवर्षे कैदेत जीवन कंठावे लागले.

माननीय ज़िन्नीरा (र.) या कुरैश परिवाराच्या दासी होत्या. आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या सेवेत हजर होऊन इस्लामचा स्वीकार केला, तेव्हा इस्लामद्रोह्यांचा प्रमुख अबू जहल यांने त्यांच्यावर आतोनात अत्याचार केले. त्याच्या अत्याचारामुळे ज़िन्नीरा (र.) यांची दृष्टी गेली. इतिहासतज्ञ बिलाज़ुरी (र.) यांनी लिहिले की, अबू जहलच्या अमानवी अत्याचारांमुळे त्यांची दृष्टी हरवून गेली. त्या अंध झाल्या. अबू जहल म्हणाला की, ''लात आणि उज़्ज़ा (तत्कालीन देवी देवता) यांच्याच शापामुळे तुझी दृष्टी हरविली !'' यावर जिन्नीरा (र.) तत्काळ उद्‌गारल्या, ''लात आणि उज्ज़ा हे तर दगडाच्या मूर्ती आहेत. त्यांना तर काहीच समजत नाही. त्यांना हे देखील कळत नाही की, त्यांची कोण पूजा करतो ! स्वतःच कोरून तयार केलेल्या मुर्तींची पूजा करणे किती मूर्खपणा आहे ! माझी परीक्षा घेण्यास्तव माझ्या ईश्वरानेच मला अंध केले ! ईश्वराची इच्छा असल्यास तोच माझी दृष्टी मला परत करील !'' ईश्वराला ज़िन्नीरा (र.) यांचे धैर्य इतके आवडले की, दुसऱ्या दिवसापासूनच त्यांना दिसू लागले. त्यांची दृष्टी पूर्ववत झाली. शेवटी माननीय अबू बकर (र.) यांनी त्यांची गुलामीची रक्कम चुकती करून स्वतंत्र केले. (संदर्भ : इब्ने हिश्शाम)

माननीय लुबैना (र.) या कुरैश कबिल्याच्या अदी परिवाराच्या मौकि़ल शाखेच्या दासी होत्या. प्रेषितत्वाच्या आरंभीच्याकाळात त्यांनी इस्लामचा स्वीकार केला. उमर (र.) यांनीदेखील त्या वेळेपर्यंत इस्लामचा स्वीकार केला नव्हता आणि ते इस्लामचे कट्टर विरोधक होते. माननीय लुबैना (र.) यांच्यावर त्यांनी खूप अत्याचार केले. त्यांना नेहमीच चोप देऊन बजावत असे की, ''इस्लामचा त्याग कर अन्यथा...'' परंतु लुबैना (र.) मार खाता खाता सांगत असे ''मुळीच नाही ! प्राण त्याग करेन परंतु इस्लाम त्यागणार नाही. तुझ्यात जेवढ़ी शक्ती आहे तेवढ़ी पणाला लावून मार ! परंतु तुला मुळीच यश येणार नाही !'' शेवटी माननीय अबू बकर (र.) यांनी त्यांच्या गुलामगिरीच्या रकमेची भरपाई करून त्यांची सुटका केली.

सन्माननीय नहदिया (र.) आणि त्यांची कन्या 'अब्दुद्दार' परिवाराच्या दासी होत्या. या दोघी देखील इस्लामचे निमंत्रण स्वीकारणाऱ्या प्रारंभीच्या लोकांपैकी होत्या. सत्यधर्माच्या समर्थणार्थ त्यांना मक्का शहरातील धनाढ्य असलेला मूर्तीपूजक व इस्लामद्रोही 'असवद बिन अब्दे यगूस' या क्रूर माणसाच्या अत्याचारास बळी पडावे लागले. त्याच्या क्रूर अत्याचारांना न जुमानता या दोघी मायलेकींनी इस्लामवर गाढ़

श्रद्धा सिद्ध केली आणि माननीय अबू बकर (र.) यांनी त्यांना खरेदी करुन मुक्तकेले. या जोखडांतून मुक्त केले.

सन्माननीय हमामा (र.) या माननीय बिलाल (र.) यांची आई इब्ने अब्दुल बर या इतिहासकारांनी लिहिले की, इस्लामच्या प्रारंभीकाळातच त्यांनीदेखील इस्लाम स्वीकारून नाना यातना भोगल्या. इस्लामद्रोह्यांनी जेवढे अत्याचार त्यांच्या पुत्रावर केले तेवढेच कठोर अत्याचार आईवरसुद्धा करण्या आले. परंतु इस्लाम धर्मावरील त्यांच्या श्रद्धेचे उदाहरण इतर कोणत्याच ठिकाणी पाहावयास मिळत नाही.

(संदर्भ : अल इस्तियाब, इतिहासकार इब्ने अब्दुलबर)

मक्का शहरामध्ये आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांनी जेव्हा प्रेषितत्व जाहीर केले आणि इस्लामची हाक दिली, तेव्हा सर्व प्रथम याच लोकांनी आपल्या प्राणाची व संपत्तीची तसेच संततीची कवडीमात्र पर्वा न करता इस्लामच्या मानवतावादी विचारसरणीचा अंगीकार केला. म्हणूनच यांना 'साबिकून व अव्वलून' अर्थात 'सुरुवातीलाच इस्लामचा स्वीकार करण्याचा बहुमान मिळविणारे' म्हटले गेले आहे. ही तर थोडीशीच उदाहरणे आहेत. असे कितीतरी लोक आहेत की ज्यांनी इस्लामला आपल्या हृदयाशी कवटाळले, त्या प्रत्येकावर आत्म्याचा थरकाप उडविणारे अत्याचार करण्यात आले. इस्लामद्रोह्यांच्या अत्याचारांनी जेव्हा परिसीमा ओलांडली तेव्हा आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांनी त्यांना वतनत्याग करून 'ॲबिसीनिया' कडे स्थलांतर करण्याचा सल्ला दिला. त्यामुळे हिजरी सन पूर्व ८ मध्ये आणि नंतर हि. सन पूर्व ७ मध्ये बरेच मुस्लिम 'ॲबिसीनीया' देशात जाऊन स्थायिक झाले.

प्रत्येक मानवास आपल्या मातृभूमीची तीव्र ओढ असते. आपली मातृभूमी घर परिवार त्याग करणे म्हणजे त्याची अतिशय कठीण परीक्षा असते. परंतु त्यांना या सर्व आवडणाऱ्या बाबींपेक्षा जास्त प्रिय बाब इस्लाम धर्मच होती. त्यांनी या कठीण परीक्षेत अपार यश मिळविले. यांच्यापैकी एक समुदाय तर प्रेषितांच्या स्थलांतरापूर्वीच मक्केस परत आला होता आणि दुसरा समुदाय ख़ैबरच्या युद्धासमयी हिजरी सन ७ पर्यंत ॲबिसीनीयात आश्रिताचे जीवन कंठीत होता. हिजरी सन १ मध्ये आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांनी आपल्या सर्व अनुयायांना मदीना शहरी स्थलांतर करण्याचे आदेश दिले, तेव्हा सत्यधर्म इस्लामचे सर्वच समर्थक आपले वतन, परिवार व संपत्तीचा त्याग करून मदीना शहरी स्थायिक झाले. ईश्वराला इस्लामच्या अनुयायांचा हा असीम त्याग इतका आवडला की, त्याने दिव्य कुरआनात जाहीर केले की, मी केवळ यांच्यावरच प्रसन्न नसून या अनुयायांच्या मार्गावर चालणाऱ्यावरही प्रसन्न झालो. जणू त्यांच्यानंतर इस्लाम स्वीकारणाऱ्यांनी प्रेषितत्वावर विश्वास टाकणाऱ्यांवर आलेल्या संकटांएवढी

संकटे झेलली नसली, तरी त्यांनी देखील आपले वतन, घरदार आणि अपत्येसुद्धा त्यागून इस्लामचा ध्वज बुलंद ठेवण्याकरिता कोणत्याही त्यागाची तयारी दर्शविली. ईश्वराने आपल्या विशेष दया व कृपेने त्यांना देखील 'साबिकून व अब्वलून' या प्रतिष्ठा-पदाने विभूषित करून विशेष समुदायात सामील केले. फरक फक्त एवढाच की, मक्का विजयापूर्वी इस्लाम स्वीकारलेले हे निश्चितच मक्का विजयानंतर इस्लाम स्वीकारणाऱ्यांपेक्षा श्रेष्ठ आहेत. दिव्य कुरआनात आहे की,

"तुमच्यापैकी ज्या माणसाने मक्का विजयापूर्वी (इस्लामखातर आपली संपत्ती) खर्च केली आणि (इस्लामद्रोह्यांच्या मुकाबल्यात) युद्ध केले ते आणि हीच पवित्रकर्मे ज्यांनी त्यांच्यानंतर केली, ती समान असू शकत नाहीत. त्यांचा दर्जा नंतरच्या (इस्लामखातर आपली) संपत्ती खर्च करणाऱ्यांपेक्षा आणि (ईशद्रोहीं-विरुद्ध) धर्मयुद्ध करणाऱ्यांपेक्षा मोठा आहे. तसेच ईश्वराने या सर्वांच्याच पुण्य-कर्मांचा मोबदला देण्याचे वचन दिले आहे आणि जे काम तुम्ही करीत असतात, त्याची संपूर्ण जाण ईश्वराला आहे."

दिव्य कुरआनने मुहाजिरीन सहितच अन्सारचा उच्च दर्जादेखील स्पष्ट केला आहे. तसेच आपली प्रसन्नता आणि स्वीकृती मध्ये या दोन्ही समुदायांना समान दर्जा दिला आहे. अन्सारी असलेल्या प्रेषितसोबत्यांना या रांगेत विशिष्ट दर्जा मिळालेला आहे. हे ते पवित्र लोक आहोत जे मक्कापासून ३०० मैल दूर मदीना या शहराचे रहिवासी होते. मोठ्या शांती समृद्धीने जीवन जगत होते. या लोकांनी कोणताही स्वार्थ न बाळगता आणि कोणत्याही आमिषाशिवाय व दडपणाशिवाय इस्लाम स्वीकारून मुहाजिरीन समुदायास सर्वतोपरी मदत केली. केवळ त्यांच्या सुस्वभावामुळेच त्यांनी सत्यधर्म इस्लामचा स्वीकार केला होता.

हिजरी सन पूर्व ३ मध्ये 'हज' यात्रेच्या काळात 'यसरब' येथील सहा सुस्वभावी लोक मक्का शहरी आले होते. आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांनी त्यांच्यासमोर इस्लामची शिकवण सादर केली, तेव्हा त्यांनी नि:संकोचपणे इस्लामचा मन:पूर्वक स्वीकार केला. यसरबला परत गेल्यावर त्यांनी तेथे इस्लामचा प्रचार केला. हिजरी सन पूर्व १ मध्ये 'हज' च्या काळात ते मक्केस आपल्यासोबत आणखीन सहा जणांना घेऊन आले. या इतर सहाजणांनीसुद्धा आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या हातावर इस्लामचा स्वीकार केला. त्यांच्या विनंतीवरून आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांनी इस्लाम धर्माचे शिक्षण देण्यासाठी 'माननीय मुसअब बिन उमैर (र.)' यांना इस्लामचे प्रथम प्रचारक बनवून 'यसरब' शहरी पाठविले. इस्लामच्या प्रचारामुळे 'यसरब' शहराच्या घरोघरी इस्लाम दरवळू लागला. हिजरी सन पूर्व १ मध्ये ७३ पुरुष आणि २ स्त्रियांनी

इस्लामद्रोह्यांना भनक लागू न देता रात्रीच्या वेळी 'उक़्बा' या घाटीच्या क्षेत्रात आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांची भेट घेतली आणि इस्लामचा मन:पूर्वक स्वीकार करुन त्याच्या प्रचाराचा चंग बांधला. त्यांनी आदरणीय प्रेषितांना इस्लाम प्रचारास्तव यसरब येण्याचे निमंत्रण देऊन वचन दिले की, ''आम्ही आमचे प्राण, संपत्ती आणि सर्वस्व पणाला लावून आपले रक्षण करू.'' या घटनेस इतिहासामध्ये 'द्वितीय बयत-ए-उक़्बा' (अर्थात उक़्बाची द्वितीय इस्लाम दीक्षा किंवा बयत-ए-लैलतुल उक़्बा (अर्थात उक़्बा येथील रात्रीची इस्लामदीक्षा) असे म्हणतात. ही इस्लामदिक्षा इस्लामी इतिहासातील प्रथम महत्त्वाची दीक्षा होय. वस्तुत: ही इस्लामदिक्षा धर्मरक्षणास्तव इस्लामद्रोह्यांशी युद्ध करण्यास्तव होती. ज्या वेळी अरब देशातील सर्व आबालवृद्ध आणि प्रत्येक घटक इस्लामचा कट्टर वैरी आणि विरोधक होता, इस्लामचा स्वीकार करणाऱ्यांच्या रक्ताचा शत्रू होता, अशा वेळी 'यसरब' (मदीना शहराचे प्राचीन नांव) येथील या सूज्ञ आणि प्रामाणिक लोकांनी आपले प्राण, संपत्ती व सर्वकाही आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या चरणी अर्पण केले. मग त्यांनी कोणत्याही संकटास न घाबरता इस्लामच्या शत्रूंशी रक्ताच्या शेवटच्या थेंबापर्यंत झुंज दिली. या इस्लामदिक्षा समारंभाने अन्सार समुदायास असे वैशिष्ट्य प्रदान केले की, ज्याचा त्यांना सदैव अभिमान राहिला. आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांनी इस्लाम स्वीकारणाऱ्या सोबत्यांना मदीना शहरी स्थलांतर करण्याचे आदेश दिल्यावर ते मदीना शहरी जाताच अन्सार समुदायाने त्यांचे हार्दिक स्वागत केले आणि त्यांना आर्थिक, सामाजिक व सर्वतोपरी मदत केली. काही काळानंतर स्वत: आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांनी माननीय अबू बकर (र.) आणि माननीय आमिर बिन फ़हीरा (र.) यांच्यासोबत मदिना शहरी स्थलांतर केले, तेव्हा तेथील अन्सार समुदायाने त्यांचे उत्स्फूर्त स्वागत केले. असे स्वागताचे उदाहरण इतिहासात मिळणे अशक्यप्राय आहे. हा दिवस प्रेषितमय बनला आणि या भूमीवर आकाशही गर्व करू लागले.

मुहाजिरीन (स्थलांतरित) वर्षानुवर्षे अपार संकटे झेलल्यानंतर आपली मातृभूमी आणि घरपरिवार त्यागून मदीना शहरी पोहोचल्यावर त्यांच्याजवळ ईश्वराच्या नावाशिवाय काहीच बाकी नव्हते. पैसाअडका व उपजीविकेची कोणतीच साधने नव्हती. परंतु मदीना शहरातील अंसारांनी त्यांची मदत व पाहुणचार अशा प्रकारे केला की, ही घटना इतिहासात आकाशातील प्रखर ताऱ्याप्रमाणे झगमगत राहील.

मदीनावासीय हे अतिशय सुस्वभावी आणि प्रेमळ तसेच मोठ्या अंत:करणाचे होते. बंधुत्व, सद्‌भावना आणि सहानुभूती त्यांच्या स्वभावातच होती. स्वत: ईश्वराने दिव्य कुरआनात म्हटले आहे,

''सर्वजण मिळून ईश्वराच्या दोरीस घट्ट धरा (अर्थात त्याच्या धर्माला घट्ट धरावे

याला दोरी म्हणून यासाठी संबोधले आहे की, हेच ते नाते आहे जेणेकरून एकीकडे श्रद्धावंतांचे ईश्वराशी संबंध प्रस्थापित होते. तर दुसरीकडे सर्व श्रद्धावंत एकत्रितपणे एक जमात बनतात.) आणि ईश्वराचे ते अनुग्रह स्मरण करा जेव्हा तुम्ही एक दुसऱ्याचे वैरी होते. मग ईश्वराने तुमच्या हृदयात एकमेंकांप्रती बंधुत्व आणि प्रेम निर्माण केले. म्हणून तुम्ही त्याच्या कृपेने आपसांत बंधु बनले. खरे पाहता तुम्ही नरकाग्नीच्या काठावरच उभे होते आणि ईश्वराने तुम्हास यापासून वाचविले. अशा प्रकारे ईश्वर आपल्या आयतींना सविस्तरपणे वर्णन करून सांगतो, जेणेकरून तुम्ही सत्यमार्गावर यावे.''

(संदर्भ : दिव्य कुरआन, सूरह-ए-इम्रान' १०३)

ईश्वराच्या या महान उपकाराचे अन्सार समुदायाने मन:पूर्वक आभार मानले. त्यांनी आपले प्राण, संपत्ती आणि संतती ईशमार्गात समर्पित केली. तसेच आपल्या त्याग, सहानुभूती, प्रेम व सद्‌भावनेच्या कधीही न मिटणाऱ्या खुणा इतिहासाच्या पानांत सोडल्या. आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या मदीना स्थलांतरामुळे मुहाजिरीन व अन्सारच्या दरम्यान एक दृढ संबंध प्रस्थापित झाले. या संबंधांची प्रस्थापना केवळ हंगामी गरजपूर्तीकरिता नसून त्यामध्ये काही विशेष तात्त्विक लाभ होते. प्रथम हे की, मुहाजिरीन समुदायाच्या मनातून आपण आश्रित असण्याची भावना अगर न्यूनगंड नष्ट व्हावे. दुसरे असे की, इस्लामखातर मुहाजिरीन हे अक्षरश: अत्याचारांच्या भट्टीत भाजून निघाले होते आणि त्यांचे प्रशिक्षण स्वयं आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या सांनिध्यात झालेले होते. स्वत: प्रेषितांनीच त्यांच्यात प्रशिक्षणाने सुधारणा घडवून आणली होती, ती यास्तव की त्यांना आपल्या नवमुस्लिम अन्सार बंधुंना प्रशिक्षण देता यावे. अन्सारी सोबत्यांनीसुद्धा मुहाजिरीन सोबत्यांशी सख्या भावापेक्षाही जास्त प्रेमळ वागणूक आणि अधिकार दिले. त्यांनी मुहाजिरीनना आपल्या राहत्या घरात थांबण्याची पूर्ण व्यवस्था केली. आपल्या संपत्तीची दोन भागात बरोबर विभागणी करून एक भाग मुहाजिरीनना दिला. याचा उल्लेख मागील मजकुरात आलाच आहे.

अन्सारजणांनी आपल्या मुहाजिरीन बंधुंना आपली निम्मी बागायत शेती देऊ केली. परंतु मुहाजिरीन बांधवांनी शेती व्यवसायात अज्ञानी असल्याने शेती घेण्यास नकार दिला. परंतु अन्सार बंधुनी माघार न घेता सांगितले की, तुम्हाला कृषीविषयक माहिती नसली तरी, आम्ही शेती पिकवून त्यातील निम्मे धान्य तुम्हाला देऊ. मुहाजिरीन बांधवांनी आपल्या अन्सार बंधुचा हा प्रेमळ त्याग स्वीकार केला. खैबरच्या युद्धापर्यंत ते अन्सारबंधुंच्या निम्म्या मालास स्वीकार करून उपजीविका भागवीत असत. खैबरच्या विजयानंतर त्यांनी अन्सार बंधुंची शेती साभार परत केली.

'सहीह बुखारी' या ग्रंथात आहे की, मुहाजिरीन व अन्सार बंधुंचा बंधुभाव सख्या

बंधुंपेक्षाही जास्त दृढ होता. जर एखादा अन्सारी बंधु स्वर्गवासी झाला, तर त्याच्या संपत्तीमध्ये सख्ख्या भावाप्रमाणेच मुहाजिर बंधुंचा वाटा निश्चित करण्यात येत असे. बदरच्या युद्धानंतर मुहाजिरीन (स्थलांतरित) ची आर्थिक स्थिती चांगली सुधरली, तेव्हा दिव्य कुरआनची ही आयत अवतरित झाली,

"सगेसोयरे एक दुसऱ्याचे जास्त हक्कदार आहेत." (सूरह-ए-अनफ़ाल : ७५)

या ईश्वरीय आदेशानुसार अन्सार मुहाजिरीनमधील वारसाहक्क संपुष्टात आला आणि मृताच्या संपत्तीमध्ये केवळ रक्ताच्या नातेवाईकांचाच अधिकार प्रस्थापित झाला.

अन्सारजणांनी आपली सहानुभूती आणि बंधुभाव रक्ताच्या नातेवाईकांपर्यंतच मर्यादित न ठेवता, गरज पडेल तेव्हा त्यांनी आपली संपत्ती इतर सर्वांसाठी खर्च केली. माननीय हारिसा बिन नोमान (र.) यांनी आपली कितीतरी घरे आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांना समर्पित केलीत. त्याचप्रमाणे 'सुफ़्फ़ा' या चबुतऱ्यावरील सोबत्यांच्या उदरनिर्वाहाचा प्रबंध अन्सारजणांनी केला. धर्मयुद्धाच्या वेळी ते आपले प्राण व संपत्तीनिशी खंबीरपणे रणांगणात उतरत असत. आदरणीय प्रेषितांनी बदरच्या युद्धापूर्वीच अन्सारी सोबत्यांचा मानस विशेषकरून जाणून घेतला. कारण अन्सारी सोबत्यांनी या गोष्टीचे वचन दिले नव्हते की, ते मदीना शहराबाहेर प्रेषित व त्यांच्या मुहाजिरीन सोबत्यांचे रक्षण करण्यासाठी शत्रुंशी युद्ध करतील. मुहाजिरीन सोबत्यांशी सल्लामसलत केल्यानंतर प्रेषितांनी म्हटले की, आता इतर जणांनीसुद्धा आपली भूमिका व्यक्त करावी. तेव्हा मदीना शहरातील गर्भश्रीमंत असलेले माननीय साआद बिन मआज़ (र.) हे उठून उभे राहिले आणि आवेषपूर्ण स्वरात म्हणाले की,

"हे आदरणीय प्रेषित! आम्ही आपल्यावर श्रद्धा बाळगली. आपल्या प्रेषितत्वाचा स्वीकार केला. आपले आज्ञापालन करण्याची प्रतिज्ञा घेतली. अशी प्रतिज्ञा घेतली की, आपण केवळ इशाराच करा, आम्ही तत्काळ पालन करुन महान ईश्वराची शपथ की, ज्याने आपणास आमच्या ऐहिक आणि पारलौकिक कल्याणास्तव प्रेषित बनवून पाठविले, आपण आम्हाला समुद्रात झोकून देण्याचा आदेश दिला, तर आम्ही स्वत:स समुद्रात झोकून देऊत! आमचा एकही माणूस आपला आदेश पालन करण्यास मागेपुढे पाहणार नाही. ईश्वराच्या इच्छेने आपण आम्हाला रणांगणांत पूर्ण धैर्य आणि हिमतीने लढताना पाहाल. आम्ही शौर्याने आणि प्राणपणाला लावून शत्रूचा मुकाबला करू आणि यामुळे अल्लाह आपणास प्रसन्नचित्त करील.

इतिहासात आणखीन एके ठिकाणी असा उल्लेख आहे की, या प्रसंगी माननीय साआद बिन उबादा (र.) यांनी देखील असे भाषण केले की,

"हे आदरणीय प्रेषित ! कदाचित आपला इशारा अन्सारजणांकडे आहे. आपण समुद्रात जीव देण्याचा आदेश दिला किंवा पर्वतावरून जीव देण्याचा आदेश दिला तरी आम्ही किंचितही विचार न करता आपले आज्ञापालन करु."

अन्सारजणांची ही धर्मयुद्धाची अतिशय तीव्र भावना आणि इस्लाम द्वेष्ट्यांविरुद्ध लढण्याची तीव्र आकांक्षा पाहून आदरणीय प्रेषितांचा चेहरा अत्यानंदाने चमकू लागला.

अन्सारी सोबत्यांनी केवळ बदरचेच रणांगण गाजविले नसून प्रत्येक युद्धभूमीवर मुहाजिरीनप्रमाणेच जीवाची बाजी लावली आणि आपल्या प्राणांची आहुती देण्यात कोणाच्याही मागे पडले नाहीत. सत्य मार्गातील त्यांनी आपले प्राण पणाला लावल्याची काही उदाहरणे देत आहोत.

१) सन्माननीय हिन्द बिंन्त अमरु बिन हिराम अन्सारिया (र.) यांचे पती माननीय अमरु बिन जमूह (र.) पुत्र माननीय ख़ल्लाद (र.) आणि भाऊ माननीय अब्दुल्लाह (र.) यांनी 'ओहद' च्या युद्धात शत्रुंशी तीव्र झुंज देताना वीरमरण पत्करले. सन्माननीय हिंन्द बिन्त अमरु (र.) यांनी आपले पती, पुत्र आणि भाऊ यांच्या हौतात्म्याची वार्ता ऐकली, तेव्हा त्यांना दु:ख होण्याऐवजी लोकांना त्या विचारत होत्या की, आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) कुशल आहेत काय? जेव्हा लोकांनी त्यांना सांगितले की, 'ईशकृपेने आदरणीय प्रेषित कुशल आहेत' तेव्हा त्यांचा चेहरा आनंदाने फुलला. त्या लगबगीने युद्धभूमीकडे निघाल्या. आदरणीय प्रेषितांना कुशल पाहून म्हणाल्या, "आपण कुशल तर जगातील सर्व संकटे क्षुल्लक आहेत."

२) माननीय अनस बिन नझर अन्सारी (र.) यांनी 'ओहद' च्या युद्धामध्ये काही शूरवीर असलेल्या योद्धांना हत्यार टाकून उदास बसलेले पाहून विचारले, "तुम्ही रणभूमी सोडून येथे का बसलात ?"

"आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) हुतात्मे झाले म्हणून !" त्यांनी कसेबसे उत्तर दिले.

"मग तुम्ही जिवंत राहून करणार तरी काय ? उठा आणि शत्रूंशी लढून जीव द्या, ज्याप्रमाणे आदरणीय प्रेषितांनी प्राणाची आहुती दिली !"

असे म्हणून ते आवेशाने तलवार घेऊन शत्रूंशी झुंज देताना शरीरावर सत्तर जखमा खाऊन हुतात्मा झाले. त्यांचे पुतने माननीय अनस बिन मालिक (र.) यांची आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांचे कथन कथित केले की, 'सूरह-ए-अहज़ाब' ची ही आयत माननीय अनस बिन नज़र (र.) यांच्या बाबतीत अवतरली आहे ती अशी की,

"श्रद्धावंतांपैकी काही असेदेखील आहेत ज्यांनी ईश्वरास दिलेले वचन पूर्ण करून दाखविले. यापैकी काहींनी आपली मुदत पूर्ण केली व काहींजण मुदत संपण्याची वाट पाहत आहेत." (सूरह-ए-अहज़ाब : २३)

३) माननीय ख़बीब बिन अदी अन्सारी (र.) आणि माननीय झैद बिन बसना अन्सारी (र.) यांना 'अज़ल-ए-विक़ारा' च्या लोकांनी गद्दारी करून 'रजीअ' या स्थानावर कैद करून मक्काच्या कुरैश शत्रुंच्या स्वाधीन केले. शत्रुंनी या दोघांना सुळावर चढवून ठार केले. ज्या वेळी शत्रू माननीय ख़बीब (र.) यांना सुळावर चढ़वीत होते, तेव्हा त्यांना विचारण्यात आले की, "शपथ घेऊन सांग, तुझ्या ठिकाणी 'मुहम्मद (स.)' यांनाच सुळावर चढ़वून तुला सोडून दिले, तर चालेल काय ? तू तुझ्या घरी आरामशीर बस !" "ईश्वराची शपथ ! माझा प्राण गेला तरी चालेल, परंतु आदरणीय प्रेषितांना काटा रुतणेही मला सहन होणार नाही." ते उत्तरले. याचप्रमाणे माननीय झैद बिन वसना (र.) यांना फासावर लटकविण्यापूर्वी अबू सुफ़ियान याने (ज्यांनी अद्यापपर्यंत इस्लाम स्वीकारला नव्हता) विचारले, "हे झैद ! तुला ईश्वराची शपथ ! खरेखरे सांग ! तुझ्या ठिकाणी मुहम्मद (स.) यांना फाशी देऊन तुला सोडून दिले जाईल. हे तुला मान्य आहे काय ? तुला आपले बाकीचे जीवनसुख समृद्धीत जगता येईल !"

परंतु या सत्यनिष्ठ प्रेषितसोबत्यानेदेखील तेच उत्तर दिले जे माननीय खब्बाब यांनी उत्तर दिले की, "माझा प्राण गेला तरी चालेल, परंतु आदरणीय प्रेषितांना काटा रुतणेदेखील मला सहन होणार नाही."

त्यांचे असे विलक्षण उत्तर ऐकून अबू सुफ़ियानच्या तोंडून उद्गार निघाले, "मुहम्मद (स.) यांचे सोबती मुहम्मद (स.) यांच्यावर जेवढे जीवापाड प्रेम करतात, तेवढे या जगात कोणीच कोणावर करीत नाही !"

४) ओहदच्या युद्धात माननीय साअद बिन रबीअ अन्सारी (र.) हे शत्रुंशी झुंज देताना जखमी झाले. त्यांच्या शरीरावर बारा जखमा झाल्या होत्या. ते बेशुद्ध होऊन रणभूमीवर कोसळले. त्यांना आदरणीय प्रेषितांविषयी कमालीचा आदर व प्रेम होते. युद्धानंतर साअद बिन रबीअ (र.) दिसले नसल्याने प्रेषित मुहम्मद (स.) यांनी इतर सोबत्यांना विचारले, "साअद बिन रबीअ (र.) कोठे आहेत ?" आदरणीय प्रेषितांची तळमल पाहून माननीय उबैबिन कआब (र.) म्हणाले, "आपण चिंता करू नका. मी जाऊन पाहतो !" ते तत्काळ उठून रणभूमीवरील मृतांमध्ये त्याना हुडकू लागले. ते साअद बिन रबीअ (र.) यांना वारंवार हाक देऊ लागले, "साअद ! कोठे आहात तुम्ही?" परंतु साअद बिन रबीअ (र.) हे बेशुद्धावस्थेत जीवनाच्या अंतिम घटका मोजत होते. उबै बिन कआब (र.) यांनी त्यांना परत हाक दिली, "हे साअद ! आदरणीय प्रेषित तुम्हास बोलावत आहेत !" प्रेषितांचे नांव ऐकताच साअद बिन रबीअ (र.)

यांचा जणू आत्मा त्यांच्या शरीरात परतला. त्यांनी आपले पूर्ण प्राण एकवटून उबै बिन रबीअ (र.) यांना म्हटले, ''आदरणीय प्रेषितांना माझा सलाम पोहोचवून माझ्या अन्सार बंधुंना माझा संदेश पोहोचवावा की, यदाकदाचित आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) हुतात्मे झाले आणि तुम्ही जिवंत राहाल ईश्वराला तोंड दाखवायच्याही लायकीचे राहणार नाहीत. कारण आपण 'लैलतुल उक़बा' (अर्थात इस्लामच्या महादीक्षेची रात्र) च्या वेळी प्रेषित मुहम्मद (स.) आणि ईश्वरासमोर प्रतिज्ञा केली होती की, आम्ही आदरणीय प्रेषितांवर प्राण ओवाळून टाकू !''

एवढे बोलून त्यांनी आपले प्राण ईश्वराच्या स्वाधीन केले.

अन्सारी सोबत्यांच्या याच त्यागामुळे त्यांना मुहाजिरीन सोबत्यांप्रमाणेच ईशदरबारी प्रतिष्ठा आणि श्रेष्ठत्व लाभले. दिव्य कुरआनात प्रेषितसोबत्यांचे श्रेष्ठत्व विविध प्रकारच्या वर्णनांनी स्पष्ट करण्यात आले आणि सर्वांनाच कोणत्याही अपवादाशिवाय स्वर्गप्राप्तीची खूशखबर देण्यात आली. काही ठिकाणी एखाद्या विशेष घटना अथवा प्रसंग व ठिकाणाच्या अनुसार त्यांना ईश्वरप्रसन्नतेची शुभवार्ता देण्यात आली, तर काही ठिकाणी अशा प्रकारच्या आयतीदेखील अवतरीत झाल्या, ज्या एखाद्या प्रेषितसोबत्यांकरिताच त्यांच्या एखाद्या विशेष कार्यप्रशंसेकरिता अवतरीत झाल्या आहेत.

ज्या आयतींमध्ये एकूण प्रेषितसोबत्यांना स्वर्गाचे हक्कदार ठरविण्यात आले आहे, त्यांच्यापैकी काहींचा संक्षिप्त उल्लेख वरील मजकुरात केला गेला आहे. आता आपण दुसऱ्या प्रकारच्या उदाहरणांचा आढावा घेऊ या.

ज़ीक़ाअदा महिण्याच्या एक तारखेस हिजरी सन ६ मध्ये आदरणीय प्रेषित मुहम्मद (स) यांनी उमरा (पवित्र काबागृहाचे दर्शन) चा इरादा केला. चौदा सोबत्यांबरोबर ते मदीनाहून मक्का शहराकडे रवाना झाले. त्यांना वाटले की, आपल्यासोबत उमरासाठी असलेले एवढे लोक पाहून मक्काच्या कुरैश कबिल्याच्या लोकांच्या मनात वैरभावाची शंका राहणार नाही. आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सोबत्यांना आदेश दिला की, तलवारीशिवाय कोणतेच हत्यार सोबत ठेवू नका. तसेच सोबत असलेल्या तलवारीसुद्धा म्यानाबाहेर काढू नका. 'जुल हलीफ़ा' या ठिकाणी प्रेषित व त्यांच्या सोबत्यांनी एहराम (हज व उमराचा विशेष पोषाख) परिधान केला. इकडे प्रेषितांचे व इस्लामचे कट्टर विरोधक असलेल्या 'कुरैश' टोळीच्या लोकांना ही वार्ता कळताच ते संतापले आणि लढण्यासाठी तयार झाले. त्यांनी आदरणीय प्रेषितांना संदेश पाठविला की, कुरैशचे लोक तुमच्याशी दोनदोन हात करणार आहेत, तेव्हा प्रेषितांनी 'हुदैबिया' च्या ठिकाणीच पड़ाव टाकला आणि कुरैशजणांना संदेश

पाठविला की, ‘आम्ही लढण्यासाठी आलेलो नसून केवळ ‘उमरा’ करण्यासाठी आलो आहोत.’ कुरैशजणांनी ‘उरवा बिन मसऊद (हे अद्याप मुस्लिम झाले नव्हते) यांना प्रेषितांकडे बोलणी करण्यासाठी पाठविले. बोलणी संपल्यावर परत येऊन झालेल्या बोलणीचा सविस्तर वृत्तान्त त्यांनी सांगितला, तो याप्रमाणे,

“हे माझ्या कुरैश बंधुंनो ! मी जगाच्या मोठमोठ्या राजदरबारी गेलो. मी रोमच्या क़ैसरच्या राजदरबार, पर्शियाच्या किसराचा राजदरबार आणि ॲबिसीनियाच्या राजा नेगुस चे वैभव पाहिले आहे. परंतु हे माझ्या कुरैश बंधुंनो ! मुहम्मद (स.) यांचे सोबती त्यांचा जो अपार सन्मान आणि आदर बाळगतात, तसा मी कोणत्याही सम्राटाचा बाळगताना पाहिला नाही. एवढ़ेच नव्हे तर पैसा देऊन खरेदी केलेला गुलामदेखील आपल्या स्वामीचा एवढ़ा आदर व सन्मान आणि आज्ञापालन करीत नाही. मुहम्मद (स.) यांच्या आदेशपालनास प्रत्येकजण उत्सुक असतो. त्यांनी बोलण्यासाठी तोंड उघडताच सर्वांचे आवाज बंद होतात. माझा तर विचार आहे की, तुम्ही अस्थायी स्वरूपात मुहम्मद (स.) यांच्याशी तह करावा.”

कुरैश कबिल्याचे लोक उरवा बिन मसऊद यांचा खूप आदर करीत असूनही त्यांनी त्यांचा सल्ला झुगारून दिला. इकडे आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांनी माननीय उसमान (र.) यांना आपले प्रतिनिधी म्हणून वाटाघाटीसाठी कुरैशजणांकडे पाठविले. माननीय उस्मान (र.) हे मुस्लिम असूनसुद्धा कुरैशजण त्यांच्या खूप आदर करीत असत. वाटाघाटीसाठी गेलेल्या माननीय उस्मान (र.) यांना कुरैशजणांनी आदरातिथ्यासाठी थांबवून घेतले. परंतु त्यांना परत येण्यास विलंब लागल्याने प्रेषित व त्यांच्या सोबत्यांना त्यांची काळजी पडली. त्यातल्या त्यात अशी अफवादेखील उडाली की, माननीय उस्मान (र.) यांना कुरैशजणांनी ठार केले. या अफवेमुळे आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) आणि सोबती आणखीनच चिंतित झाले. आदरणीय प्रेषितांनी म्हटले, “जर ही वार्ता की, उस्मान (र.) यांना जीवे मारण्यात आले आहे, खरी ठरली तर त्यांच्या खुणाचा बदला घेतल्याशिवाय परत जाणार नाही.” प्रेषितसोबत्यांजवळ हत्यार नसताना ते आदरणीय प्रेषितांच्या आदेशावर लढण्यासाठी तत्काळ तयार झाले. आदरणीय प्रेषितांनी बाभळीच्या झाडाखाली बसून आपल्या अनुयायांकडून प्रतिज्ञा घेतली की, “रक्ताच्या शेवटच्या थेंबापर्यंत शत्रूंचा मुकाबला करू” इस्लामी इतिहासात या प्रतिज्ञेस ‘बयअते रिझवान’ या नावाने संबोधित करण्यात आले. दिव्य कुरआनात सूरह-ए-फतहमध्ये यासंबंधी ही आयत अवतरीत झाली.

“हे मुहम्मद (स.) ! जेव्हा श्रद्धावंत तुमच्या हातावर प्रतिज्ञा घेत होते, तेव्हा ईश्वर त्यांच्यावर प्रसन्न झाला. ईश्वरास त्यांच्या अंत:करणाच्या अवस्थेची पूर्णपणे कल्पना होती.” (सूरह-ए-फतह :१८)

प्रेषितांच्या मदीनेस स्थलांतराच्या वेळी माननीय अबू बकर (र.) यांना आदरणीय प्रेषितांसोबत स्थलांतराचे सौभाग्य लाभले. हे कार्य मोठे कठीण आणि जोखमीचे होते. प्रेषितांसाठी प्राणपणाला लावण्याची ही अदा ईश्वराला खूप आवडली आणि त्याने दिव्य कुरआनात म्हटले,

"तुम्ही आदरणीय प्रेषितांची (स.) मदत जरी केली नसली तरी ईश्वराने त्यांची मदत केली, ती ही अशा प्रसंगी की जेव्हा ईशद्रोह्यांनी त्यांना (शहराबाहेर) काढले होते. ते दोघेजण गुहेत होते तेव्हा (प्रेषित (स.)) आपल्या सोबत्यांस धीर देत होते की, दुःख आणि निराशा बाळगू नका ! ईश्वर आपल्यासोबत आहे." (सूरह-ए-तौबा : ४०)

यामध्ये स्वतः ईश्वराने माननीय अबू बकर (र.) यांची प्रशंसा केली आहे. 'सूरह-ए-हदीद' मध्ये ईश्वराचा आदेश आला की,

"कोण आहे जो ईश्वराला कर्ज देण्यास तयार आहे ? मंगल कर्ज की ईश्वर कितीतरी पटीने वाढवून ते परत करील ! त्यांच्याकरिता पुण्य मोबदला आहे."

(सूरह-ए-हदीद : ११)

या आयतीचा आदेश ऐकताच माननीय अबू दरदा (र.) यांनी प्रेषित मुहम्मद (स.) यांना विचारले, "हे प्रेषिता ! ईश्वराला आमच्याकडून कर्जाची कशी काय गरज पडली ?" "होय हे अबू दरदा (र.)" प्रेषित उत्तरले.

"जरा आपला हात माझ्याकडे द्या !" ते म्हणाले.

आदरणीय प्रेषितांनी आपला हात पुढे केला. त्यांनी प्रेषितांचा हात हातात घेऊन म्हटले, "हे आदरणीय प्रेषिता ! मी आपला बागेचा ईश्वरास कर्ज म्हणून दिला." माननीय अबू दरदा (र.) यांनी अर्पण केलेल्या या बागेत सहाशे खजुरींची झाडे आणि त्यांचे घर देखील होते.. प्रेषितांकडून निरोप घेऊन ते सरळ घरी पोहोचले आणि पत्नीस आनंदाच्या भरात बाग ईश्वरास समर्पण करण्याची शुभवार्ता कळविली. पत्नीलादेखील खूप आनंद झाला आणि ती म्हणाली, "हे अबू दहदाह (र.) ! तुम्ही अतिशय जास्त लाभदायक सौदा केला आहे." आणि मग त्या दोघा पतीपत्नींनी आपले सामान बाहेर काढून बागेतील राहते घर रिकामे केले.

एके दिवशी आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) आपल्या सोबत्यांबरोबर बसले होते. एवढ्यात दरिद्री अवस्थेतील माणूस प्रेषितदरबारी हजर झाला आणि म्हणाला, "हे प्रेषिता ! मी प्रवासी आहे व या अनोळखी शहरात माझ्या जेवण व निवासाची सोय नसल्याने आपण माझी मदत करावी."

प्रेषितांनी तत्काळ आपल्या घरात विचारले, "घरात काही जेवणपाण्याचा बंदोबस्त आहे काय?" आतून उत्तर आले की, "आज आम्ही उपाशी आहोत." यावर आदरणीय प्रेषितांनी सोबत्यांकडे वळून म्हटले,

"यांचा पाहुणाचार करण्यासाठी कोण तयार आहे ?" माननीय अबू तलहा (र.) ताडकन उभे राहिले, जणू ते प्रेषितांच्या आदेशाची वाटच पाहत होते. म्हणाले, "हे प्रेषिता ! यांचा पाहुणाचार मी करतो. असे म्हणून त्यांनी प्रवासी पाहुण्यास घरी नेले आणि पत्नीस पाहुणे येण्याची शुभवार्ता दिली. पत्नी म्हणाली, "घरात खाण्यासाठी काहीच नाही. मुलांसाठी थोडेसे अन्न शिजवून ठेवले आहे."

"काही हरकत नाही, मुलांना कसेबसे उपाशीच झोपव. ते झोपी गेल्यावर ते अन्न आपण पाहुण्यास वाढू. तू दिवा दुरुस्त करण्याच्या निमित्ताने विझवून टाक. अंधारात पाहुणा जेवण करील आणि आपण जेवण्याची केवळ नक्कल करू .पाहुण्यास आपणही जेवत असल्याचा भास होईल." अबू तलहा अन्सारींनी आपल्या पत्नीस गुपचुपपणे बजावले.

ठरलेल्या योजनेप्रमाणे त्यांनी पाहुण्यास पोटभर जेऊ घातले. दोघेही पती-पत्नी आणि मुले उपाशीच झोपले. सकाळी जेव्हा अबू तलहा (र.) प्रेषितदरबारी हजर झाले, तेव्हा प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या मुखावर ही आयत आली,

"ते लोक आपल्यापेक्षा इतरांच्या गरजांना जास्त महत्त्व देतात, त्यांच्या घरी उपासमार व तंगी का असेना." (सूरह-ए-हश्र : ९)

नंतर प्रेषितांनी म्हटले, "तुम्ही रात्री केलेला पाहुण्याचा पाहुणचार ईश्वरास खूप आवडला."

एके दिवशी माननीय अबू तलहा अन्सारी (र.) प्रेषितांच्या दरबारी हजर झाले की, 'सूरह-ए-आले इमरान' ची ही आयत अवतरित झाली,

"जोपर्यंत तुम्ही आपल्याला सर्वांत जास्त आवडणारी वस्तू ईशमार्गात खर्च करीत नाही, तुम्हाला मुळीच पुण्य मिळणार नाही." (आले इमरान : ९२)

माननीय अबू तलहा अन्सारी (र.) यांची मस्जिदे नबवीसमोरच खूप विशाल आणि रम्य बाग होती. त्या बागेत 'बीरहा' नावाची गोड आणि थंड पाण्याची विहीर होती. आदरणीय प्रेषितांना या विहिरीचे पाणी अत्यंत आवडत असे. अरब प्रदेशात अशा प्रकारची कृषीसंपत्ती खूप महत्त्वाची आणि महाग होती. परंतु माननीय अबू तलहा (र.) उठले व म्हणाले, "हे आदरणीय प्रेषिता ! माझी अतीप्रिय आणि सर्वांत जास्त आवडणारी संपत्ती 'बीरहा' असून मी ती ईशमार्फत अर्पण करीत आहे."

त्यांची सहकार्यभावना पाहून आदरणीय प्रेषितांचा चेहरा आनंदाने फुलला. त्यांनी त्यांना आशीर्वाद देत म्हटले की, "या संपत्तीचे गरजवंत असलेल्या आपल्या नातेवाइकांत वाटप करा." अबू तलहा (र.) यांनी तत्काळ प्रेषिताज्ञेचे पालन केले आणि आपल्या गोरगरीब नातेवाईकांत त्या संपत्तीचे वाटप केले.

प्रेषितसोबत्यांची त्याग व सहकार्याची भावना, जिचा दिव्य कुरआनात बऱ्याच ठिकाणी प्रशंसापूर्ण उल्लेख करण्यात आला आहे, तिची कल्पना तबुकच्या युद्धाच्या प्रसंगी येते. आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांनी ईशमार्गात संपत्ती खर्च करण्याची शिकवण व प्रेरणा देताच ज्या ठिकाणी सर्वच प्रेषितसोबत्यांनी आपल्या ऐपतीप्रमाणे आपल्या संपत्तीचा भाग प्रेषितदरबारी आणून दिला, त्या ठिकाणी माननीय अबू बकर (र.) यांनी घरातील एकनूएक वस्तूच काय, घरातली सुईसुद्धा ईश्वराच्या प्रसन्नतेखातर प्रेषितदरबारी आणून दिली आणि म्हटले, ''हे आदरणीय प्रेषिता! ईश्वर आणि प्रेषिताच्या पवित्र नावाशिवाय घरी काहीही बाकी सोडले नाही !''

प्रेषितसोबत्यांमध्ये एवढी उच्च दर्जाची त्यागभावना आणि सदाचारभावना व उच्च नीतिमत्ता होती. म्हणूनच ईश्वराने त्यांच्या कर्मपथास प्रमाणसिद्ध कर्मपथ असण्याची घोषणा केली आणि त्यांचा विरोध करणाऱ्यांना आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांचे विरोधक ठरविण्यात आले. दिव्य कुरआनात आहे की,

''ज्याच्यासमोर मार्गदर्शनाची वाट उघडली असूनही आणि जे श्रद्धावंतांचे मार्गदर्शन सोडून प्रेषितांचा विरोध करतात, तो ज्याकडे वळतो, आम्ही (स्वयं ईश्वर) सुद्धा तिकडेच वळवू आणि अंतिम निवाड्याच्या दिवशी त्यांना नरकाग्नित टाकले जाईल व ते स्थान खूप भयानक आहे.'' (सूरह-ए-निसा : ११५)

दिव्य कुरआनचे अभ्यासक आणि विशेषज्ञ 'मोमिनीन'चा मार्ग चा अर्थ अशा प्रकारे स्पष्ट करतात की, हा मार्ग म्हणजे प्रेषितसोबत्यांचा मार्ग होय. हे प्रेषितसोबती अशा व्यक्ती आहेत, ज्यांची गुणवैशिष्ट्ये आणि इस्लामी जीवनशैलीचा ठिकठिकाणी दिव्य कुरआनात उल्लेख करण्यात आला आहे. त्यांचे सविस्तर जीवनवर्णन करण्यासाठी एका मोठ्या ग्रंथाची गरज आहे. येथे केवळ त्यांचे काही गुणवैशिष्ट्येच देत आहोत.

ते ईश्वर आणि ईश्वराचे प्रेषित मुहम्मद (स.) यांचे आज्ञाधारक, सच्चे श्रद्धावंत, नेक, चांगुलपणात पुढाकार घेणारे, प्रत्येक पुण्यकर्मात पुढे पुढे असणारे, सत्यासाठी आपले सर्वस्व अर्पित करणारे, सत्यमार्गात नातेवाईक, वतन व मायभूमी, कुटुंब-परिवार, घरदार आणि संपत्ती व सर्वकाही त्यागणारे, वैध कमाईवरच उपजीविका चालविणारे, अवैधपासून दूर राहणारे, रास्तबाज, अनामतदार, दिलेला शब्द पाळणारे, सत्यमार्गात प्रत्येक तऱ्हेच्या संकटांचा धैर्याने मुकाबला करणारे, सत्यप्रकरणात सत्याचेच समर्थन करणारे, प्रामाणिक, ईशमार्गात संपत्ती खर्च करण्याची स्पर्धा करणारे, आपल्या मुखावर आणि जिभेवर ताबा ठेवणारे, आपसात दयाळू आणि सत्यविरोधकांशी कठोर, मोठमोठे अपराध आणि निर्लज्ज वर्तनापासून दूर राहणारे,

आपल्या गरजांपेक्षा इतरांच्या गरजांना महत्त्व देणारे, व्यभिचार न करणारे, आपला संताप काबूत ठेवणारे, इतरांना मोठ्या मनाने माफ करणारे, नमाज कायम करणारे, हज करणारे, रोजे (उपवास) धरणारे, विद्या व ज्ञान मिळविणारे आणि ज्ञान शिकविणारे, सदाचार व सद्वर्तनाचे धडे देणारे, पुण्यकर्मांचा आग्रह धरणारे, वाईट कर्मांपासून रोखणारे, ईश्वराची अवज्ञा केल्यास त्याच्या होणाऱ्या नाराजी व अप्रसन्नतेचे भय बाळगणारे, ईशपरायणता जपणारे, खरी साक्ष देणारे, संकटात धैर्य व संयमाने टिकणारे, गर्व आणि फाजील अभिमान न बाळगणारे, गरीब, निराधार, अनाथ, दुर्बल, कमकुव्वत, वृद्ध, अपंग, याचक, विधवा या सर्वांची मोठ्या आस्थेने सर्वतोपरी मदत करणारे, रात्रीच्या एकांतात ईश्वरासमोर नमाज पढून अश्रू ढाळणारे व असे अनेक सद्गुणांनी विभूषित होते.

याच सद्गुणांमुळे ते ईश्वराचे लाडके आणि अत्यंत आवडते होते. त्यांच्या श्रेष्ठत्वाचा यापेक्षा मोठा पुरावा आणखीन काय असू शकतो की, दिव्य कुरआनात त्यांना ऐहिक व पारलौकिक जीवनात यशस्वीतेची शुभवार्ता देण्यात आली आणि स्पष्ट शब्दांत जाहीर करण्यात आले,

"ईश्वर त्यांच्याशी राजी झाला आणि ते ईश्वराशी राजी झाले."

(दिव्य कुरआन)

मुस्लिम व्यक्तीच्या जीवनाचा उद्देशच केवळ एवढा आहे की, त्यास ईश्वराची प्रसन्नता प्राप्त व्हावी आणि या प्रसंन्नतेमुळे त्यास परलोकात यश प्राप्त व्हावे. परंतु ज्या महान व्यक्तींना स्वयं ईश्वरानेच आपल्या राजी होण्याची शुभवार्ता दिली असेल, तर त्यांचे स्थान, प्रतिष्ठा आणि थोरवीची गणतीच कोण बरे करू शकेल ? नि:संदेह सर्व प्रेषितांनंतर जगामध्ये त्यांचीच थोरवी आहे.. तसेच अशा व्यक्तीच्या सौभाग्याबाबत कसली शंका व्यक्त केली जाऊ शकते, ज्याला प्रेषितसोबत्यांच्या मार्गदर्शनावर जीवनाची वाटचाल करण्याची ईश्वराने सुबुद्धी दिली असेल. ईशदरबारी प्रार्थना आहे की, ईश्वर संपूर्ण मुस्लिम जणसुदायास याची सुबुद्धी देवो.

आपला

'तालिब हाशमी'

१ नोव्हेंबर, १९८४

# इस्लामी विधिज्ञ माननीय अब्दुल्लाह बिन उमर (र.)

(१)

सुफियान सुरी (र.) हे इमाम शैबी (र.) यांच्याद्वारे कथन करतात की,

एकदा कुरैश कबिल्याचे चार तरूण 'पवित्र काबा' मध्ये एकत्र आले आणि चौघांनी निश्चय केला की, आपण ईश्वरदरबारी आपल्या जीवनाची सर्वांत मोठी महत्त्वकांक्षा पूर्ण करण्यासाठी प्रार्थना करुन सर्वप्रथम एक तरूण उठला आणि त्याने प्रार्थना केली,

"हे पालनकर्ता ईश्वरा ! तू महान आहेस आणि तुझ्याकडून महान गोष्टींचीच मागणी करण्यात येते. म्हणून मी तुला तुझे महाआसन, तुझे पवित्र घर, तुझे प्रेषित आणि तुझ्या पावित्र्याची शपथ देऊन प्रार्थना करतो की, मला त्या वेळेपर्यंत जिवंत ठेव की, जोपर्यंत या संपूर्ण अरब प्रदेशावर माझ्या नेतृत्वाखालील "तुझे शासन प्रस्थापित होत नाही."

यानंतर दुसऱ्या तरुणाने प्रार्थना केली,

"हे ईश्वरा ! तू विश्वाच्या प्रत्येक वस्तूचा निर्माता आहेस. शेवटी प्रत्येक वस्तू तुझ्याकडेच परतणार आहे. तुझ्या प्रभुत्वाची शपथ, प्रत्येक बाब केवळ तुझ्याच ताब्यात आहे, मला तोपर्यंत जिवंत ठेव जोपर्यंत मी इराक़चा इराकवरील तुझ्या शासनाचा प्रतिनिधी होत नाही.

यानंतर तिसरा तरूण उठला व त्याने प्रार्थना केली, "हे जमीन व आकाशाच्या स्वामी! मी तुझ्याकडे अशा गोष्टीची मागणी करतो की, ज्या गोष्टीची मागणी तुझ्या अज्ञाधारक दासांनी तुझ्याच आदेशावरून केली. मी तुला तुझी थोरवी व श्रेष्ठत्व, तुझी निर्मिती आणि हरम (ईश्वराचे घर काबा) वाल्यांची शपथ देऊन प्रार्थना करतो की, मला जगातून तोपर्यंत उठवू नकोस जोपर्यंत पूर्व-पश्चिमेवर माझे राज्य स्थापन होत नाही आणि माझ्याविरुद्ध उभा राहणाऱ्यास ठेचून काढत नाही."

यानंतर चौथा तरूण उठला आणि प्रार्थना केली, "हे ईश्वरा ! तू परमदयाळू व कृपाळू आहेस. मी तुला तुझ्या दया आणि कृपेची शपथ देऊन प्रार्थना करतो की, अंतिम निवाड्याच्या दिवशी तू मला वंचित व अपमानित करू नये. आणि पारलौकिक जीवनात स्वर्ग प्रदान कर !"

पहिले तरूण माननीय अब्दुल्लाह बिन जुबैर (र.) हे होते. दुसरे त्यांचे धाकटे बंधु माननीय मुसअब बिन जुबैर (र.) होते, तिसरा तरुण हे अब्दुल मलिक बिन मरवान आणि चौथे तरुण की, ज्यांच्या जीवनाची सर्वांत मोठी महत्त्वाकांक्षा आणि मनोकामना केवळ परलोकाची भलाई होती, ते थोर इस्लामी विधिज्ञ 'माननीय अब्दुल्लाह बिन उमर (र.) होते.

(२)

अब्दुल्लाह बिन उमर (र.) यांची गणना मुस्लिम जणसमुदायाच्या धर्मगुरुंमध्ये होते. त्यांना सामान्यत: 'इब्ने उमर (र.)' (अर्थात उमरपुत्र) या नावाने संबोधित करण्यात येते. कारण ते माननीय उमर फ़ारुक़ (र.) ज्यांच्या बाबतीत आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांनी गौरवोद्गार काढले, "माझ्यानंतर कोणी जर प्रेषित असते, तर ते माननीय उमर फ़ारूक़ (र.) असते, परंतु माझ्यानंतर कोणीही प्रेषित नाही." इब्ने उमर (र.) यांच्या आईचे नाव 'जैनब बिंते मजऊन' (र.) होते. त्या 'जमुह' परिवारातील 'मज़ऊन' यांच्या कन्या होत्या. प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या त्या सोबती श्रद्धावंतांच्या माता अर्थात प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या पत्नी सन्माननीय हफ़्सा बिन्ते उमर फ़ारूक़ (र.) मा. अब्दुल्लाह बिन उमर (र.) यांची सख्खी बहीण होती. त्यांना प्रेषितांचे सोबती असण्याचे सौभाग्य लाभले होते.

प्रमाणसिद्ध कथनानुसार, माननीय अब्दुल्लाह बिन उमर (र.) हे हिजरी सन पूर्व ११ मध्ये जन्मले आणि वयाच्या अवघ्या पाचव्या वर्षी त्यांनी इस्लामचा स्वीकार केला. पिता माननीय उमर फ़ारूक़ (र.) मुस्लिम झाल्याने ते देखील पित्याबरोबरच इस्लामच्या छत्रछायेत दाखल झाले. त्यांचे शिक्षण व प्रशिक्षण शुद्ध इस्लामच्या वातावरणात झाले. हिजरी सन १ मध्ये माननीय उमर फारूक़ (र.) यांनी आपल्या संपूर्ण परिवारासह मक्काहून मदीनेस स्थलांतर केले. या वेळी माननीय इब्ने उमर (र.) अकरा वर्षाचे होते. या कोवळ्या वयातच त्यांनी इस्लामरक्षणार्थ बदरच्या युद्धात सहभागी होण्याची प्रेषितांकडून परवानगी मागितली. परंतु वय लहान असल्याने त्यांना परवानगी नाकारण्यात आली. कारण आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) पंधरा वर्षांपेक्षा कमी वय असलेल्यांना युद्धात सामील होण्याची परवानगी देत नसत. इब्ने उमर (र.) यांचे 'बदर' च्या युद्धाच्या वेळी केवळ तेरा वर्षे वय होते. 'ओहद' च्या युद्धाच्या वेळीसुद्धा ते फक्त चौदा वर्षांचे असल्याने त्यांना धर्मयुद्धात सहभागी होण्याची परवानगी मिळाली नाही.

(३)

माननीय अब्दुल्लाह बिन उमर (र.) यांनी आपल्या जीवनात सर्वप्रथम गाजविलेले रणांगण म्हणजे 'अख़राब' चे युद्ध होय. हे युद्ध हिजरी सन ५ मध्ये झाले आणि या वेळी जीवनातील पहिले युद्ध लढताना त्यांनी आपल्या युद्धकौशल्याचे उत्कृष्ट दर्शन घडविले. हिजरी सन ६ मध्ये त्यांना 'बयअत-ए-रिझवान' अर्थात हुदैबियाच्या तहापूर्वी घेण्यात आलेल्या प्रतिज्ञेत सहभागी होण्याचे सौभाग्य लाभले होते. अशा प्रकारे ईश्वराने स्पष्ट शब्दांत आपली प्रसन्नता ज्या सोबत्यांवर व्यक्त केली, त्या प्रेषितसोबत्यांत त्यांची गणना

झाली. 'सहीह बुखारी' या हदीस संग्रहात आहे की, सौभाग्याने 'बयअत-ए-रिझवान' मध्ये सामील होण्याचा पवित्रयोग त्यांना आपल्या वडिलांपूर्वीच प्राप्त झाला. त्याचे झाले असे की, माननीय उमर (र.) यांनी त्यांना एका अन्सारी मित्राकडून घोडा आणण्यासाठी पाठविले. ते बाहेर पडले तेव्हा आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) सोबत्यांकडून प्रतिज्ञा (बयअत-ए-रिझवान) घेत होते. हे पाहताच त्यांनी प्रथम स्वत: प्रेषितांसमोर प्रतिज्ञा घेतली आणि मग पितावर्यांना कळविले. ते देखील तत्काळ प्रेषितदरबारी हजर झाले आणि 'बयअत-ए-रिझवान' चे सौभाग्य मिळविले.

'बयअत-ए-रिझवान' नंतर माननीय इब्ने उमर (र.) यांनी 'ख़ैबर', 'फ़तह', 'हुनैन', 'ताइफ़' आणि 'तबूक' या युद्धांत आदरणीय प्रेषितांच्या सोबत रणभूमी गाजविली.

इमाम बुखारी (र.) यांनी मक्का विजयाच्या वेळी एका विलक्षण घटनेचा उल्लेख केला आहे. त्यांनी लिहिले आहे की, या वेळी माननीय इब्ने उमर (र.) हे वीस वर्षांचे तरूण होते. ते विजेप्रमाणे वेगवान असलेल्या घोड्यावर स्वार होते. त्यांच्या अंगावर लहानशी चादर होती आणि हातामध्ये मोठा भाला होता. एके ठिकाणी थांबून ते घोड्यासाठी गवत कापू लागले. योगायोगाने आदरणीय प्रेषितांची त्यांच्यावर दृष्टी पडली.

प्रेषितांनी मोठ्या गौरवपूर्ण शैलीत त्यांना बोलावले, "हे अब्दुल्लाह! हे अब्दुल्लाह !!"

प्रेषितांची हाक ऐकून ते त्यांच्या पाठोपाठ मक्का शहरात दाखल झाले. माननीय उसामा बिन झैद (र.) हे प्रेषितांसोबत स्वार होते. त्याचबरोबर माननीय बिलाल (र.) आणि माननीय उस्मान बिन तलहा (र.) हे देखील त्या मोर्चात सामील होते. पवित्र 'काबागृहाच्या' प्रांगणात उंट बांधून 'काबागृहा'ची चावी मागविण्यात आली आणि पवित्र 'काबागृहा' चे द्वार उघडून तिघे जण आंत दाखल झाले. यानंतर पवित्र काबागृहात सर्व प्रथम प्रवेश करण्याचे सौभाग्य माननीय इब्ने उमर (र.) यांना मिळाले.

हिजरी सन ११ मध्ये आदरणीय प्रेषितांचा मृत्यू झाल्यावर 'इब्ने उमर (र.)' यांना अपार दु:ख झाले. या विरह दु:खामुळे त्यांनी जीवनभर आपले घरही बांधले नाही आणि एकही बाग लावली नाही. आदरणीय प्रेषितांची आठवण येताच ते ओकसाबोकशी रडत असत.

## (४)

माननीय इब्ने उमर (र.) यांच्या मनामध्ये धर्मयुद्धाची अतिशय तळमळ होती. माननीय अबू बकर (र.) यांच्या इस्लामी शासनकाळात काही कारणास्तव ते

मदीनाबाहेर पडले नाहीत. परंतु माननीय उमर फ़ारूक़ (र.) यांच्या इस्लामी शासनकाळात त्यांनी ईराण, सीरिया आणि इजिप्तच्या विजयात आपला सहभाग नोंदविला. त्यांचे पिता माननीय उमर (र.) हे स्वत: इस्लामी शासक असतानादेखील ते एक सामान्य योद्ध्याप्रमाणे इस्लामी लष्करात भरती झाले. त्यांनी कधीच कोणत्याही शासकीय पदाची लालसा बाळगली नाही. 'वाक़दी' या इतिहासतज्ञाने बऱ्याच ठिकाणी त्यांचे युद्धकौशल्य आणि प्राणपणाला लावून शत्रूंशी झुंज देण्याचा उल्लेख केला आहे.

हिजरी सन २३ च्या शेवटच्या काळात इस्लामी शासक उमर फ़ारूक़ (र.) यांच्यावर प्राणघातक हल्ला करण्यात आला आणि त्यांच्या जीवित राहण्याची आशा उरली नाही. तेव्हा त्यांनी आपला उत्तराधिकारी निवडण्याची जबाबदारी मुस्लिम समुदायाच्या स्वाधीन केली. या गटामध्ये प्रतिष्ठित, विवेकशील व ईशपरायण असलेले प्रेषितसोबती होते. माननीय इब्ने उमर (र.) हे इस्लामी शासक उमर फ़ारूक़ (र.) यांचे पुत्र आणि हरतऱ्हेची शासनपात्रता व ईशपरायणता त्यांच्यात असूनसुद्धा माननीय उमर फ़ारूक़ (र.) यांनी त्यांना इस्लामी शासनाची धुरा सोपविली नाही. त्यांना 'पित्यानंतर पुत्र' अशा प्रकारची घराणेशाही मुळीच पसंत नव्हती. म्हणून मृत्यूपूर्वीच त्यांनी कडक सूचना दिली की, "माझा पुत्र इब्ने उमर (र.) हा इस्लामी शासक निवडण्याच्या समितीस केवळ आपले मत व अभिप्रायच देऊ शकतो, परंतु इस्लामी शासन सांभाळण्याकरिता त्याचे नाव मुळीच सुचविता येणार नाही." माननीय उस्मान (र.) यांनी आपल्या इस्लामी शासनकाळात माननीय इब्ने उमर (र.) यांच्यासमोर न्यायाधीशाचे पद स्वीकारण्याची विनंती केली, परंतु त्यांनी हे पद स्वीकारले नाही. 'बलाजुरी (र.)' या इतिहासकारांनी 'फ़तहुल बलदान' या ग्रंथात लिहिले की, हिजरी सन २७ मध्ये इस्लामी शासक उस्मान (र.) यांनी आफ्रिकेच्या ट्यूनेशिया, अलजझायर आणि मोरॅक्को या प्रदेशांवर स्वाऱ्या केल्या, तेव्हा इब्ने उमर (र.) यांनी या युद्धात मोठ्या आवेशाने रणभूमी गाजविली. 'इब्ने यसीर (र.)' या इतिहासकाराने लिहिले आहे की, हिजरी सन ३० मध्ये त्यांनी खुरासान आणि तब्रिस्तानच्या धर्मयुद्धातही भाग घेतला.

इमाम हाकिम (र.) यांनी आपल्या 'मुस्तदरक' या ग्रंथात लिहिले आहे की, इब्ने उमर (र.) यांच्या वयाच्या शेवटच्या काळात उमैया परिवाराचे जुलमी शासन होते. अब्दुल्लाह बिन जुबैर (र.) यांनी इस्लामी शासनाची मक्का शहरात धुरा सांभाळली होती. उमैया परिवाराचा कठोरहृदयी शासक 'अब्दुल मलिक बिन मरवान' याने अब्दुल्लाह बिन जुबैर यांचे बंड ठेचून काढण्यासाठी क्रूरकर्मा 'हिज्जाज बिन यूसुफ़' यांची नियुक्ती केली होती. 'अब्दुल मलिक बिन मरवान' आणि प्रेषितसोबती 'अब्दुल्लाह बिन जुबैर (र.)' यांच्या दरम्यान यादवीने उग्र स्वरुप धारण केले होते. 'अब्दुल्लाह बिन जुबैर (र.)' यांना

पराभूत करण्यासाठी हिज्जाज बिन यूसुफने पवित्र 'काबागृहा'वर दगडांचा तीव्र वर्षाव केला. ही घटना माननीय इब्ने उमर (र.) यांना माहीत होताच त्यांनी 'हिज्जाज बिन यूसुफ़चा' खरपूस समाचार घेतला. समाजात प्रतिष्ठित असलेल्या इब्ने उमर (र.) यांचा उघडपणे वध करण्याची त्याची हिम्मत नसल्याने त्याने विषात भिजवलेला भाला देऊन हस्तकास सांगितले की, 'हज'च्या वेळी हा विषारी भाला इब्ने उमर (र.) यांच्या पंज्यात मारून गर्दीचा फायदा घेऊन पसार व्हावे.' ठरलेल्या कूटनीतीप्रमाणे त्या हस्तकाने 'हज'च्या वेळी त्यांच्या पायात गुपचुपपणे भाला मारला व गुपचूप पसार झाला. शेवटी याच विषारी भाल्याच्या जखमेने ते काही काळानंतर स्वर्गवासी झाले.

माननीय इब्ने उमर (र.) यांच्या सत्यसमर्थक, सडेतोड़ भाषणशैलीने आणि परखड वागण्यामुळे ते उमैया परिवाराच्या 'अब्दुल मलिक बिन मरवान' या शासकास नकोसे झाले होते. त्याच्या अरेरावी राज्यकारभारात सत्यवचनी आणि सद्‌वर्तनी इब्ने उमर (र.) एक भलेमोठे अडसर होते. 'हिज्जाज बिन यूसुफ़' या अतिक्रूर असलेल्या 'अब्दुल मलिक बिन मरवान'च्या राज्यपालाच्या डोळ्यात ते एखाद्या विषारी काट्याप्रमाणे सलत. परंतु रयतेची नाराजी ओढवण्याच्या भीतीने इब्ने उमर (र.) यांच्यासमोर 'ब्र' काढण्याची त्याची हिंमत होत नसे.

इब्ने यसीर (र.) या इतिहासकारांनी लिहिले आहे की, एकदा राज्यपाल हिज्जाज बिन यूसुफ़ हा जुमाच्या (शुक्रवारच्या) नमाजपूर्वी सरकारी भाषण देत होता. त्याचे भाषण इतके लांबलचक झाले की, जुमाच्या नमाजची विधीवृत वेळ संपण्याच्या मार्गावर होती. समोर बसलेल्या माणसांपैकी कोणाचीच हिंमत त्याला थांबविण्याची नव्हती. परंतु इब्ने उमर (र.) यांना राहवले नाही आणि त्यांनी उभे राहून त्यास दरडावले, ''भाषण बंद कर! सूर्य हा मावळण्याकरिता तुझ्या आदेशाची वाट पाहणार नाही !'' आधीच संतापी वृत्तीचा पाषाणहृदयी असलेला क्रूरकर्मा 'हिज्जाज बिन यूसुफ़' संतापाने लाल भड़क झाला आणि इब्ने उमर (र.) यांच्याशी वैर घेतले. शेवटी हिज्जाज बिन यूसुफ़ने त्यांचा काटा काढूनच टाकला.

माननीय इब्ने उमर (र.) यांची मनोकामना होती की, त्यांचा स्वर्गवास मदीना शहरी व्हावा. परंतु दैवाने त्यांच्या जीवनाचा अंत मक्का शहरात केला. मृत्युपूर्वी त्यांनी आपले पुत्र सालिम (र.) यांना सूचना केली की, ''मला पवित्र काबागृहाच्या हद्दीच्या बाहेर दफन करण्यात यावे. त्यांच्या पुत्राने पित्याची अंतिम इच्छा पूर्ण करण्याचा प्रयत्न केला, परंतु हिज्जाज बिन यूसुफ़ने ती पूर्ण होऊ दिली नाही. त्याने 'फतह-ए-मुहाजिरीन'च्या कब्रस्तानात त्यांना दफन केले.

(५)

माननीय अब्दुल्लाह बिन उमर (र.) हे इस्लामी विधीशास्त्रात आणि इस्लामी ज्ञान संशोधनात पारंगत असलेल्या प्रेषितांच्या थोर विद्वान सोबत्यांपैकी होते. त्यांना वर्षानुवर्षे प्रत्यक्षपणे आदरणीय प्रेषितांकडून शिक्षण-प्रशिक्षण तर मिळालेच, शिवाय माननीय उमर (र.) त्यांचे पिता असल्याने त्यांच्यात इस्लामी स्वभाव आणि सद्वर्तनाचे वडिलांकडूनही धडे मिळाले. यामुळे ते ज्ञानविद्येच्या एवढ्या उंच शिखरावर विराजमान झाले की, इतर सर्व प्रेषितसोबतीसुद्धा त्यांच्या ज्ञानास प्रमाण समजत असत. दिव्य कुरआनचा गंभीरपणे अभ्यास करण्यात त्यांच्या जीवनाचा मोठा भाग खर्च झाला. इमाम मालिक (र.) यांनी आपल्या जगप्रसिद्ध 'मौत्ता' या ग्रंथात लिहिले आहे की, त्यांनी दिव्य कुरआनच्या 'सूरह-ए-बक़रा'च्या संशोधनात्मक अभ्यासावर जीवनाची चौदा वर्षे खर्च केली. आदरणीय प्रेषितांच्या काळात त्यांना प्रेषितांच्या थोर ज्ञानी सोबत्यांच्या ज्ञानसभेत भाग घेण्याचे सौभाग्य लाभत असे. अशा प्रकारे त्यांना दिव्य कुरआनचे अर्थ स्पष्ट करण्याच्या कौशल्यात असामान्य पात्रता लाभली होती.

'सहीह बुखारी' या हदीस (प्रेषितवचने) ग्रंथात आहे की, एकदा आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) आपल्या सोबत्यांना इस्लामी शिकवणी समजावीत होते. माननीय इब्ने उमर (र.) हे देखील या सभेत बसले होते. आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांनी दिव्य कुरआनची ही आयत पठण केली,

"तुम्ही पाहत नाही काय की, ईश्वराने कशा प्रकारचे उदाहरण देऊन वर्णन केले आहे की, जसे एक पवित्र झाड, ज्याचे मूळ अतिशय मजबूत आणि ज्याच्या फांद्या आकाशास भिडलेल्या आहेत. जो आपल्या ईश्वराच्या आदेशावर प्रत्येक समयी फळे आणि मेवे देत असतो." (सूरह-ए-इब्राहीम)

यानंतर आदरणीय प्रेषितांनी सोबत्यांना विचारले, "यामध्ये कोणत्या झाडाचे उदाहरण देण्यात आले आहे ? सगळेच सोबती गुपचुप बसले. नंतर स्वत: प्रेषितांनीच म्हटले, "यामध्ये खजुरीच्या झाडाचे उदाहरण देण्यात आले आहे !" हे ऐकून माननीय अब्दुल्लाह बिन उमर (र.) आपल्या पित्या (माननीय उमर फारुक़ (र.)) कडे येऊन म्हणाले की, 'माझ्या लक्षात आलेच होते की हे खजुरीच्या झाडाचे उदाहरण आहे. परंतु थोर, बुजुर्ग व वडीलधारी सोबती सभागृहात उपस्थित असल्याने त्यांच्यासमोर उत्तर देण्याचे माझे धाडस झाले नाही.' माननीय उमर फारुक़ (र.) उत्तरले की, "बाळा ! तू जर उत्तर दिले असते, तर मला खूप आनंद झाला असता !"

दिव्य कुरआनप्रमाणेच हदीसशास्त्रात (प्रेषितवचन शास्त्रात) ते कमालीचे पारंगत होते. त्यांच्याकडून '१६३०' एवढ्या प्रचंड संख्येत प्रेषितवचने कथन करण्यात आली आहेत. यापैकी १७० प्रेषितवचने (हदीस) 'बुखारी' आणि 'तिर्मिजी' या दोन्ही

हदीसग्रंथात, तसेच ८१ एकट्या 'सहीह बुखारी' ग्रंथात, ३१ वचने 'सहीह मुस्लिम' या हदीस ग्रंथात, तर बाकीची वचने इतर हदीस ग्रंथात संग्रहित करण्यात आली आहेत. अशा रितीने 'हदीस'च्या मुखपाठकांत ते अग्र स्थानावर विराजमान होते. या शिवाय त्यांना माननीय अली (र.), माननीय आयशा (र.) (प्रेषितांच्या सौभाग्यवती पत्नी), माननीय हफ्सा (र.) (प्रेषितांच्या सौभाग्यवती पत्नी), माननीय अब्दुल्लाह बिन मसऊद (र.) माननीय बिलाल (र.), माननीय सुहैब रुमी (र.), माननीय झैद बिन साबित (र.) आणि माननीय राफेअ बिन ख़दीज (र.) सारखे थोर आणि हाडाचे शिक्षक असलेल्या विद्वान 'प्रेषितसोबत्यांकडून' इस्लामचे शिक्षण व प्रशिक्षण मिळाले होते. त्याचप्रमाणे सालिम (र.), उबैदुल्लाह (र.), मुहम्मद (र.) जाफ़ेअ (र.), हफ्स (र.) उरवा बिन जुबैर (र.), मूसा बिन तलहा (र.), अबु सलमा बिन अब्दुर्रहमान (र.), सईद बिन मुसैअब (र.), क़ासिम (र.), अबु दरदा (र.), सईद बिन यसार (र.), अक्रमा (र.), मुजाहिद (र.), सईद बिन जबीर (र.), ताऊस (र.), अता (र.), अबू ज़बैर (र.) आणि अबी मलिका (र.) सारख्या प्रगल्भित विद्वानांचा त्यांच्या शिष्यगणांत समावेश आहे.

फ़िक़्ह (इस्लामी विधी) ज्याच्यावर इस्लामी धर्मशास्त्राची भिस्त आहे, माननीय इब्ने उमर (र.) यामध्येसुद्धा खूप पारंगत होते. माननीय इब्ने उमर (र.) यांचा बराच वेळ विधीशास्त्राच्या अभ्यासात, तसेच लोकांना धार्मिक शिकवण देण्यात व इस्लामी विधीनुसार फतवे देण्यात व्यतीत होत असे. 'हाफ़िज़ क़य्यिम (र.)' यांचे कथन आहे की, त्यांचे फतवे जमा केल्यास एक मोठा ग्रंथच तयार होईल. इमाम मालिकी यांच्या विधीशास्त्रात इब्ने उमर (र.) यांचेच जास्त पुरावे आणि प्रेषितकथने आहेत. आपल्या विधीशास्त्रातील पारंगततेमुळे त्यांना 'फक़ीहुल उम्मत' (मुस्लिम समुदायाचे विधिज्ञ) म्हटले जाते.

धार्मिक विद्यांशिवाय माननीय इब्ने उमर (र.) हे अरबजणांतील इतर विद्यांमध्येसुद्धा पारंगत होते. अरबी साहित्य, भाषणकौशल्य आणि शिक्षणशास्त्रात त्यांना विशेष प्राविण्य होते. इब्ने साअद (र.) म्हणत असत की, त्या काळचे लोक प्रार्थना करीत असत की, "ईश्वरा! आमचे जीवन असेपर्यंत इब्ने उमर (र.) यांना जिवंत ठेव, जेणेकरून आम्हास त्यांचे मार्गदर्शन लाभावे. आज त्यांच्यापेक्षा जास्त प्रेषितकाळाचा जाणकार इतर कोणीच नाही."

(६)

माननीय अब्दुल्लाह बिन उमर (र.) हे प्रेषितप्रेमी, प्रेषित जीवनचरित्रानुसार आचरण करणारे, ईशपरायण, धर्मयुद्धात रणभूमी गाजविण्याची मनोकामना, त्यागभावना, दानशूरता, नम्रता, विनयशीलता, निस्पृहता, साधेपणा आणि परखड भाषणशैली व यासारख्या अनेक गुणधर्मांचे स्वामी होते.

आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांच्यावर इतके प्रेम होते की, ते आपल्या जीवनाचा बराच वेळ प्रेषितांच्या संगतीमध्येच व्यतीत करीत असत. आदरणीय प्रेषितांनी जगाचा निरोप घेतल्यानंतर त्यांना अपार दुःख झाले. प्रेषितांची आठवण येताच त्यांचे अश्रू अनावर होत असत. प्रेषितकाळातील युद्धभूमीवरून गुजरताना त्यांना प्रेषितकाळ आठवत असे आणि त्यांच्या दुःखास पारावार राहत नसे. यह्या बिन यह्या (र.) म्हणतात की, ''मी आपल्या धर्मशिक्षकांकडून ऐकले की, काही लोक इब्ने उमर (र.) यांचे प्रेषितप्रेम पाहून असे समजत असत की जणू ते प्रेषितप्रेमात वेडे झाले आहेत.'' खरे पाहता माननीय इब्ने उमर (र.) यांचे जीवन प्रेषितप्रेमामुळे प्रेषितमय झाले होते. त्यांनी जीवनाचे प्रत्येक पाऊल प्रेषितांच्या पाऊलखुणांवर टाकले व प्रेषित जीवन चरित्रानुसारच आपले जीवन व्यतीत केले. प्रवासामध्येसुद्धा प्रेषितांनी नमाज अदा केलेल्या ठिकाणी नमाज अदा करीत असत. प्रेषितांनी आराम केलेल्या ठिकाणी आराम करीत असत. ज्या ठिकाणी प्रेषितांनी थोडा वेळ व्यतीत केला असेल, त्या ठिकाणी मुद्दाम थांबत असत. ज्या ज्या झाडाखाली प्रेषितांनी थंड सावलीत विश्रांती घेतली असेल, त्या झाडांना पाणी देत असत. प्रवासातून परतल्यावर सर्वप्रथम प्रेषितांच्या दफनस्थळी सलाम करीत असत. मदीना शहरावर एवढे प्रेम होते की, कोणत्याही परिस्थितीत ते शहर सोडायला तयार नसत. एकदा त्यांच्या गुलामाने आर्थिक तंगीमुळे मदीना शहर सोडण्याची परवानगी मागितली, तेव्हा इब्ने उमर (र.) म्हणाले, 'आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले की,

''जो माणूस मदीना शहरात राहून येणाऱ्या समस्यांना धैर्याने तोंड देईल, अंतिम निवाड्याच्या दिवशी मी त्यांची (मोक्ष मिळण्यास्तव ईशदरबारी) शिंफारस करेन !''

आदरणी प्रेषितांच्या संतती व नातलगांवरही त्यांचे खूप प्रेम होते. ते सर्वांना नेहमीच 'प्रेषितसंतती'च्या श्रेष्ठत्वाची जाण करून देत असत. ही बाब सर्वमान्य आहे की, माननीय इब्ने उमर (र.) हे 'हज' विधीचे ज्ञाते होते. याचे कारणदेखील हेच आहे की, ते 'हज' ची विधी आदरणीय प्रेषितांच्या प्रणालीवर अगदी तंतोतंत पूर्ण करीत असत. एवढेच नव्हे तर आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) ज्या मार्गाने हज यात्रा करीत, इब्ने उमर (र.) सुद्धा त्याच मार्गाने हज यात्रा करीत असत. आदरणीय प्रेषित 'ज़ुल हलीफ़ा' या ठिकाणी थांबून नमाज़ अदा करीत असल्याने इब्ने उमर (र.) सुद्धा त्याच ठिकाणी थांबून नमाज अदा करीत असत. प्रवासात ज्या ज्या ठिकाणी प्रेषितांनी पड़ाव टाकला, त्या ठिकाणी पड़ाव टाकत असत. 'सहीह बुखारी' या ग्रंथात आहे की, आदरणीय प्रेषित कधी घोड्यावर व कधी पायी मस्जिद-ए-कुबामध्ये दाखल होत असत, इब्ने उमर (र.) सुद्धा तसेच करीत असत. 'बतहा' या ठिकाणी प्रवेश करण्यापूर्वी

आदरणीय प्रेषित थोडा वेळ झोपत असत, इब्ने उमर (र.) सुद्धा असेच करीत असत. आदरणीय प्रेषित आपल्या लाडक्या सोबत्यांचे जेवणाचे निमंत्रण नेहमी स्वीकारत असत. इब्ने उमर (र.) सुद्धा कोणाच्याही निमंत्रणास नाकारत नसत. जीवनाच्या सर्वच कामात व कार्यात ते आदरणीय प्रेषितांच्या जीवनशैलीचे तंतोतंत पालन करीत असत.

माननीय इब्ने उमर (र.) यांचे अंत:करण अतिशय मृदु आणि नाजुक होते. ईशपरायणता आणि अंतिम निवाड्याच्या दिवसाच्या काळजीने ते थरथर कापत असत. अंतिम निवाड्यासंबंधी आणि ईश्वराच्या जाब विचारण्यासंबंधीचा कुरआनात आलेल्या उल्लेखावर ते चिंतित होऊन अश्रू ढाळत असत. एके दिवशी माननीय उबैद बिन उमर (र.) यांच्या तोंडून दिव्य कुरआनची ही आयत ऐकली,

''हे प्रेषित ! परलोक च्या या दिवशी काय अवस्था होईल, जेव्हा आम्ही प्रत्येक जनसमुदायातून एक साक्षीदार उभा करू आणि आपणास या सर्वांसाठी साक्षीदार ठरवू.''

ही आयत ऐकताच इब्ने उमर (र.) हे पारलौकिक चिंतेने रडू लागले. त्यांच्या अश्रूमुळे त्यांची दाढी आणि अंगरखा भिजून गेला.

त्यांच्या मनात धर्मयुद्धाची तीव्र मनोकामना होती. वयाच्या पंधरा वर्षांपासून शेवटच्या काळात धर्मयुद्धात मोठ्या हिरीरीने सहभागी होत असत. त्यांचे राहणीमानही खूप साधे होते. ते नेहमी स्वत:ची कामे स्वत:च करीत असत. अगदी साधा पोषाख वापरत असत. कधी कधी उंची पोषाख देखील वापरत, कारण त्यांनी दोन वेळा आदरणीय प्रेषितांना उंची पोषाख वापरताना पाहिले होते.

## (७)

'सहीह बुखारी' ग्रंथात आहे की, त्यांच्याकडे बरीच शेती होती. त्यातून मिळणारे उत्पन्न ते रंजल्यागांजल्यांवर सढळ हाताने खर्च करीत. दीनदुबळे आणि पददलितांना पाहून त्यांचा आत्मा खूप तळमळत असत. कोणत्याही याचकास ते दारावरून परत करीत नसत. कित्येक गोरगरिबांचा उदरनिर्वाह त्यांच्या कमाईवर चालत असत. सामान्यत: एकटे कधीच जेवत नसत. एखादातरी गरीब पामर सोबत घेऊनच जेवत असत कधीकधी तर स्वत: उपाशी राहून दुसऱ्यांना पोटभर जेऊ घालत असत.

एकदा आजारी पडले. एका दिरहमचे काही द्राक्षे खाण्यासाठी घेतले. एवढ्यात एक याचक दारावर आला. त्यांनी ते द्राक्षे त्या याचकास दान करून टाकले. घरच्यांनी सांगितले की, द्राक्षे कशाला दिले, दुसरे काहीही खाद्यान्न त्यास दिले असते, परंतु त्यांनी घरच्यांचे न ऐकता त्यास द्राक्षे देऊन टाकले.

'तबकात इब्ने साअद' या ग्रंथात आहे की, एकदा त्यांच्याकडे एक हजार दिरहम (जवळपास एक लाख रुपये) आले. त्यांनी दोन्ही हातांनी लोकांना दान करून टाकले. दिरहम संपल्यावर त्यांनी लोकांकडून कर्ज घेऊन दान केले.

ते बऱ्याच वेळा उपवास धरीत असत. परंतु घरी पाहुणे आल्यास ते (ऐच्छिक) उपवास तोडून टाकत असत. आणि म्हणत की, 'पाहुण्यासमोर उपवास ठेवणे पाहुणाचाराच्या शिष्टाचाराविरुद्ध आहे.

हाफीज इब्ने हजर अस्क़लानी (र.) यांनी 'इसाबा' या ग्रंथात लिहिले आहे की, माननीय इब्ने उमर (र.) हे दररोज दोनदोन-तीनतीन हजार दिरहम दान करीत असत. (सध्याचे तीन ते चार लाख रुपये) आणि कधीकधी तर वीस ते तीस हजार दिरहम एकाच वेळी दान करीत असत.

त्यांना एखादा गुलाम अथवा दासी ईशपरायण दिसली की, ते त्यांना त्यांची खरेदी किंमत देऊन मुक्त करीत असत. अशा प्रकारे त्यांनी आपल्या जीवनात एक हजारपेक्षा जास्त गुलाम आणि दास्यांना खरेदी किंमत देऊन मुक्त केले.

एकदा इब्ने उमर (र.) आपल्या मित्रांसह शहराबाहेर फिरायला गेले. दुपारी जेवणाची वेळ झाली. एवढ्यात एक गुराखी शेळ्या घेऊन जाताना दिसला. इब्ने उमर (र.) यांनी त्यास जेवणाचे निमंत्रण दिले. त्यावर गुराखी म्हणाला, 'मला उपवास आहे.' इब्ने उमर (र.) यांनी सांगितले, 'एवढ्या रखरखत्या उन्हात तू उपवासही धरतो आणि बकऱ्यादेखील चारतोस. बरे एक सांग, तू दोन-चार शेळ्या आम्हाला विकून टाक.' गुराखी म्हणाला, "या शेळ्या माझ्या मालकाच्या आहेत. मी चोरी कशी काय करू?" इब्ने उमर म्हणाले, "तुझ्या मालकाला सांगून दे की लांडगा घेऊन गेला.' गुराख्याने आकाशाकडे बोट दाखवून सांगितले, "ईश्वरास काय उत्तर देऊ ?" असे म्हणून तो लगबगीने आपल्या शेळ्या घेऊन निघून गेला. माननीय इब्ने उमर (र.) यांना त्याचे सद्वर्तन खूप आवडले. त्यांनी थेट त्याच्या मालकाचे घर गाठले व त्या ईशपरायण गुराख्यास मुक्त करून, पूर्ण शेळ्या खरेदी केल्या व गुराख्याच्या स्वाधीन केल्या.

एकदा प्रवासात असताना त्यांना एक खेडूत भेटले. इब्ने उमर (र.) यांनी पटकन घोड्यावरून उतरून त्यांना आलिंगन दिले आणि आपल्या डोक्यावरील फेटा आणि घोडा त्यांना भेट म्हणून दिला. सहप्रवाशाने विचारले की, 'इतक्या महागड्या वस्तू देण्याची काय गरज होती, खेडूत लोक तर हलक्याशा भेटवस्तूंनीसुद्धा आनंदीत होत असतात'. इब्ने उमर (र.) म्हणाले, "ते माझ्या स्वर्गवासी वडिलांचे मित्र आहेत. आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांना असे म्हणताना मी ऐकले की, सर्वांत मोठे पुण्य हे आपल्या पित्याच्या मित्रांशी सद्वर्तन करणे होय !"

माननीय इब्ने उमर (र.) यांच्याकडील गुलाम मुक्त होण्यासाठी ईशपरायणतेचा आव आणत असे आणि इब्ने उमर (र.) त्यांना मुक्त करीत असत. एकाने त्यांना जाणीव करून दिली की, हे गुलाम खरे ईशपरायण नसून आपण मुक्त करावे म्हणून ईशपरायणतेचा आव आणून आपणास धोका देत आहेत. इब्ने उमर (र.) म्हणाले, "यातच मी स्वत:स धन्य समजतो. जे लोक उपासनेच्या मार्गाने आम्हास धोका देतात, आम्हीदेखील हा धोका आनंदाने स्वीकारतो."

त्यांच्या हातून निघालेला पैसा ते परत कधी घेत नसत. माननीय अता (र.) कथन करतात की, ''एकदा मी त्यांना दोन हजार दिरहम कर्ज दिले होते. त्यांनी ते परत केल्यावर वजन करून पाहिल्यास त्यांचे वजन दोन हजार दिरहमच्या प्रमाणित वजनापेक्षा जास्त निघाले. मी त्यांना याची कल्पना देऊन त्यांना अगाऊ वजनाचे जास्त आलेले दिरहम परत घेण्यास सांगितले. यावर ते म्हणाले, ''आता मी हे परत घेणार नाही. जी अगाऊ रक्कम तुम्हास मिळाली ती तुमचीच आहे.''

बऱ्याच वेळा ते आपल्यासाठी तयार केलेले जेवण गरिबांना देत असत. म्हणून त्यांची प्रकृती क्षीण झाली होती. लोकांनी त्यांच्या पत्नीस सांगितले की, ''तुम्ही त्यांच्या आरोग्याकडे नीट लक्ष देत नाही''. यावर त्यांची पत्नी म्हणाली, 'मी तरी काय करू ! त्यांच्यासाठी मी चांगल्या प्रतीचा स्वयंपाक करून देते, परंतु ते स्वत: न खाता गरिबांना देऊन टाकतात.' त्यांची ही सवय पाहून जेव्हा ते मस्जिदीच्या बाहेर निघत, तेव्हा त्यांच्या वाटेत बरेच दीनदलित रांग लावून उभे राहत असत. ते या सर्वांना आपल्याबरोबर घरी घेऊन जात आणि पोटभर जेवण करवूनच परत पाठवीत असत. एके दिवशी त्यांच्या पत्नीने जेवणाचे डबे तयार करून याचकांच्या घरी पाठविले आणि बजावले की, ''आता यापुढे त्यांच्या रस्त्यात उभे राहात जाऊ नका. त्यांनी बोलावले तरी येऊ नका.'' माननीय इब्ने उमर (र.) जेव्हा दुसऱ्या दिवशी मस्जिदमधून बाहेर पडले, तर रस्त्यात नित्यनेमाप्रमाणे त्यांना गरीब व अनाथांची अनुपस्थीती दिसली. ते खूप व्यथित झाले. घरी आल्यावर त्यांना सर्व हकीकत कळाली. ते पत्नीवर खूप संतापले आणि म्हणाले, ''तुला काय वाटते की माझ्या भोजणपत्रावर गरीब व अनाथांनी जेऊ नये आणि त्यामुळे मीदेखील उपाशी राहावे ?'' त्यांनी त्या दिवशी अन्नपाणी न घेताच रात्र काढली.

## (८)

विद्या, ज्ञान, प्रतिष्ठा, संपत्ती व समृद्धी असतानासुद्धा त्यांच्यात खूप नम्रता आणि विनयशीलता होती. ज्ञान, प्रतिष्ठा, संपत्ती आणि दानशूरतेचा त्यांना मुळीच गर्व नव्हता. ते नम्रता आणि उच्च नैतिकतेचे मूर्त स्वरूप होते. ते स्वत:हून लोकांना सलाम करण्यात पुढाकार घेत असत. लहान-मोठा, गरीब-श्रीमंत व मालक-नोकर यांच्यात ते कोणताच भेदभाव पाळत नसत. ते म्हणत असत की, 'मी बाजारात यासाठी निघत असतो की, मी लोकांना सलाम करावे आणि बदल्यात त्यांनी मला सलामाचे उत्तर द्यावे. अर्थात माझ्यासाठी सलामती व सुरक्षेची प्रार्थना करावी.

'मुसनद अहमद' या ग्रंथात आहे की, त्यांना स्वत:ची प्रशंसा मुळीच आवडत नसे. एकदा एका माणसाने त्यांची प्रशंसा त्यांच्या तोंडावर केली. त्यांचा राग अनावर झाला व जमिनीची माती उचलून त्याच्या तोंडावर मारली आणि म्हणाले की, ''आदरणीय प्रेषितांनी म्हटले की, तोंडावर प्रशंसा करणाऱ्या लाळघोट्यांच्या तोंडावर माती फेकून मारावी.''

एकदा त्यांच्या एका चाहत्याने त्यांना उंची पोषाख भेट म्हणून दिला. परंतु इब्ने उमर (र.) यांनी असे सांगून स्वीकारला नाही की, ''यामुळे आमच्या स्वभावात फाजील अभिमान आणि इतरांपेक्षा श्रेष्ठत्वाची भावना निर्माण होण्याची भीती आहे.''

आपले गुलाम आणि नोकरचाकरांची ते परिवारजणांप्रमाणेच काळजी घेत असत. त्यांच्याशी गुलाम व नोकरांसारखा कधीच व्यवहार करीत नसत. प्रत्येक वस्तू सोबत घेऊन खात असत आणि आपल्या प्रत्येक सुखात त्यांना सहभागी करून घेत व त्यांच्या प्रत्येक दु:खात स्वत: सहभागी होत. एकदा त्यांच्या गुलामांना जेवण वाढण्यासाठी घरच्यांकडून उशीर झाला. यावर ते खूप नाराज झाले आणि म्हणाले, 'नोकर व गुलामांना उपाशी ठेवणे हे खूप मोठे पाप आहे.'

भोजण करतेवेळेस दुसऱ्याचा गुलाम जरी आला तर त्यास भोजण करवूनच पाठवित असत. तसेच आपल्या गुलामांना सूचना देऊन ठेवल्या की, मला पत्र लिहितेवेळेस माझ्या नावापूर्वी तुम्ही स्वत:चे नाव लिहावे. त्या काळी परंपरा अशी होती की, आधी स्वामीचे व नंतर गुलामाचे नांव लिहिण्यात येई. (संदर्भ : सहीह मुस्लिम)

ते आपल्या विनयशील आणि नम्र स्वभावामुळे व उच्च नीतिमत्तेमुळे सामान्यजणांमध्ये इतके प्रिय झाले होते की, लोक त्यांची येण्याची अक्षरश: वाट पाहात असत. एकदा त्यांच्यासोबत मुजाहिद (र.) होते. त्यांना उद्देशून म्हणाले की, 'लोकांचे माझ्यावर एवढे प्रेम आहे की, माझ्या जवळील सोन्या-चांदीच्या संपत्तीच्या बदल्यातही मी एवढे प्रेम खरेदी करू शकणार नाही.

(९)

माननीय इब्ने उमर (र.) यांच्यात निस्पृहतेचा मोठा गुणधर्म आढळतो. प्रेषित जीवनचरित्रानुसार जीवन जगण्यासाठी ते इतरांची भेट अवश्य स्वीकार करीत असे. परंतु आपल्या गरजेस्तव कोणासमोर हात देखील पसरवीत नसत. माननीय इब्ने साअद (र.) यांनी त्यांचे कथन कथित केले आहे की, ''मी कोणालाही काहीच मागत नाही. परंतु कोणी काही दिलेच तर परतही करीत नाही.'' एकदा त्यांची आत्या सन्माननीय रमला (र.) यांनी त्यांना दोनशे दिरहम पाठविले. त्यांनी त्यांचा साभार स्वीकार केला व त्यांना आशीर्वाद दिले.

एकदा अब्दुल अज़ीज़ बिन रशीद याने त्यांना पत्रात लिहिले की, 'तुमची एखादी गरज असेल तर मला कळवावी मी तुमची अडचण दूर करीन.' यावर त्यांनी पत्राच्या उत्तरात लिहिले की, 'मी आदरणीय प्रेषितांकडून ऐकले की, 'आपल्या परिवारजणांपासून (देवाणघेवाणीची) सुरुवात करावी आणि देणारा हात घेणाऱ्या हातापेक्षा श्रेष्ठ असतो. मी तुमच्यासमोर मागणीही करणार नाही आणि आपण काही दिल्यास नाकारणारदेखील नाही.

एकदा माननीय अमीर मआविया (र.) यांनी त्यांना एक लाखाची रक्कम एका विशेष उद्दिष्टासाठी पाठविली परंतु त्यांनी स्वीकारली नाही.

धनदौलत आणि संपत्तीची त्यांच्या नजरेत कवडी किंमत नव्हती. त्यांना मिळालेल्या भेटवस्तूंमध्ये त्यांना थोडी जरी शंका आली की, या भेटकार्यात प्रामाणिकता नसून स्वार्थ लपलेला आहे, तर ते भेटीचा वापर मुळीच करीत नसत.

(१०)

माननीय इब्ने उमर (र.) यांनी मुस्लिम समुदायाच्या अंतर्गत कलहांमध्ये कधीच भाग घेतला नाही. सरकार विरोधातही कोणती भूमिका घेतली नाही. सत्यसमर्थनात कुठलेही भय न बाळगता सडेतोडपणे आपली भूमिका मांडत असत. ते बादशाहचीसुद्धा कानउघाडणी करीत असत. यामुळेच तर त्यांना प्राण गमवावे लागले.

माननीय इब्ने उमर (र.) हे मोठे विद्वान आणि विचारवंत होते. इतिहासकारांनी त्यांचे काही सुविचारदेखील ग्रंथामध्ये कथन केले आहेत, ते याप्रमाणे,

१) सर्वांत सोपे पुण्यकर्म हे माणसांशी आनंदाने भेटणे आणि त्यांच्या आत्म्यास शांती प्रदान करणाऱ्या पद्धतीने बोलणे होय.

२) विद्या व ज्ञान मिळवा मग शत्रूकडूनही का असेना.

३) दुसऱ्यांच्यातील दुर्गुण शोधण्यापूर्वी स्वत:मधील दुर्गुण शोधावे.

४) आपला संताप असा गिळावा जसे आपण मधुर रस पितो.

५) एखादा माणूस ईश्वराच्या दृष्टीत कितीही श्रेष्ठ का असेना, परंतु त्यास जर ऐहिक संपत्तीचा थोडा भाग जरी मिळाला, तर ईश्वराजवळील त्याचा दर्जा खालावतो.

६) माणूस केवळ अशा प्रसंगीच विद्वानांच्या रांगेत उभा असण्याच्या लायकीचा होतो की, जेव्हा तो आपल्यापेक्षा जास्त ज्ञान असणाऱ्याचा द्वेष करीत नाही व आपल्यापेक्षा कमी ज्ञान असलेल्यास कमी लेखत नाही. तसेच आपली विद्या इतरांना विकत नाही.

७) नीतिमत्ता दूषित होणे हे श्रद्धा दूषित होण्याचाच परिणाम होय.

८) अपराधच करायचा असेल, तर अशा ठिकाणी करावा की ज्यां ठिकाणी ईश्वरच नाही.

९) आराधनेचा गोडवा केवळ एकांतातच जाणवतो. मित्र आणि सवंगड्यांपासून दूर राहा, परंतु आधी आपल्या परिवारजणांसाठी रोजीरोटी कमवून त्यांना सुखाने खाऊ घाला आणि शांतपणे झोपवा.

१०) आदरणीय प्रेषितांच्या वचनावर प्रथम मी स्वत: कर्म करतो आणि नंतर लोकांना त्याची शिकवण देतो.

# माननीय अब्दुल्लाह बिन अब्बास (र.)

## दिव्य कुरआनाचे प्रवक्ते

(१)

श्रद्धावंतांची माता सन्माननीय मैमुना (र.) यांचे एक किशोरवयीन भाचे होते. त्या आपल्या या भाच्यावर जिवापाड प्रेम करीत असत. या भाच्याचेसुद्धा आपल्या मावशीवर आणि आपल्या मावसा असलेल्या आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांच्यावर खूप प्रेम होते. म्हणूनच ते आपल्या मावशी मावसाच्या घरीच जास्त वेळ काढीत आणि त्यांची छोटी-मोठी कामेसुद्धा हसत-बागडत करीत असत. मोबदल्यात आदरणीय प्रेषितांचा आशीर्वाद घेत असत.

एकदा आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) रात्रीच्या शेवटच्या प्रहरी नमाज अदा करण्याकरिता उभे राहिले. एवढ्यात त्यांच्या मागे हे भाचेसुद्धा नमाजकरिता उभे राहिले. आदरणीय प्रेषितांनी त्यांना मोठ्या प्रेमाने गोंजारून आपल्यासोबत उभे केले. प्रेषितांनी नमाज सुरू करताच हे भाचे परत पाठीमागे येऊन उभे राहिले. नमाज अटोपल्यावर आदरणीय प्रेषितांनी त्यांना मागे जाऊन उभे राहण्याचे कारण विचारले तेव्हा ते उत्तरले, "हे आदरणीय प्रेषिता! आपल्याबरोबर उभे राहून नमाज पढण्याचे माझ्यातच काय, कोणातही कसे काय धैर्य असू शकते? कोणाची हिम्मत होईल बरे!" आदरणीय प्रेषित त्यांच्या कोवळ्या आणि निरागस उत्तराने खूप प्रभावित झाले. त्यांनी त्यांना पोटाशी धरून खूप प्रेमाने गोंजारले आणि ईश्वराशी प्रार्थना केली, "हे महान ईश्वरा! या मुलास प्रचंड ज्ञान आणि खूप विवेकशीलता प्रदान कर!" सन्माननीय मैमुना (र.) यांचे हे लाडके भाचे, ज्यांच्याखातर थोर ज्ञानी प्रेषितांनी त्यांना प्रचंड ज्ञान आणि आकलन शक्ती व विवेकशीलता प्रदान करण्याची ईशदरबारी प्रार्थना केली आणि त्यांच्या थोरांमोठ्यांबाबत असलेल्या आदरभावनांवर प्रसन्नता व्यक्त केली, ते निरागस कुमार म्हणजे 'हाशमी' परिवाराचे लाडके सुपुत्र माननीय अब्दुल्लाह बिन अब्बास (र.) हे होय!

(२)

माननीय अब्दुल्लाह बिन अब्बास (र.) हे त्या प्रेषित सोबत्यांपैकी होते, ज्यांची विद्या, ज्ञान आणि धर्मशास्त्रांतील गुरुवर्यांत गणना होते. ते आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांचे लाडके काका माननीय अब्बास (र.) यांचे चिरंजीव होते. त्यांची माता 'सन्माननीय उम्मुल फज़्ल (र.) यांनी प्रेषित भार्या 'सन्माननीय ख़दीजा (र.)' यांच्यानंतर सर्वप्रथम इस्लाम स्वीकारण्याचे सौभाग्य मिळविले. या नात्यांमुळे आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) त्यांचे मावसे आणि चुलतभाऊदेखील होते.

माननीय अब्दुल्लाह बिन अब्बास (र.) यांना 'अल जिब्र (महान विद्वान)', 'अलजब्र (विद्यासागर)', 'तर्जुमानुल कुरआन (कुरआनचे प्रवक्ते), या इतर टोपणनावांनीदेखील संबोधित करण्यात येते. माननीय अब्बास (र.) यांना आणखीनही पुत्र होते. परंतु माननीय अब्दुल्लाह बिन अब्बास (र.) यांना विशेषकरून 'इब्ने अब्बास (र.)' (अर्थात अब्बास पुत्र) या नामविशेषणाने संबोधित करण्यात येते.

माननीय इब्ने अब्बास (र.) हे प्रेषितांच्या मदीना स्थलांतराच्या ३ वर्षांपूर्वी अर्थात हिजरी सन पूर्व ३ मध्ये मक्का शहरात जन्मले. या काळात इस्लामद्रोह्यांनी हाशिम परिवार आणि मुतल्लिब परिवारास 'शेअब-ए-अबुतालिब' या स्थानी कैद केले होते. माननीय इब्ने अब्बास (र.) हे याच ठिकाणी जन्मले. मक्का विजयाच्या काही दिवसांपूर्वीच मदीना शहरी स्थलांतर केले. त्यांचे शिक्षण व प्रशिक्षण इस्लामी वातावरणात झाले. आई-वडिलांसह स्थलांतरनाच्या वेळी त्यांचे वय जवळपास अकरा वर्षे होते. मदीना पोहोचताच ते आदरणीय प्रेषितांच्या सेवेत हजर झाले आणि प्रेषित शिकवणींचा भरपूर लाभ घेतला. त्यांची प्रेषितांवर गाढ श्रद्धा आणि अपार प्रेम होते. वडिलांनीसुद्धा त्यांना प्रेषितांसोबत राहण्याची आणि शिकवण घेण्याची ताकीद दिली होती. एके दिवशी प्रेषितांकडून आल्यावर त्यांनी वडिलांना सांगितले की, आज मी प्रेषितांजवळ अशा माणसाला पाहिले, ज्याला मी ओळखत नाही. त्याच्या बाबतीत मला माहीत झाले असते, तर किती छान झाले असते.' माननीय अब्बास (र.) यांनी याचा उल्लेख आदरणीय प्रेषितांसमोर केला. आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांनी इब्ने अब्बास (र.) यांच्या चौकस बुद्धीवर प्रसन्न होऊन आशीर्वाद दिला व प्रार्थना केली की, "हे ईश्वरा ! या मुलावर आपल्या ज्ञान अनुग्रहाचा वर्षाव कर आणि यास आपले ईश्वरीय ज्ञान जगात फैलावण्याचे माध्यम बनव !"

माननीय इब्ने अब्बास (र.) हे अतिशय विनयशील आणि गंभीर वृत्तीचे होते, तरीसुद्धा बालपण असल्याने मदीना शहराच्या गल्ल्यांमध्ये खेळण्यासाठी निघत असत. याच काळातील एक घटना माननीय इब्ने अब्बास (र.) यांच्या लक्षात राहिली. ती त्यांनी स्वत: अशा शब्दांत वर्णन केली.

"मी मुलांबरोबर गल्ल्यांमध्ये खेळत असे. एकदा आदरणीय प्रेषितांना येताना पाहून मी पळून जाऊन एका घराच्या दरवाज्यामागे लपलो. परंतु प्रेषितांनी मला पाहिले होते. त्यांनी प्रेमाने माझा हात धरून ओढले. मग माझ्या डोक्यावरून हात फिरवून म्हणाले, "जा आणि मआविया (र.) यांना बोलावून आणा." माननीय मआविया (र.) हे प्रेषितांवर अवतरीत होणाऱ्या दिव्य बोधास तत्काळ लिहून घेत असत. मी त्यांना पळतच जाऊन बोलावून आणले." (संदर्भ : मुस्नद-ए-अहमद)

माननीय इब्ने अब्बास (र.) यांच्या वयाच्या तेराव्या वर्षी आदरणीय प्रेषितांनी या जगाचा निरोप घेतला. म्हणून पंधरा वर्षांखाली वय असलेल्यांना धर्मयुद्धात भाग घेता येत नसल्याने त्यांना युद्धाची संधी मिळाली नाही. माननीय अबू बकर (र.) यांच्या इस्लामी शासनकाळात त्यांनी प्रगल्भित विद्‌वान असलेल्या प्रेषितसोबत्यांकडून इस्लामचा गाढा अभ्यास केला. माननीय उमर (र.) यांनीसुद्धा त्यांची बुद्धिमत्ता पाहून त्यांच्या शिक्षणाची विशेष सोय केली. माननीय उमर (र.) ज्ञानसंमेलनात इतर विद्‌वानांसोबत माननीय इब्ने अब्बास (र.) यांनादेखील निमंत्रित करीत असत. 'सहीह बुखारी' या ग्रंथात आहे की, एकदा विद्यापरिषदेत मोठमोठे विद्‌वान प्रेषितसोबती बसले होते. माननीय उमर (र.) यांनी या परिषदेत इब्ने अब्बास (र.) यांनासुद्धा निमंत्रित केले होते. इब्ने अब्बास (र.) यांचे वय खूप कमी असल्याने लोकांनी त्यांना आश्चर्याने पाहिले आणि म्हणाले की, "यांचे इथे काय काम?" यावर माननीय उमर (र.) म्हणाले, "वय कमी असले तरी त्यांचे ज्ञान वयस्क असलेल्या विद्‌वानांसम आहे आणि याची कल्पनादेखील तुम्हा सर्वांना आहे."

माननीय उमर (र.) यांच्या चर्चासत्रामध्ये एखाद्या प्रकरणाविषयी गंभीर चर्चा होत असताना इब्ने अब्बास (र.) हे वय कमी असल्याने आपला अभिप्राय देण्यास दचकत असत. परंतु माननीय उमर (र.) त्यांना सांगत की, 'हे इब्ने अब्बास (र.) ! आपला अभिप्राय परखडपणे मांडत जा. वय कमी असल्याने ज्ञान कमी होत नसते. तुम्ही स्वत:स कमी लेखू नये." (संदर्भ : सहीह बुखारी)

हाफीज इब्ने अब्दुलबर (र.) यांनी आपल्या 'अल इस्तिआब' या इतिहास ग्रंथात लिहिले की, माननीय उमर (र.) अर्थात दुसरे इस्लामी शासक त्यांच्या विवेकशीलता आणि सखोल ज्ञानाची खूप कदर करीत असत.

'दायरा-ए अल-मआरिफे-इस्लामिया' ग्रंथात आहे की, माननीय उमर (र.) त्यांच्या सुस्वभाव, उच्च नीतिमत्ता, कुरआनची आकलन शक्ती या सद्‌गुणांमुळे त्यांचा खूप आदर करीत असत. ते त्यांच्या बाबतीत नेहमी म्हणत, "इब्ने अब्बास हे कमी वयातसुद्धा वयोवृद्ध विद्‌वानांपेक्षा खूप मोठे विद्‌वान आहेत. त्यांची जीभ नेहमी संशोधनात्मक प्रश्न विचारणारी असून त्यांची बुद्धी विवेकशील आहे." माननीय उमर फारूक (र.) यांनी हिजरी सन १८ ते २१ च्या दरम्यान माननीय अमरु बिन आस (र.) यांना 'इजिप्त' च्या मोहिमेवर पाठविले, तेव्हा इब्ने अब्बास (र.) सुद्धा या धर्मयुद्धात त्यांच्या सोबत होते.

माननीय उस्मान (र.) यांच्या इस्लामी शासनकाळात इब्ने उबै (र.) यांच्या नेतृत्वामध्ये हिजरी सन २७ मध्ये आफ्रिकेवर चढ़ाई करण्यात आली. तेव्हा इब्ने अब्बास (र.) यांनीसुद्धा एका जमातीचे नेतृत्व करताना या धर्मयुद्धात भाग घेतला होता. एकदा इब्ने उमर (र.) यांना आफ्रिकेचा राजा 'ग्रीगोरी' याच्याकडे 'इस्लामी शासन प्रतिनिधी' या नात्याने पाठविण्यात आले होते. त्या वेळी प्रतिनिधित्व करताना त्यांनी आपल्या प्रभावी वक्तृत्वशैलीने राजास इतके प्रभावित केले की, राजा ग्रीगोरीच्या तोंडून विनासायास हे शब्द बाहेर पडले.

''आपण 'जब्रे अरब' (म्हणजे अरबचे खूप मोठे विद्‌वान) आहात. (संदर्भ : इसाबा, लेखक, हाफीज इब्ने हजर (र.))

हिजरी सन २९, ३० मध्ये माननीय उस्मान (र.) यांच्या शासनकाळात कूफ़ा येथील राज्यपाल माननीय सईद बिन आस (र.) यांच्या नेतृत्वाखाली त्यांनी 'जिरजान' आणि 'तिब्रिस्तान' वर हल्ला केला. या मोहिमेत माननीय इब्ने जुबैर (र.), माननीय हसन (र.) आणि माननीय हुसैन (र.) वगैरे तरूण मंडळी सामील होती.

(संदर्भ : उसुदुल ग़ाबा, लेखक : इब्ने असीर)

(४)

माननीय इब्ने अब्बास (र.) यांनी माननीय अली (र.) यांच्या इस्लामी शासनकाळात उठणाऱ्या बंडांना ठेचून काढण्यात माननीय अली (र.) यांची मदत प्राणपणाला लावून केली. 'जेहरवान' च्या युद्धात बंडखोरांनी माननीय अली (र.) यांच्या लष्कराकडून अपमानजणक पराभव पत्करला आणि त्यांनी ईराणमध्ये पळ काढला. तेथेही गप्प न बसता या बंडखोरांनी काही लोकांना हाताशी धरून इस्लामी शासनाविरुद्ध उपद्रव माजविला. बंडखोरांच्या भूलथापांना बळी पडून ईराणी जनतेने इस्लामी शासनप्रतिनिधींना अथवा राजदूतांना देशाबाहेर काढले. अशा बिकट प्रसंगी माननीय इब्ने अब्बास (र.) यांनी माननीय अली (र.) यांना सांगितले की, ''मी ईराणचा उपद्रव आणि बंडखोरी नष्ट करतो. ही जवाबदारी आपण माझ्यावर सोपवून निश्चिंत व्हा !'' 'बसरा' च्या सीमा 'ईराणच्या' सीमेशी मिळत होत्या आणि माननीय इब्ने अब्बास (र.) यांनी 'बसरा' चे राज्य मोठ्या कुषलतेने हताळले होते. म्हणून माननीय अली (र.) यांनी 'ईराण' ची जवाबदारीदेखील त्यांच्यावर सोपविली.

माननीय इब्ने अब्बास (र.) यांनी 'बसरा' येथे परत येऊन 'झियाद' नावाच्या शूर लष्करप्रमुखाच्या नेतृत्वाखाली एक लष्कर 'ईराण' देशी पाठवून काही दिवसांतच बंडखोरांचा उपद्रव ठेचून काढला आणि संपूर्ण ईराणमध्ये शांती प्रस्थापित केली.

नंतर हिजरी सन ३८ ते ४० च्या दरम्यान माननीय इब्ने अब्बास (र.) यांनी 'बसरा' च्या राज्यपालपदाचा त्याग करून 'मक्का' शहरात येऊन एकांतवास स्वीकारला.

(संदर्भ : दायरे मआरिफे इस्लामिया)

माननीय अली (र.) यांच्या हौतात्म्यानंतर माननीय इमाम हसन (र.) यांच्या हाती इस्लामी शासनाची धुरा आली. त्या वेळीसुद्धा माननीय इमाम हसन (र.) यांनी माननीय इब्ने अब्बास (र.) यांना इस्लामी लष्कराचे प्रमुख पद दिले. दुसरीकडे माननीय अमीर मआविया (र.) यांचे सीरियामध्ये इस्लामी शासन होते. माननीय इब्ने अब्बास (र.) यांनी या दोघांमध्ये तडजोड घडवून आणण्याचे महान कार्य केले.

(संदर्भ : दायरे मआरिफे इस्लामिया)

हिजरी सन ५० मध्ये अमीर मआविया (र.) यांनी 'रोम' ची राजधानी 'कॉन्स्टँटिनोपाल' वर एक लष्कर पाठविले. तेव्हा या लष्करामध्ये माननीय इब्ने अब्बास (र.) यांनीदेखील हिरीरीने भाग घेतला आणि रोमी साम्राज्याविरुद्ध युद्धाचे सौभाग्य मिळविले.

हिजरी सन ६० मध्ये अमीर मआविया (र.) यांच्या स्वर्गवासानंतर 'यज़ीद' हा बादशाह झाला आणि माननीय इमाम हुसैन (र.) यांनी 'कुफ़ा'वासियांच्या आर्जव आणि कळकळीच्या विनंतीवर की, 'आपण कूफ़ा शहरी येऊन आमचे नेतृत्व करावे. आपल्या नेतृत्वाच्या स्वीकाराची आम्ही आपल्या हाती प्रतिज्ञा घेणार आहोत,' मक्का शहरातून 'कूफ़ा'कडे रवाना होऊ लागले. त्या वेळी माननीय इब्ने अब्बास (र.) त्यांच्याकडे आले आणि म्हणाले, "हे हुसैन (र.) ! आपण 'कूफ़ा' ला जात असल्याची मला वार्ता मिळाली आहे."

"होय ! हे खरे आहे !" इमाम हुसैन उत्तरले.

"हे हुसैन (र.) ! मी ईशदरबारी आपल्या कुषलतेचा इच्छुक आहे. आपण आपली इच्छा बदलावी." इब्ने अब्बास (र.) यांनी कळकळीने विनंती केली.

"मी पक्का निश्चय केला आहे. मला जावेच लागेल." इमाम हुसैन (र.) उत्तरले.

"हे इमाम हुसैन (र.) तुम्ही अशा शहरी जात आहात जेथून तुमच्या राज्यप्रतीनिधींना हाकलून लावून 'ज्यांनी तेथील शासनावर स्वत: ताबा मिळविला?" इब्ने अब्बास (र.) यांनी समजावण्याचा प्रयत्न केला.

"हे इब्ने अब्बास (र.) आपण दिलेल्या सल्ल्यावर मी आणखीन एकदा विचार करीन !" माननीय हुसैन (र.) यांनी सांगितले. माननीय इब्ने अब्बास (र.) त्यांचे उत्तर

ऐकून निघून गेले. परंतु त्यांना परत वार्ता मिळाली की, माननीय हुसैन (र.) हे 'कूफ़ा' जाण्याच्या तयारीत आहेत, तेव्हा परत तिसऱ्या दिवशी ते इमाम हुसैन (र.) यांना म्हणाले, "हे इमाम हुसैन (र.) माझी खूप इच्छा होती की, या प्रकरणात दखल देऊ नये. परंतु मी स्वत:वर नियंत्रण ठेऊ शकलो नाही. मी परत आपणास विनंती करतो की, आपण 'कूफ़ा' वासियांचे नेतृत्व करण्यास जाऊ नये. तेथील लोक तुमचा विश्वासघात करतील. तुम्ही याच शहरात राहावे. येथील लोक तुमचा खूप आदर करतात, अन्यथा 'येमेन' मध्ये स्थायिक व्हावे. तेथे भरपूर किल्ले, डोंगर-दऱ्या असून ते एक सुरक्षित स्थान आहे. तेथे तुमचे वडील माननीय अली (र.) यांचे समर्थकसुद्धा भरपूर आहेत. तेथून तुम्ही आपले प्रचारक तयार करून इतर ठिकाणी पाठवू शकता. तुम्ही जर ही पद्धत अवलंबिली तर, मला पूर्ण खात्री आहे की, तुम्हाला तुमचे उद्दिष्ट पूर्ण करता येईल." माननीय हुसैन (र.) यांनी उत्तर दिले, "हे इब्ने अब्बास (र.) ! ईश्वराची शपथ ! मला हे चांगल्या प्रकारे ठाऊक आहे की, तुम्ही माझे शुभचिंतक आहात. परंतु मी आता 'कूफ़ा' जाण्याचा ठाम निश्चय केला आहे."

इब्ने अब्बास (र.) म्हणाले, "जर तुम्हाला जायचेच असेल तर ठीक आहे. परंतु आपल्यासोबत आपल्या परिवारजणांना घेऊन जाऊ नका. मला भीती आहे की, तुम्हालादेखील तसेच ठार करण्यात येईल जसे माननीय उस्मान (र.) यांना त्यांच्या पत्नीसमोर ठार करण्यात आले." परंतु इमाम हुसैन (र.) म्हणाले, "हे इब्ने अब्बास (र.) ! मी आपल्या परिवारजणांना सोबतच घेऊन जाईन!"

आता मात्र इब्ने अब्बास (र.) नि:शब्द झाले. किंबहुना ईश्वराची हीच इच्छा होती की, 'कर्बला' ची घटना घडावी. शेवटी माननीय इब्ने उमर (र.) यांनी लावलेला अंदाज बरोबर निघाला आणि माननीय हुसैन (र.) यांना शत्रूंनी 'कर्बला' या ठिकाणी त्यांच्या परिवारजणांसमोर आणि मुलांबाळांसमोर ठार केले.

या घटनेची वार्ता माननीय इब्ने अब्बास (र.) यांना कळताच त्यांच्यावर दु:खाचे डोंगर कोसळले. या घटनेमुळे ते आजीवन अश्रू ढाळत होते.

(५)

माननीय इमाम हुसैन (र.) यांच्या हौतात्म्यानंतर इब्ने अब्बास (र.) यांनी राजकारणापासून स्वत:स अलिप्त आणि तटस्थ ठेवले. त्यांनी कधीच मतदानसुद्धा केले नाही. जीवनाचे अंतिम क्षण त्यांनी 'ताईफ़' शहरात व्यतीत केले. शेवटच्या काळात त्यांची दृष्टी गेलेली होती. हिजरी सन ६८ (इसवी सन ६८७) मध्ये ते खूप आजारी पडले. जेव्हा त्यांना विश्वास झाला की, मृत्यू जवळ आहे, तेव्हा त्यांच्याजवळ जमलेल्या त्यांच्या चाहत्यांना उद्देशून ते म्हणाले,

"मी एका अशा समुदायातून (परलोकी) जात आहे की, जो समुदाय ईश्वराचा अत्यंत लाडका आहे. म्हणून मी जर तुमच्यामधून जात असेन, तर निश्चितच ईश्वराचा लाडका समुदाय तुमचाच आहे."

सात दिवसांच्या प्रदीर्घ आजारानंतर हा ज्ञानाचा प्रखर तारा मावळला. त्यांच्या मृत्यूमुळे संपूर्ण परिसर दु:ख सागरात बुडाला. माननीय इब्ने हनफिया (र.) यांनी त्यांच्या जनाज्याची (मृत्यूसमयीची) नमाज पढविली आणि दिव्य कुरआनच्या या थोर प्रवक्त्यास मातीच्या स्वाधीन करून म्हटले,

"ईश्वराची शपथ! आज जगाचा थोर विद्‌वान या जगातून उठला!"

(६)

माननीय इब्ने अब्बास (र.) यांच्या जीवनाची सर्वांत जास्त प्रकाशमान बाजू ही त्यांचे इस्लाम धर्माचे ज्ञान व विद्या होय. या अर्थानेच ते वास्तविक 'जब्र-ए-बहर' अर्थात ज्ञानसागर होते. मोठमोठे प्रेषितसोबती, सोबत्यांचे शिष्य आणि सोबत्यांच्या शिष्यांचे शिष्य त्यांच्या विद्‌वत्तेचा मन:पूर्वक स्वीकार करीत असत. माननीय उमर फारुक़ (र.) यांच्या दृष्टीत त्यांचे जे स्थान होते, त्याचा वर उल्लेख आलेलाच आहे. माननीय अली (र.) त्यांच्या बाबतीत म्हणत असत,

"माननीय इब्ने अब्बास (र.) जेव्हा कुरआनचे सविस्तर स्पष्टीकरण करतात, तेव्हा असे वाटते की, जणू ते एखाद्या पारदर्शक असलेल्या पडद्यातून परोक्षाचे दर्शन घडवित आहेत."

माननीय इब्ने मसऊद (र.) म्हणत असत, "माननीय इब्ने अब्बास (र.) हे दिव्य कुरआनचे उत्कृष्ट प्रवक्ते आहेत." माननीय इब्ने उमर (र.) म्हणत असत, "आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांच्यावर जो काही दिव्य बोध अवतरित झाला आहे, त्याचे सर्वांत जास्त ज्ञान माननीय इब्ने अब्बास (र.) यांनाच आहे.

माननीय उबैदुल्ला बिन अब्बास (र.) म्हणत असत, "मी माननीय इब्ने अब्बास (र.) यांच्यापेक्षा मोठा प्रेषितप्रणालीचा जाणकार संशोधक आणि प्रगल्भित विद्‌वान पाहिलाच नाही."

माननीय उबई बिन कआब (र.) यांचे सुपुत्र माननीय इब्ने उबई (र.) यांनी कथन केले की, एकदा माननीय इब्ने अब्बास (र.) हे माझ्या वडिलांजवळ बसले होते. ते उठून गेल्यावर माझे वडील म्हणाले, "इब्ने अब्बास (र.) हे मुस्लिमांचे 'हिब्र' (विद्‌वान) होतील."

इमाम ज़हबी (र.) यांनी आपल्या 'दायरे मआरिफे इस्लामिया' या ग्रंथात लिहिले आहे की, माननीय इब्ने अब्बास (र.) यांच्या थोर विद्वान होण्यामागे पाच कारणे आहेत.

१) आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांनी प्रार्थना केली होती की, 'हे ईश्वरा! यांना दिव्य ग्रंथाचे आकलन, धर्मज्ञान आणि कुरआनाच्या स्पष्टीकरणाची शक्ती प्रदान कर.'

२) आदरणीय प्रेषितांच्या परिवारात धार्मिक शिक्षण मिळाले.

३) मोठमोठ्या सोबत्यांकडून ज्ञान मिळाले.

४) त्यांची स्मरणशक्ती प्रचंड होती.

५) साकल्यपूर्ण विचार करण्याची त्यांच्यात क्षमता होती.

माननीय इब्ने अब्बास (र.) यांना धार्मिक ज्ञानाबरोबरच इतर विषयांचेही भरपूर ज्ञान होते. ते साहित्य आणि कवनशास्त्रात तसेच भाषाशास्त्राच्या सर्वच विषयांत तरबेज होते. त्याचप्रमाणे गणित विषयात त्यांनी महत्त्वपूर्ण कार्य केले. शिवाय अरबी शब्दकोश प्रेषित जीवनचरित्र वगैरे विषय यशस्वीपणे हाताळले.

प्रेषितकाळातील सर्वच विद्वानांची या गोष्टींवर सहमती आहे की, माननीय इब्ने अब्बास (र.) यांना दिव्य कुरआनच्या एकन् एक बाबीचे प्रगल्भ ज्ञान आहे. माननीय इब्ने अब्बास (र.) यांनी दिव्य कुरआनच्या स्पष्टीकरणावर एक महान ग्रंथ लिहिला, ज्याचे नाव आहे, 'तन्वीरुल मुक़बास मिन तफ़सीर इब्ने अब्बास (र.)'.

माननीय इब्ने अब्बास (र.) यांना प्रेषितवचन शास्त्राची कमालीची आवड होती. आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या मुखातून निघालेले एकन् एक शब्द ते जशास तसे लिहून ठेवीत असत व त्यांना मुखपाठ करीत असत. आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांनी जगाचा निरोप घेतल्यावर त्यांनी प्रेषितसोबत्यांची भेट घेऊन प्रेषितवचने गोळा केली. अशा प्रकारे त्यांना हजारो 'प्रेषित वचने' मुखपाठ होती.

माननीय इब्ने अब्बास (र.) यांना 'इस्लामी विधीशास्त्रा' वर कमालीचे प्रभुत्व होते. त्याचे विधीशास्त्रावरील वीस खंडाचा एक ग्रंथ देखील आहे.

(संदर्भ : तहेज़ीबुल तहेज़ीब)

याशिवाय साहित्य, कवनशास्त्र, भाषाशास्त्र आणि व्याकरणात त्यांना विशेष प्राविण्य होते. ते कवी मनाचे आणि मृदूस्वभावी असल्यामुळे त्यांच्या साहित्य आणि कवितासंग्रहात कमालीची भावुकता जाणवते. त्यांची भावुकता, मृदुता त्यांच्या लेखणी आणि रसनातून साखरेप्रमाणे पाझरत असे. यामुळे त्यांचे भाषण आणि वक्तृत्व अत्यंत प्रभावी व मनाला भुरळ पाडणारे व पाषाणहृदयी लोकांच्या थेट भावनांना हात घालणारे होते.

माननीय इब्ने अब्बास यांच्याकडे ज्ञान व विद्येची अमर्याद संपत्ती होती. ही संपत्ती त्यांनी केवळ स्वत:पुरती मर्यादित न ठेवता आपल्या सहस्त्रावधी शिष्यांमध्ये सढळ हाताने लुटविली. ज्ञान प्रसारात विशेष रस असलेल्या या प्रगल्भित विद्वानाने हरतऱ्हेचे विषय आपल्या शिष्यांना शिकवून विद्येचा भरपूर विकास केला. अबू स्वालेह (र.) यांनी इब्ने अब्बास (र.) यांच्या पाठशालेत हजारो विद्यार्थ्यांचा जणसमुदाय पाहिला. त्यांच्या विद्यार्थीसंख्येच्या वाढीमुळे अक्षरश: रस्ता जाम होत असे. (संदर्भ : मुस्तदरक-ए-हाकिम) एकदा त्यांच्या घराबाहेर जमलेल्या प्रचंड विद्यार्थी जनसमुदायाची सूचना 'अबू स्वालेह (र.) यांनी इब्ने अब्बास यांना दिली. तेव्हा त्यांनी वुजू करून (चेहरा, हात, पाय धुवून) आदेश दिला की, 'दिव्य कुरआनचे स्पष्टीकरण आणि त्यातील रहस्यबोध जाणून घेऊ इच्छिणाऱ्या लोकांनी आत यावे.' अशा विद्यार्थ्यांना आत येण्याची सूचना 'अबू स्वालेह (र.)' यांनी करताच प्रचंड संख्येत विद्यार्थी घरात घुसले. यामुळे इब्ने अब्बास (र.) यांचा संपूर्ण वाडाच गच्च भरला. मग त्यांनी विद्यार्थ्यांच्या प्रत्येक प्रश्नाचे समाधानपूर्वक उत्तर देऊन पाठविले. यानंतर त्यांनी विधीशास्त्र आणि प्रेषितवचन शास्त्राच्या विद्यार्थ्यांना आंत येण्याची सूचना केली. यासाठीसुद्धा बरेच विद्यार्थी घरात दाखल झाले आणि त्यांचा भलामोठा वाडा गच्च भरला. यांनाही माननीय इब्ने अब्बास यांनी त्यांच्याही सर्व प्रश्नांची उत्तरे देऊन रवाना केले. अशा प्रकारे ते प्रत्येक विषयाच्या विद्यार्थ्यांना बोलावून त्यांचे समाधान करीत असत. 'अबू स्वालेह (र.)' यांनी लिहिले की, एकाच गुरुवर्याकडे इतक्या विभिन्न विषयांचे एवढ्या प्रचंड संख्येत पहिल्यांदाच विद्यार्थी पाहिले.

इब्ने यसीर (र.) या इतिहासकारांनी लिहिले आहे की, इब्ने अब्बास (र.) यांना कोणत्याही विषयाबाबत प्रश्न विचारला तरी, ते त्याचे समाधानकारक उत्तर देत असत.

माननीय इब्ने अब्बास (र.) कधीकधी एखाद्या विशिष्ट विषयावर चर्चासत्र भरविण्याकरिता आठवड्याचा एक दिवस निश्चित करीत असत. या चर्चासत्रामध्ये दिव्य कुरआन, प्रेषितवचन शास्त्र, इस्लामी विधीशास्त्र, इतिहासशास्त्र, साहित्य वगैरे विषय चर्चेसाठी घेण्यात येत असत.

या शिवाय नमाज झाल्यानंतरसुद्धा आपल्या अनुयायांना घेऊन धार्मिक प्रवचने देत असत. एवढेच नव्हे तर प्रवासात सुद्धा विद्यार्थी त्यांची आतुरतेने वाट पाहत असत आणि आपल्या समस्यांचे समाधान करून घेत असत. ते मदीना, कूफा, बसरा, ताईफ, दमास्कस अथवा कोणत्याही ठिकाणी गेल्यास त्यांच्या विद्यार्थ्यांचा प्रचंड समुदाय त्यांच्याकडे तुटून पडत असे.

'सहीह मुस्लिम' या ग्रंथात आहे की, जेव्हा इस्लामी शासनाच्या सीमा वाढून विस्तारित झाल्या आणि अरबी भाषा न जाणणाऱ्यांचे देश इस्लामी शासनसीमेच्या प्रभावाखाली आले, तेव्हा अरबेतर जणांना कुरआनची अरबी भाषा समजत नव्हती. म्हणून इब्ने अब्बास (र.) यांनी त्यांच्या सवलतीसाठी कुरआनाचे प्रवक्ते आणि भाषांतरकार तयार केले आणि त्यांच्या मायबोलीमध्ये कुरआनाचा प्रचार व प्रसार केला.

(८)

माननीय इब्ने अब्बास (र.) हे विद्येचे सागर होते. तसेच विनयशीलतेचे पर्वतसुद्धा होते. त्यांच्या स्वभावात अतिशय नम्रता आणि मृदुता होती. ते इतरांचा खूप आदर व सन्मान करीत असत. ते मोठ्यांचा आदर आणि धाकट्यांवर दया करीत असत. आर्थिक दुर्बलांवर ते विशेष दयापूर्ण वर्तन करीत असत. ज्या काळात ते 'बसरा' चे राज्यपाल होते, तेव्हा त्यांच्याकडे एकदा माननीय अबू अय्युब अन्सारी (र.) आले आणि आपल्या आर्थिक अडचणीची व्यथा सांगितली. यावर इब्ने अब्बास (र.) यांचे अंतःकरण खूप पाणावले आणि त्यांनी त्यांना चाळीस हजार दिरहम (आजचे जवळपास सहा लाख रुपये), वीस नोकरचाकर आणि इतरही भरपूर वस्तू देऊ केल्या. कारण माननीय अबू अय्युब अन्सारी (र.) यांनी प्रेषित मुहम्मद (स.) यांचा मदीना स्थलांतर केल्यावर पाहुणाचार करण्याचे सौभाग्य मिळविले होते.

(संदर्भ : सैर एअलानुल नबला, लेखक : हाफ़िज़ ज़हबी (र.))

एकदा इस्लामचे थोर विद्वान माननीय झैद बिन साबित (र.) माननीय इब्ने अब्बास (र.) यांच्याकडे आले. जाताना माननीय इब्ने अब्बास (र.) यांनी माननीय झैद बिन साबित (र.) यांच्या घोड्याचा लगाम पकडला. यावर माननीय झैद बिन साबित (र.) म्हणाले,

''हे प्रेषितांच्या चुलत बंधु ! असे करू नका. हे योग्य नाही. मी एवढ़ा महान मानव नाही की, आपण माझ्या स्वारीची लगाम पकडावी.'' यावर इब्ने अब्बास (र.) म्हणाले, ''आपल्या विद्वान गुरुवर्यांचा अशाच प्रकारे आदर करावयास पाहिजे.'' त्यांचे उत्तर ऐकून माननीय झैद बिन साबित (र.) त्यांच्या आदरातिथ्य व नम्रतेवर खूप प्रसन्न झाले आणि त्यांच्या हाताला धरून म्हटले,

''मलासुद्धा प्रेषितांच्या नातलगांचा आदर करणे आवश्यक आहे.''

(संदर्भ : मुस्तदरक-ए-हाकिम)

आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या स्वर्गवासानंतर माननीय इब्ने अब्बास (र.) यांनी एका अन्सारी प्रेषितसोबत्यास म्हटले, "चला आपण प्रेषितसोबत्यांकडे ज्ञानाचे आदानप्रदान करण्यासाठी जाऊ या !" यावर ते अन्सारी म्हणाले, "हे इब्ने अब्बास (र.)! लोक आपल्याकडून ज्ञानार्जनाचे इच्छुक असताना आपणच त्यांच्याकडे कशासाठी निघाल ?" माननीय इब्ने अब्बास (र.) यांनी त्यांच्या प्रश्नास कानाडोळा केला आणि यानंतर ते स्वत: लोकांकडे जाऊन त्यांना धर्मज्ञान देऊ लागले. ते या कामासाठी प्रत्येकाच्या घरासमोर जाऊन घरावर थाप देऊन लोकांना बोलावीत असत व त्यांना ज्ञान शिकवीत असत. लोक त्यांना म्हणत की, 'आपण कशाला एवढी तसदी घेता? आम्ही स्वत: आपल्याकडे आलो असतो.' यावर ते म्हणत की, "हे तर माझे कर्तव्य आहे !"

(९)

माननीय इब्ने अब्बास (र.) यांची आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांच्यावर दृढ श्रद्धा होती. प्रेषितांच्या काळात त्यांचा पूर्ण वेळ अथवा जास्तीत जास्त वेळ प्रेषितांच्याच सान्निध्यात व्यतीत होत असे. ते आदरणीय प्रेषितांच्या प्रत्येक आदेशाची तत्काळ अंमलबजावणी करीत असत. त्यांच्या आज्ञांचे काटेकोरपणे पालन करीत असत. प्रेषितांच्या आज्ञेशिवायसुद्धा ते बरीच अशी कामे करीत असत, ज्यामुळे प्रेषितांना खूप आनंद व्हायचा आणि ते इब्ने अब्बास (र.) यांना आशीर्वाद देत.

ते मुस्लिम जनसमुदायाच्या माता अर्थात प्रेषितांच्या भार्यांचा अत्यंत आदर करीत असत. ते त्यांच्याकडून प्रेषितवचने ऐकत. प्रेषितभार्या सन्माननीय मैमुना (र.), ज्या इब्ने अब्बास (र.) यांच्या मावशीदेखील होत्या, यांचा स्वर्गवास झाल्यावर त्यांच्या मृत्यूसमयीची नमाज त्यांनीच पढविली.

# माननीय अब्दुलाह बिन जुबैर (र.)

## (१)

आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांच्याकडून स्थलांतराचा आदेश मिळताच वर्षानुवर्षे इस्लामद्रोह्यांच्याअत्याचारांना बळी पडलेले बरेचसे प्रेषितसोबती आपले घरदार आणि मातृभूमीचा त्याग करून मदीना शहरी स्थलांतरित झाले. नंतर काही काळ लोटताच आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) हेसुद्धा मदीना शहरी स्थायिक झाले आणि अरब प्रदेशाचे हे प्राचीन शहर प्रेषितमय झाले. योगायोग असा झाला की, मुहाजिरीन (अर्थात स्थलांतररित) पैकी कोणालाच बऱ्याच दिवसांपर्यंत मूलबाळ झाले नाही. या शहरातील अतिशय नालायक असलेल्या यहूदी ('ज्यू') लोकांनी असा गवगवा केला की, आम्ही मुस्लिम समुदायावर जादू केल्याने त्यांना मुलबाळ होत नाही. ज्या वेळी यहूदी लोकांचा प्रोपगंडा जोर धरीत होता. नेमक्या त्याच वेळी माननीय जुबैर (र.) या मुहाजिर सोबत्यांच्या घरी एक गोंडस बाळ जन्मले. संपूर्ण मदीना शहरात आनंदाचे वातावरण निर्माण झाले आणि यहूदी लोकांचा प्रोपगंडा आणि उपद्रव शमला. हे बाळ आदरणीय प्रेषितांकडे आणण्यात आले. प्रेषितांनी त्यास आशीर्वाद दिला. हे ते सौभाग्यवान मूल आहे, ज्याच्या जन्मावर संपूर्ण मदीना शहरवासियांनी आनंद व्यक्त केला आणि आदरणीय प्रेषितांनी आशीर्वाद दिला, याच मुलाचे नाव माननीय अब्दुल्लाह बिन जुबैर (र.) हे होय.

## (२)

माननीय इब्ने जुबैर अर्थात अब्दुल्लाह बिन जुबैर (र.) हे इस्लामी इतिहासातील अतिशय मान्यवर आणि थोर व्यक्तिमत्व होय. आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या स्वर्गवासानंतर त्यांचे वय केवळ दहा वर्षेच असले, तरी ज्ञान-विज्ञान, युद्धकौशल्य, उच्च नैतिकता, नेतृत्व आणि शौर्य यासारख्या इतर गुणांनी ते सर्वगुणसंपन्न होते. ते कुरैश परिवाराच्या 'असद' कुटुंबीयाचे सुपुत्र होत. माननीय इब्ने जुबैर (र.) हे माननीय जुबैर बिन अवाम (र.) यांचे सुपुत्र होते. त्यांचे पितावर्य माननीय जुबैर (र.) हे प्रेषितसोबत्यांच्या दशसोबत्यांपैकी एक होते, ज्यांना प्रेषितांनी स्वर्गप्राप्तीची खूशखबर आधीच दिली होती. तसेच ते आदरणीय प्रेषितांच्या भार्या सन्माननीय ख़दीजा (र.) यांचे सख्खे पुतणे होते. अशा प्रकारे माननीय जुबैर बिन अवाम (र.) हे आदरणीय प्रेषितांचे मावस भाऊसुद्धा होते.

अब्दुल्लाह बिन जुबैर (र.) हे माननीय अबू बकर (र.) यांचे नातूदेखील आहेत. त्यांच्या आईचे नाव सन्माननीय अस्मा (र.) असून त्या अबू बकर (र.) यांच्या ज्येष्ठ

कन्या आहेत. आदरणीय प्रेषितांची अंतिम भार्या सन्माननीय आयशा (र.) या अब्दुल्लाह बिन जुबैर (र.) यांच्या मावशी आहेत. यावरून आई आणि वडील दोन्ही नात्याने ते प्रेषितांचे नातलग आहेत.

माननीय अब्दुल्लाह बिन जुबैर (र.) हे हिजरी सन २ मध्ये जन्मले. ते आठ वर्षांचे होते, तेव्हा त्यांच्या वडिलांनी प्रेषित मुहम्मद (स.) यांना विनंती केली की, ''हे प्रेषिता ! माझ्या या सुपुत्रास इस्लाम धर्माची दीक्षा द्यावी.'' आदरणीय प्रेषितांनी अब्दुल्लाह या गोंडस कुमारास स्मितहास्य केले आणि मग मोठ्या प्रेमभावाने त्यांना इस्लामची दीक्षा दिली. माननीय इब्ने जुबैर अर्थात अब्दुल्लाह बिन जुबैर (र.) हे आपली मावशी आणि प्रेषितभार्या आयशा (र.) यांचे लाडके भाचे असल्याने त्यांचा जास्त वेळ प्रेषितांच्याच घरी व्यतीत होत असे. म्हणूनच त्यांनी प्रत्यक्षपणे आदरणीय प्रेषितांकडे इस्लाम धर्माचे ज्ञानार्जन केले.

## (३)

माननीय अब्दुल्लाह बिन जुबैर (र.) हे लहानपणापासूनच अतिशय निर्भीड आणि शूर होते. भय वा भीती नावाचा गुणधर्मच जणू त्यांच्यात नव्हता. 'खंदक' च्या युद्धाच्या वेळी त्यांचे वय अगदीच कमी असतानासुद्धा ते एका अतिशय उंच असलेल्या पर्वताच्या शेंडीवर जाऊन बसले आणि पूर्ण युद्धाचे दृश्य डोळ्यांनी पाहिले.

एकदा ते आपल्या सवंगड्यांसोबत असताना कोणीतरी मस्करीने या मुलांना भयांकित करण्यासाठी भीतीदायक डरकाळी फोड़ली. त्या डरकाळीच्या आवाजाने सर्व मुले घाबरून पळून गेली, परंतु इब्ने जुबैर (र.) न घाबरता तेथेच उभे राहिले. मग त्यांनी आपल्या पळालेल्या सवंगड्यांना परत बोलावून सांगितले की, 'मी तुमचे नेतृत्व करतो. आपण त्या डरकाळी देणाऱ्या माणसास धडा शिकवू या. मग या कुमारवयीन इब्ने जुबैर (र.) च्या नेतृत्वाखाली सर्वांनी त्यास त्यास झोडपून काढले.

माननीय उमर फ़ारूक़ (र.) यांचे व्यक्तिमत्त्व अतिशय वजनदार होते. शहरातील प्रत्येकजण त्यांना घाबरत असे. लहान मुले, तर त्यांना पाहताच पळ काढीत असत. एके दिवशी इब्ने जुबैर (र.) आपल्या सवंगड्यांसह खेळत होते. तेवढ्यात माननीय उमर फारुक़ (र.) रस्त्याने येऊ लागले. त्यांना पाहताच मुलांनी आपले खेळ जागीच सोडून पळ काढला. परंतु इब्ने जुबैर (र.) मात्र तेथेच थांबले. माननीय उमर फारूक़ (र.) यांनी त्यांना विचारले, ''हे मुला ! तू पळाला का नाहीस ?''

''मी कशासाठी पळणार ? मी कोणतीच खोडी केलेली नाही ,,,तसेच जाण्यासाठी तुमचा रस्तादेखील अडविला नाही.'' इब्ने जुबैर (र.) यांनी त्यांना सड़ेतोड़

उत्तर दिले. त्यांचे बालवयातले हे उत्तर ऐकून माननीय उमर फारुक़ (र.) यांना मनोमन आनंद झाला आणि ते त्या कोवळ्या मुलाच्या धैर्यशील वर्तनावर मनातल्या मनात हसतच तेथून चालते झाले.

माननीय इब्ने जुबैर (र.) हे प्रेषितकाळात व अबू बकर (र.) यांच्या इस्लामी शासनकाळात वयाने लहान असल्याने युद्धात सहभागी होऊ शकले नाहीत. परंतु माननीय उमर फारुक़ (र.) यांच्या शासनकाळात आपले वडील जुबैर (र.) यांच्यासोबत ते 'यरमूक' च्या लढाईत सहभागी झाले. (हिजरी सन १५) या वेळी त्यांचे वय केवळ पंधरा वर्षाचेच असल्याने आणि युद्धाचा व रणभूमीचा अनुभव नसल्याने त्यांच्या वडिलांनी त्यांना घोड्यावर स्वार केले आणि एका दणकट शिपायास त्यांच्या रक्षणास्तव नेमले.

हिजरी सन १९ मध्ये माननीय उमर फारुक़ (र.) यांनी माननीय इब्नुल आस (र.) यांच्या मदतीसाठी एक आगाऊ कुमक इजिप्तकडे रवाना केली. इब्ने जुबैर (र.) यांचे वडील माननीय जुबैर (र.) सुद्धा या फौजेत सामील होते. त्यांनी जाताजाता आपले पुत्र इब्ने जुबैर (र.) यांना देखील सोबत घेतले. यामुळे इजिप्तच्या बऱ्याच युद्धामध्ये इब्ने जुबैर (र.) हे सामील राहिले. इजिप्तहून परतल्यावर त्यांनी आपला वेळ ज्ञानार्जनात खर्च केला. हिजरी सन २४ मध्ये माननीय उमर फारुक़ (र.) यांची हत्या झाल्यावर माननीय उस्मान (र.) त्यांच्या ठिकाणी इस्लामी शासक झाले. हिजरी सन २६ मध्ये माननीय उस्मान गनी (र.) यांनी इब्ने साअद 'तराबलस' वर चढ़ाई करण्यासाठी 'आफ्रिक़िया' ला पाठविले. (अफ्रिक़िया म्हणजे त्या काळात 'लीबिया, 'अलजझायर' आणि 'मोरॅक्को' वर पसरलेल्या भागास म्हटले जात असे.)

तराबलसचा शासक हा 'एक्सर्च ग्रेगोरी' असून तो ख्रिश्चन धर्मिय होता. तो युद्धकौशल्यातही पारंगत होता. त्याने एक लाख वीस हजारांचे प्रचंड लष्कर मुस्लिम लष्कराचा सामना करण्यासाठी आणले. त्याची एक 'फिल्पाना' नावाची मुलगी अत्यंत सुंदर व देखणी होती. सौंदर्याबरोबरच ती युद्धकलेतही खूप पटाईत होती. ती आपल्या पित्याबरोबरच घोड्यावर स्वार होऊन रणभूमीत उतरली. बऱ्याच दिवसांपर्यंत दोन्ही लष्करादरम्यान युद्ध झाले. परंतु कोणत्याच पक्षाला निर्णायक यश मिळाले नाही. ग्रेगोरी बादशाहने जाहीर आवाहन केले होते की, ''जो कोणी मुस्लिमांच्या लष्करप्रमुखाचे शीर कापून माझ्या समोर हजर करील, त्यास एक लाख दिरहम आणि आपली ही शूर मुलगी देईन.'' या आवहानामुळे ख्रिश्चन लष्कराचे धैर्य वाढले आणि बरेचसे ख्रिश्चन लष्कराचे शिपाई मुस्लिम सेनापती 'इब्ने साअद' यांच्या मागावर असत. इतक्या दिवसांपासून युद्ध सुरु असूनसुद्धा लढाई कोणत्याच निर्णयावर पोहोचत नव्हती आणि

तिकडे इस्लामी शासक माननीय उस्मान (र.) यांना देखील युद्ध परिस्थितीची कोणतीच माहिति मिळत नसल्याने तेदेखील काळजीत होते. शेवटी माननीय उस्मान (र.) यांनी माननीय इब्ने जुबैर (र.) या तरुण लष्करप्रमुखांच्या नेतृत्वाखाली एक कुमक 'तराबलस' कडे रवाना केली. इब्ने जुबैर (र.) हे रणभूमीवर पोहोचताच मुस्लिम लष्कराच्या शिपायात खूप जल्लोष निर्माण झाला. याची वार्ता ग्रेगोरी बादशाहलादेखील मिळाली. इब्ने जुबैर (र.) यांनी येताच सर्व प्रथम लढ़ाईचे वेळापत्रक तयार केले. त्यांनी सकाळ ते दुपार ही वेळ युद्धाकरिता निश्चित केली. इब्ने जुबैर (र.) यांच्या सल्ल्याने इस्लामी लष्कराच्या प्रमुखाने जाहीर सूचना दिली की, जो माणूस ग्रेगोरी राजाचे मुंडके आणून देईल, त्यास एक लाख रोकड आणि सोबत 'ग्रेगोरी' ची कन्यादेखील देण्यात येईल. या जाहीर आवाहनामुळे इस्लामी लष्करात नवचैतन्य निर्माण आवश्य झाले, तरी देखील युद्धाचा निर्णयच लागत नव्हता.

माननीय इब्ने जुबैर (र.) यांनी एक युक्ती 'इब्ने साअद' यांना सांगितली, ती अशी की, 'दुसऱ्या दिवशी इस्लामी लष्कराचे काही तरूण आपण रणांगणातून आणा, त्यांच्याच तंबूमध्ये माघारी ठेवा. दुपारच्या वेळी युद्ध संपते वेळी जेव्हा शत्रुची फौज थकलेली असते. ऐन त्याच क्षणी हे ताजेतवाने तरुण शत्रू फौजेवर हल्ला चढवतील.' लष्करप्रमुखास ही युक्ती आवडली आणि ठरल्याप्रमाणे लढतालढता ऐन शत्रूफौज थकून गेलेली असताना इब्ने जुबैर (र.) यांनी माघारी राखीव ठेवलेल्या लष्कराच्या तरूणांना घेऊन एक जोरदार हल्ला चढविला. शत्रूचे सैन्य जीव मुठीत धरून पळू लागले. या हल्ल्यात राजा 'ग्रेगोरी' यास इब्ने जुबैर (र.) यांनी ठार केले आणि त्याची कन्या इब्ने जुबैर (र.) यांच्या वाट्याला आली. त्यांनी तिच्याशी लग्न केले की नाही, या बाबतीत इतिहासात स्पष्ट संकेत मिळत नाही. परंतु माननीय इब्ने जुबैर (र.) यांच्या युक्तीमुळे शत्रूचा भूभाग इस्लामी सीमांना जोडला गेला. यासंपूर्ण युद्धांत इब्ने जुबैर (र.) यांनी आपल्या युद्धकौशल्याचे दर्शन घडविले आणि आपल्या शौर्याची सर्वत्र धाक बसविली. (संदर्भ : दायरए मआरिफ़-ए-इस्लामिया)

माननीय इब्ने जुबैर (र.) विजयाची वार्ता मदीना शहरी घेऊन आले व त्यांनी या मोहिमेचे वर्णन अतिशय व्यवस्थितपणे मांडले. हिजरी सन २९ ते ३० च्या दरम्यान माननीय सईद बिन आस (र.) यांच्या नेतृत्वाखाली इस्लामी लष्कराने तिब्रिस्तान (उत्तर ईराण) वर चढ़ाई केली, तेव्हा इब्ने जुबैर हेसुद्धा त्या लष्करात सामील झाले व बऱ्याच लढायांमध्ये आपले शौर्य पणाला लावले. तिब्रिस्तानची मोहीम पार पाडून आल्यानंतर इस्लामी शासक माननीय उस्मान (र.) यांनी त्यांना कुरआन एकत्रीकरणाच्या परिषदेचे सभासद म्हणून नेमले. माननीय इब्ने जुबैर (र.) यांचे या वेळी केवळ तीस वर्षेच वय होते. तरी परंतु त्यांचा अभ्यास व अनुभव वरिष्ठांसारखा होता.

माननीय उस्मान (र.) या इस्लामी शासकाविरुद्ध जेव्हा काही बंडखोरांनी उपद्रव माजविला तेव्हा इब्ने जुबैर (र.) यांनी प्राण पणाला लावून त्यांचे रक्षण करण्याचा निर्धार केला. परंतु इस्लामी शासक माननीय उस्मान (र.) यांनी त्यांना ईश्वराची शपथ देऊन गप्प बसविले. तरी देखील यांनी गुपचूपपणे माननीय उस्मान (र.) यांच्या निवास्थानावर आपल्या काही सवंगड्यांना घेऊन पहारा दिला. चाळीसाव्या दिवशी बंडखोरांनी त्यांच्या घराच्या मागील भिंतीवरून येऊन त्यांना ठार केले. वयोवृद्ध असलेले इस्लामी शासक उस्मान (र.) यांनी स्वत:चे प्राण दिले, परंतु बंडखोरांचे बंड मोडीत काढण्याची आणि दोन समुदायांतील लोकांचे रक्त सांडण्याची मुळीच परवानगी दिली नाही. या थोर आणि महान इस्लामी शासकाच्या हौतात्म्यानंतर माननीय अली बिन अबुतालिब (र.) यांनी इस्लामी शासनाची धुरा सांभाळली.

(४)

हिजरी सन ४० मध्ये रमज़ानच्या महिन्यात इस्लामचे चौथे शासक माननीय अली (र.) हेदेखील हुतात्मा झाले. माननीय अली (र.) यांच्यानंतर माननीय हसन (र.) हे इस्लामी शासक झाले. परंतु काही परिस्थितीस्तव त्यांनी इस्लामी शासनाची धुरा अमीर मआविया (र.) यांच्याकडे सोपविली. अमीर मआविया (र.) यांच्या शासनकाळात इब्ने जुबैर (र.) हे एकांतवासातच राहिले आणि राजकारणापासून अगदी अलिप्त राहिले. त्यांच्याकडे भरपूर वडिलोपार्जित संपत्ती होती. शिवाय त्यांचा व्यापारसुद्धा चांगला असल्याने त्यांना कोणतीच आर्थिक समस्या नव्हती. हिजरी सन ४९-५० मध्ये माननीय अमीर मआविया (र.) यांनी रोम सम्राटाची राजधानी असलेल्या 'कॉन्स्टॅटिनोपल' शहरावर लष्करी हल्ला केला. तेव्हा माननीय इब्ने जुबैर (र.) सुद्धा या मोहिमेत सहभागी झाले. या मोहिमेवरून परत आल्यावर ते तटस्थ आणि राजकारणापासून अलिप्त राहिले. माननीय अमीर मआविया (र.) यांनी आपल्या मृत्यूपूर्वीच आपला मुलगा 'यज़ीद' यास शासनाचा वारसदार निश्चित केले आणि जनतेस 'यज़ीद' चे शासन स्वीकारण्याचे निमंत्रण दिले. परंतु माननीय इब्ने जुबैर (र.), माननीय अब्दुर्रहमान बिन अबू बकर (र.), अब्दुल्लाह बिन उमर (र.) आणि हुसैन बिन अली (र.) यांनी कडाडून विरोध केला. माननीय अमीर मआबिया (र.) या मंडळींचे मन वळविण्यासाठी स्वत:हून मदीना शहरी पोहोचले. माननीय अमीर मआविया (र.) यांच्याशी बोलणी करण्यासाठी या चारही जणांनी माननीय इब्ने जुबैर (र.) यांना आपले प्रतिनिधी बनविले. माननीय मआविया (र.) आणि इब्ने जुबैर (र.) यांच्यात झालेली बोलणी ही अशा प्रकारे झाली.

अमीर मआविया : तुम्ही माझे नातलग आहात व तुम्हाला चांगले ठाऊक आहे

की, मी तुमच्याशी नेहमी चांगला व्यवहार केला. 'यज़ीद' (अर्थात भावी शासक) तुमचा नात्याने बंधुसुद्धा आहे. आपसातील भांडणतंट्यापासून मुस्लिमांना वाचविण्यास्तव मी हा निर्णय घेत असून तुम्हीसुद्धा 'यज़ीद'च्या बाजूने अभिप्राय द्यावा. वाटल्यास शासनाचे अधिकार तुम्ही स्वत:च्या हातीच ठेवा.

इब्ने जुबैर : हे अमीर ! आम्ही आपल्यासमोर तीन प्रस्ताव ठेवीत आहोत. या तिन्हींपैकी कोणताही एक प्रस्ताव आपण स्वीकारावा. पहिला प्रस्ताव असा की, आदरणीय प्रेषितांप्रमाणेच आपणही कोणाचेच नाव सुचवू नये. आपल्या मृत्यूनंतर जनता स्वत:च आपला शासक निवडील. दुसरा पर्याय हा की, माननीय अबू बकर (र.) यांच्याप्रमाणे आपल्या नातलगांपैकी नसलेला वारसदार निवडावा. तिसरा पर्याय हा की, माननीय उमर (र.) यांच्याप्रमाणे काही जणांची परिषद नेमून त्यांना इस्लामी शासनाचा उत्तराधिकारी निवडण्याचे अधिकार द्यावेत.

अमीर मआविया : आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांच्यानंतर असे लोक होते की, ज्यांच्या नेतृत्वाचा स्वीकार जनता करू शकत होती. म्हणूनच जनतेने माननीय अबू बकर (र.) यांच्या नेतृत्वावर विश्वास टाकला. माननीय अबू बकर (र.) यांच्यानंतर माननीय उमर फारुक़ (र.) यांच्यासारखे मुत्सद्दी व कर्तबगार लोक होतेच, परंतु आता असे लोक बाकी राहिलेले नाहीत. तिसऱ्या स्वरुपाचा प्रस्ताव सद्यपरिस्थितीत लागू होण्यासारखा नाही. या प्रस्तावांव्यतिरिक्त चौथा प्रस्ताव असल्यास सांगा.

इब्ने जुबैर : नाही ! चौथा प्रस्ताव कोणताच नाही.

अशा प्रकारच्या बोलणीनंतर अमीर मआविया (र.) यांनी त्यांच्या तिन्ही प्रस्तावांना न जुमानता ही बोलणी अनिर्णित ठेवली. सरतेशेवटी अमीर मआविया (र.) यांच्या मनात माननीय ज़ुबैर (र.) यांच्याविषयी क्लेष निर्माण झाला आणि अखेर हिजरी सन ६० च्या रजब महिन्यात त्यांनी आपला सुपुत्र 'यज़ीद' यास राजसत्तेचा वारसदार ठरविण्याचे मृत्यूपत्र तयार केले.

या मृत्यूपत्रात त्यांनी आपला सुपुत्र आणि भावी राजा 'यज़ीद' यास उद्देशून सूचना केली.

"तुझ्या राज्यशासनात 'कुरैश' परिवाराच्या विधांकडून धोका असण्याची शक्यता आहे. १) माननीय हुसैन बिन अली (र.) २) अब्दुल्लाह बिन उमर (र.) आणि ३) माननीय इब्ने ज़ुबैर (र.). माननीय हुसैन (र.) यांना इराक़वासी जनता एक ना एक दिवशी तुझ्याविरुद्ध बंड पुकारण्यास अवश्य भाग पाडतील. परंतु तू मात्र त्यांच्यावर (माननीय हुसैन (र.) यांच्यावर) ताबा मिळवून त्यांना अभय द्यावे. ते आदरणीय प्रेषितांचे लाडके नातू आणि आपलेदेखील नातलग असल्याने त्यांचे आपल्यावर अधिकार आहेत.

अब्दुल्लाह बिन उमर (र.) हे राजकारणाच्या भानगडीत पडण्यासारखे नाहीत. मात्र इब्ने जुबैर (र.) यांच्याकडून तुला आणि तुझ्या राज्यास वास्तविक धोका आहे. हा माणूस कोल्ह्याची चाल चलून सिंहासारखा तुझ्यावर हल्ला करेल. त्याच्यावर ताबा मिलविल्यावर त्यास जिवंत सोडू नकोस. मात्र त्याने तडजोड केली तर मुस्लिमांचे रक्त वाहू न देता तूसुद्धा त्यांच्याशी तडजोड करावी.''

(९)

अमीर मआविया (र.) मृत्यू पावले आणि त्यांचा मुलगा 'यज़ीद' हा राजसिंहासनावर विराजमान झाला. 'सीरिया' च्या जनतेकडून आणि अरब देशातील बहुतेक जणांकडून अमीर मआविया (र.) यांनी आपल्या जीवनातच 'यज़ीद' च्या शासनाची स्वीकृती मिळविली होती. परंतु 'यज़ीद'चे शासन नाकारणाऱ्यांमध्ये माननीय हुसैन (र.) आणि माननीय इब्ने जुबैर (र.) हे दोघे होते. या दोघांकडे 'यज़ीद'ला दुर्लक्ष करून चालण्यासारखे नव्हते. त्याने 'मदीना' शहराचा राज्यपाल 'वलीद बिन उतबा' यास आदेश पाठविला की, या दोघांची स्वीकृती घ्यावी. माननीय हुसैन (र.) यांनी मात्र या वेळेसही ठाम नकार दिला आणि माननीय इब्ने जुबैर (र.) यांनी एका दिवसाची संधी मागितली आणि रातोरात आपल्या पूर्ण परिवारजणांस घेऊन मदीना शहरातून पलायन करून 'मक्का' शहरी दाखल झाले. मक्कावासियांनी त्यांचे जंगी स्वागत केले. कारण मक्कावासी त्यांना खूप प्रेम करीत असत. तसेच ते इब्ने जुबैर (र.) यांच्या ईशपरायणता आणि पात्रतेने खूप प्रभावित होते. याच वेळी माननीय हुसैन (र.) हेसुद्धा 'कूफ़ा' शहराकडे स्थलांतराच्या उद्देशाने मक्का शहरात दाखल झाले. माननीय इब्ने जुबैर (र.) यांना ही वार्ता मिळताच ते माननीय हुसैन (र.) यांच्याकडे आले व म्हणाले,

''आपण याच शहरात स्थायिक व्हावे. येथूनच आपली नीती चालू ठेवावी. येथूनच आपले राजदूत इतर शहरात पाठवावेत आणि 'कूफ़ा' व 'इराक़' येथील समर्थकांनासुद्धा येथेच बोलवावे. अशा रितीने आपण आधी आपले समर्थन मजबूत करूनच 'यज़ीद' शासनाच्या राज्यपालास व राजदूतास बाहेर काढ़ावे. मी आपली सर्वतोपरी मदत करीन. मला असे वाटते की आपण 'मक्का' शहरातच राहून 'इस्लामी शासन' घोषित करावे, कारण संपूर्ण जगातून मुस्लिम येथे 'हज' करण्यासाठी येतात. या प्रकारे काम केल्यास आपण अवश्य यशस्वी व्हाल.''

परंतु माननीय हुसैन (र.) यांनी 'कूफ़ा' स स्थलांतराचा पक्का निश्चय केला होता. म्हणून त्यांनी इब्ने जुबैर (र.) यांचा सल्ला स्वीकारला नाही.

त्याचप्रमाणे माननीय इब्ने अब्बास व इतर बऱ्याच जणांनी त्यांना खूप समजावण्याचा प्रयत्न केला. परंतु त्यांनी आपल्या परिवारजणांसह 'कूफ़ा'कडे

स्थलांतराचा पक्का निर्धार केला. १० मोहर्रम हिजरी सन ६१ मध्ये माननीय हुसैन (र.) यांना 'यज़ीद'च्या लष्कराने त्यांच्या परिवारजणांसमोर अत्यंत क्रूरतेने ठार केले. या हृदयद्रावक दुर्दैवी घटनेची वार्ता माननीय इब्ने जुबैर (र.) यांना कळाली आणि ते खूपच व्यथित झाले. त्यांचे दुःख अनावर झाले. त्यांनी संपूर्ण मक्कावासियांना 'मस्जिद-ए-हराम' मध्ये गोळा करून आवेशपूर्ण शब्दांत भाषण दिले.

"लोक हो ! या जगाच्या पाठीवर 'इराक' पेक्षा दुर्दैवी आणि पूर्ण 'इराक़'मध्ये 'कूफ़ा'पेक्षा दुर्दैवी इतर कोणीच नसेल. कूफ़ावासियांनी माननीय हुसैन यांना नेतृत्वाचा ध्वज हाती घेण्याची प्रेरणा देऊन 'कूफ़ा' येथे बोलावले आणि ऐन वेळेवर त्यांनी माननीय हुसैन (र.) यांची साथ सोडून 'यज़ीद' च्या लष्कराची साथ दिली. 'यज़ीद'च्या क्रूर आणि अविवेकी लष्कराने माननीय हुसैन (र.) यांना घेराव घालून मागणी केली की, 'यज़ीद'ची सत्ता स्वीकारा आणि स्वतःला 'इब्ने झियाद' या लष्कर प्रमुखाच्या स्वाधीन करा, अन्यथा युद्धाकरिता तयार व्हा. ईश्वराची शपथ ! माननीय हुसैन कडे शस्त्रेदेखील नव्हती. त्यांनी असत्याच्या नियमांवर आधारित असलेले 'यज़ीद' चे शासन ठोकरून लावले आणि त्याच्या असत्य शक्तीसमोर न झुकता त्यांनी वीरमरण पत्करले. मी तुम्हाला विचारतो की, माननीय हुसैन (र.) यांना ठार करणाऱ्या जुलमी शासनास आपण कसे काय स्वीकारु शकाल? त्यांच्या राज्यप्रतिनिधींचा आदेश कसा स्वीकारता येईल ?"

सर्वांनी एकमुखाने आवेशपूर्ण उत्तर दिले की,

"मुळीच नाही!! कोणत्याही परिस्थितीत नाही !!!" यानंतर माननीय इब्ने जुबैर (र.) यांनी पुन्हा समुदायास उद्देशून म्हटले,

"लोक हो! ईश्वराची शपथ! या क्रूरकर्म्यांनी एका अशा महान व्यक्तीचा वध केला, जो दिवसा उपवास ठेवीत आणि रात्रीच्या वेळी नमाज अदा करीत असे. माननीय हुसैन (र.) हे मोठे ईशपरायण असून सर्वगुणसंपन्न होते. तेच इस्लामी शासनाची धुरा सांभाळण्यास पात्र होते. ईश्वराची शपथ ! दारु पिणाऱ्यापेक्षा उपवास ठेवणारे हुसैन (र.), नृत्याने मनोरंजन करणाऱ्यांपेक्षा रात्रीच्या वेळी ईश्वरासमोर अश्रू ढाळणारे हुसैन (र.), मार्गभ्रष्टांपेक्षा दिव्य कुरआनचे मार्गदर्शन स्वीकारणारे हुसैन (र.), शिकारी कुत्र्यांच्या प्रशंसा करणाऱ्यांपेक्षा ईशप्रशंसा करणारे हुसैन (र.) निश्चितच ईश्वरीय शासनाची धुरा सांभाळण्यास जास्त पात्र होते. ईश्वर त्या धोकेबाजांना कठोर शिक्षा देईल."

भाषण देतादेताच इब्ने जुबैर (र.) यांना रडू कोसळले आणि सोबत सर्वच मक्कावासी दुःखाने विव्हळू लागले. 'यज़ीद' शासनाविरुद्ध संपूर्ण जनतेच्या मनात राग धुमसत होता. शेवटी आपल्या भावनांना वाट करून देण्यासाठी सर्वांनीच इब्ने जुबैर (र.) यांना म्हटले की,

''माननीय हुसैन (र.) नंतर इस्लामी शासनाची धुरा सांभाळण्याची पात्रता केवळ आपणातच आहे. आपण हात पुढे करावा. आम्ही आपल्या शासनस्वीकृतीची दीक्षा घेऊन प्रतिज्ञा करीत आहोत.''

सर्वांनी इब्ने जुबैर (र.) यांना इस्लामी शासनाची धुरा स्वाधीन केली.

(६)

'यज़ीद' ला जेव्हा या बंडखोरीची वार्ता मिळाली तेव्हा त्यांचा संताप अनावर झाला आणि त्याने मदीनाच्या राज्पालास इब्ने जुबैर (र.) यांच्या अटकेचे आदेश दिले. मदीनाच्या राज्यपालाने एक छोटीशी फौज इब्ने जुबैर (र.) यांच्यावर हल्ला करण्यासाठी पाठविली. परंतु इब्ने जुबैर (र.) यांनी त्यांना पिटाळून लावले आणि लष्कराच्या प्रमुखास अटक करून ठार केला. यानंतर माननीय इब्ने जुबैर (र.) यांनी अधिकृतपणे 'यज़ीद'ला पायउतार करण्याची शासकीय घोषणा केली. ही घोषणा ऐकताच मदीनावासीयांनीसुद्धा 'यज़ीद'च्या राजदूतास शहरातून काढून बाहेर केले, 'इब्ने हन्ज़ला (र.)' आणि 'इब्ने मलाइका' यांना आपले स्थानिक प्रमुख बनविले. मदीना शहरातील बंड ठेचून काढण्यासाठी 'यज़ीद' याने 'मुस्लिम बिन उतबा' च्या नेतृत्वात लष्कर रवाना केले. या क्रूर लष्कराने तीन दिवस आणि तीन रात्रीपर्यंत मदीना शहरात रक्ताची आणि आगीची अक्षरश: होळी खेळली. यानंतर हे लष्कर घेऊन मक्काकडे इब्ने जुबैर (र.) यांना ताब्यात घेण्यासाठी निघाले. परंतु रस्त्यातच मुस्लिम बिन उतबा मरण पावला आणि हसीन बिन नबीज़ हा लष्करप्रमुख झाला. त्याने मक्का शहराला वेढा देऊन 'काबा' वर दगडांचा वर्षाव केला. परंतु इब्ने जुबैर (र.) मोठ्या शौर्याने तोंड देत होते. स्वत: 'हसीन बिन नबीज़' चे कथन आहे की, इब्ने जुबैर असे निघत होते, जसे झाडीतून सिंह बाहेर येत आहे. दगडांच्या या वर्षावामध्येसुद्धा इब्ने जुबैर (र.) बाहेर येऊन शांतपणे नमाजसुद्धा अदा करीत असत.

हे युद्ध चालू असतानाच हिजरी सना ६४ च्या रबिऊल अव्वल महिन्याच्या १४ तारखेस 'यज़ीद' मृत्यू पावला. ही वार्ता वाऱ्यासारखी मक्का शहरात पोहोचली. 'हसीन बिन नबीज़' ने युद्ध थांबवून इब्ने जुबैर (र.) यांना संदेश पाठविला की, 'यज़ीद'च्या मृत्यूमुळे आता युद्ध चालू ठेवण्यात काहीच अर्थ नाही. आपण माझ्यासोबत सीरियाला यावे. मी तेथील जनतेस आपल्या हाती शासनाची धुरा सोपविण्याची विनंती करतो. निश्चितच तेथील जनता आपल्या शासनाचा स्वीकार करील. अशा रितीने संपूर्ण इस्लामी जगत आपल्या शासनाचा स्वीकार करील. आतापर्यंत तुमच्या आमच्या दरम्यान झालेल्या रक्तपातास्तव आम्हास क्षमा करावी.'' परंतु माननीय इब्ने जुबैर (र.) यांनी हा प्रस्ताव नाकारला आणि हसीन बिन नबीस आपले लष्कर परत घेऊन सीरियाला परतला.

## (७)

'यज़ीद' ने पाठविलेल्या लष्कराने 'पवित्र काबा' वर दगडांच्या वर्षाव केल्यामुळे त्याची बरीच नासधूस झाली होती आणि 'पवित्र काबा' चा पूर्णपणे जीर्णोद्धार करणे आवश्यक होते. आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांनी त्यांच्या मृत्यूपूर्वी केलेल्या सुचनेनुसार इब्ने जुबैर (र.) यांनी 'हतीम'चा भागसुद्धा 'पवित्र काबास' जोडला. या कामासाठी माननीय इब्ने जुबैर (र.) यांनी खूप संपत्ती खर्च केली. यानंतर त्यांनी इमारतीच्या आतील व बाहेरील भिंतींना सुगंधित केल्या आणि पवित्र काबास उंची वस्त्राचा 'गिलाफ़' चढविला. अशा प्रकारे पवित्र काबाची आदरणीय प्रेषितांच्या इच्छेनुसार त्यांनी पुनर्बांधणी केली.

तिकडे 'सीरिया'मध्ये 'यज़ीद'च्या मृत्यूनंतर त्याचा मुलगा 'मआविया' राज-सिंहासनावर आरूढ झाला. तो अतिशय मृदू स्वभावी आणि धार्मिक नीतीचा असल्याने त्यास उमैया परिवाराची अरेरावी राजनीती भोवली आणि लवकरच त्याने राजत्याग केला. यामुळे माननीय इब्ने जुबैर (र.) यांच्या एकछत्री शासनाखाली संपूर्ण इस्लामी जगत आले. या काळात मात्र इब्ने जुबैर (र.) यांनी एक चूक केली. त्यांनी 'यज़ीद'च्या शासनकाळातील शासनप्रतिनिधी आणि राजदूतास मदीना शहरातून पदभ्रष्ट घोषित करताना बाहेर काढते वेळेस 'यज़ीद'च्या उमैया परिवाराचे सदस्य 'मरवान बिन हकम' आणि त्याचा मुलगा 'अब्दुल मलिक बिन मरवान' यांना देखील शहराबाहेर काढले. हे दोन्ही बापलेक मदीनाहून अपमानित होऊन सीरियाला आले आणि तेथील आपल्या परिवाराच्या प्रतिष्ठितांसमोर आपली व्यथा सांगून त्यांची सहानुभूती मिळविली. या सर्वांनी मिळून बदल्याच्या भावनेने पेटून इब्ने जुबैर (र.) यांच्या राजदूतास देशाबाहेर काढले आणि 'मरवान बिन हकम' यास आपला 'राजा' बनविले. शेवटी 'मरवान बिन हकम' हा एक हजार शिपायांचे सशस्त्र लष्कर घेऊन 'मर्जे राहत' या ठिकाणी असलेल्या 'इब्ने जुबैर (र.)' यांच्या लष्करी छावणीवर चाल करून आला. दोन्ही लष्करात काट्याची लढत झाली. परंतु अकस्मात होणाऱ्या या हल्ल्यामध्ये इब्ने जुबैर (र.) यांच्या लष्कराला पराभव पत्करावा लागला आणि 'मरवान बिन हकम' या बंडखोराचे राज्य सीरियामध्ये प्रस्थापित झाले. लागलीच 'मरवान बिन हकम' याने इब्ने जुबैर (र.) यांच्या अधिपत्याखाली असलेला 'इजिप्त'सुद्धा जिंकून घेतला. अशा प्रकारे सीरिया व इजिप्तवर 'मरवान बिन हकम'चे आणि अरब प्रदेश व इराक़ वर माननीय इब्ने जुबैर (र.) यांचे शासन प्रस्थापित झाले. 'मरवान बिन हकम' लवकरच मरण पावला व त्याच्या ठिकाणी त्याचा पुत्र अब्दुल मलिक बिन मरवान हिजरी सन ६५ मध्ये राजसिंहासनावर आरूढ झाला.

याच काळामध्ये माननीय इब्ने जुबैर (र.) यांच्या अधिपत्याखाली असलेल्या 'इराक़'मध्ये 'मुख्तार सख्फ़ी' याने इराक़वर ताबा मिळविण्यासाठी प्रयत्न सुरु केले. यासाठी त्याने माननीय हुसैन (र.) यांच्या खुनाचा बदला घेण्याच्या नावावर जनतेस संघटित केले आणि या आंदोलनाचे 'केंद्र' कूफ़ा शहरास बनविले. माननीय हुसैन (र.) यांच्या खुनाचा संताप जनतेमध्ये आधीपासूनच खदखदत होता. शिवाय उमैया परिवाराच्या शासक असलेल्या 'यज़ीद'च्या लष्कराने त्यांचा निर्दयीपणे वध केला असल्याने जनता उमैया परिवाराचा तीव्र द्वेष करीत होती. याचा 'मुख़्तार सख्फ़ी' ने पुरेपूर फायदा उचलून लोकांना संघटित केले. अशा रितीने इराक़मध्ये 'मुख़्तार सख्फ़ी'च्या नेतृत्वाखाली इब्ने जुबैर (र.) यांच्याविरुद्ध जनतेने बंड केले आणि इब्ने जुबैर (र.) यांनी इराकमध्ये नेमलेल्या राज्यपालास हाकलून लावले. अशा प्रकारे 'बसरा' सोडून संपूर्ण इराक़ 'मुख्तार सख्फ़ी' च्या नेतृत्वाखाली आले. यानंतर मुख्तार सख्फ़ीने कर्बलाच्या ठिकाणी माननीय हुसैन (र.) यांना ठार मारणाऱ्यांना यमसदनी धाडले. यानंतर त्याने एक मोठे लष्कर 'उबैदुल्लाह इब्ने ज़ियाद'ला ठेचून काढण्यासाठी 'मोसुल' या ठिकाणी रवाना केले. 'उबैदुल्लाह' हा माननीय हुसैन (र.) विरुद्ध लढणाऱ्या लष्कराचा प्रमुख होता. यानेच माननीय हुसैन (र.) यांच्यावर लष्करी कारवाई केली होती. या युद्धात 'मुख्तार सख्फ़ी'ने पाठविलेल्या लष्कराने उबैदुल्लाह 'बिन ज़ियाद'चा दारूण पराभव केला आणि त्यास ठार केले.

'मुख्तार सख्फ़ी'ने जर माननीय हुसैन यांच्या खुनाचा बदला घेण्यासाठीच या चळवळीस मर्यादित ठेवले असते, तर कदाचित योग्य ठरले असते. परंतु त्याने एकाच वेळी सीरियांच्या 'अब्दुल मलिक बिन मरवान' आणि मदीनाच्या इस्लामी शासक माननीय इब्ने जुबैर (र.) या दोघांविरुद्ध सशस्त्र युद्ध छेडले. 'उबैदुल्लाह इब्ने ज़ियाद' या माननीय हुसैन (र.) यांच्या खुन्यास ठार मारल्यानंतर 'मुख़्तार सख्फ़ीने' उमवी शासनास प्रत्यक्ष टक्कर दिली नव्हती. परंतु त्याने माननीय इब्ने जुबैर (र.) यांच्याशी तीव्र युद्ध सुरु केले. मुख़्तार सख्फ़ी याने तब्बल अठरा महीने दोन्ही शासनांना सशस्त्र लढा दिला. त्याचप्रमाणे त्याने तेथील रहिवासी अरबजणांचाही रोष ओढवून घेतला. त्यामुळे तेथील अरब रहिवाशी 'बसरा' कडे पलायन करून स्थायिक झाले. या ठिकाणी इब्ने जुबैर (र.) यांचे भाऊ 'मुसैब बिन जुबैर (र.) राज्यपाल होते. इस्लामी शासनाचे राज्यपाल मुसैब (र.) यांनी मुख्वारचा उपद्रव मोडीत काढण्यासाठी एक लष्कर घेऊन 'कूफ़ा' कडे निघाले. दोन्ही लष्करात घनघोर युद्ध झाले. या वेळी 'मुसैब बिन जुबैर (र.) यांनी लढताना बंडखोर 'मुख़्तार सख्फ़ी'चा शीरच्छेद करुन एका मोठ्या शक्तिशाली शत्रूचा खातमा केला.

## (९)

'मुख्तार सखफ़ी' हा दोन्ही शासनांच्या रस्त्यातील काटा होता. तो निघाल्यानंतर आता या दोन्ही शासकांदरम्यान अटीतटीची लढाई सुरु झाली. अब्दुल मलिक आणि इब्ने जुबैर (र.) समोरासमोर आले. अब्दुल मलिक एक जबरदस्त फौज घेऊन माननीय इब्ने जुबैर (र.) यांच्यावर चाल करून आला. दोन्ही फौजांमध्ये घनघोर युद्ध झाले आणि शेवटी माननीय इब्ने जुबैर (र.) यांनी समझोता करून आपल्या कन्येचा विवाह अब्दुल मलिक बिन मरवानच्या मुलाशी केला. यानंतर पुन्हा एकदा अब्दुल मलिकने मोठे सैन्य घेऊन इराक़ वर हल्ला चढविला. या ठिकाणी मुसैब बिन जुबैर (र.) हे इराकचे राज्यपाल होते. त्यांनी आपले लष्कर खुरासान मोहिमेवर पाठविलेले असल्याने त्यांच्याकडे लष्करी बळ कमी पडले व त्यांना अब्दुल मलिकच्या लष्करांसमोर पराभव पत्करावा लागला आणि त्यांना रणभूमीवर लढताना वीरमरण आले. माननीय मुसैब (र.) यांना ठार केल्यानंतर संपूर्ण इराक़वर अब्दुल मलिक बिन मरवानचे शासन प्रस्थापित झाले. आता केवळ अरबचा प्रदेशच तेवढा अपवाद होता. इराक़ जिंकल्यावर अब्दुल मलिकने अरब प्रदेशाकडे आपले लक्ष केले. त्याने 'मक्का' जिंकण्याची तयारी सुरु केली. 'मुस्तदरक हाकिम' या ग्रंथात आहे की, एके दिवशी त्याने बनु उमय्या परिवाराच्या मोठमोठ्या शूरांना जमा करून विचारले की, "तुमच्यापैकी कोण इब्ने जुबैर (र.) यांचा वध करण्यास तयार आहे ?" त्याच्या प्रश्नावर 'हिज्जाज बिन यूसुफ़' उभा राहिला आणि म्हणाला, "हे काम आपण माझ्या स्वाधीन करावे !"

अब्दुल मलिकने तीनदा आपला हाच प्रश्न उच्चारला आणि तिन्ही वेळा 'हिज्जाज बिन यूसुफ़' याने स्वतःस पुढे केले. अखेर अब्दुल मलिकने 'हिज्जाज बिन यूसुफ़' ची या पातकासाठी निवड केली. तसेच त्याला असादेखील आदेश दिला की, मदीनावासीयांना सध्यातरी त्रास देऊ नये. येथून सरळ 'ताईफ़' या शहरात जावे आणि तेथून लहान लहान तुकड्या मक्का शहरावर हल्ल्यासाठी पाठवून इब्ने जुबैर (र.) यांची शक्ती कमी करावी. जास्त लष्कराची गरज पडल्यास मला पत्र धाडावे.

हिज्जाज बिन यूसुफ़ या मोहिमेसाठी तीन हजार जवानांचे लष्कर घेऊन 'ताईफ़'मध्ये येऊन थांबला. इकडे माननीय इब्ने जुबैर (र.) यांनीसुद्धा मक्का शहराच्या रक्षणाची पूर्ण तयारी केलेली होती. हिज्जाज बिन यूसुफ़चे लष्कर मक्का शहरावर सतत हल्ले चढ़वीत आणि इब्ने जुबैर (र.) यांचे संरक्षण दस्ते त्यांना पिटाळून लावीत असत. असे बरेच महिने लोटल्यानंतरही यश मिळत नसल्याने हिज्जाज बिन यूसुफ़ने अब्दुल मलिकला परिस्थितीचा वृत्तांत पाठविला आणि सोबतच मक्का शहराला वेढ़ा देण्याची परवानगी मागितली. अब्दुल मलिक बिन मरवान याने ताबडतोब पाच हजाराचे बलाढ्य

सैनिक हिज्जाज बिन यूसुफ़च्या मदतीस पाठविले. लष्कर पोहचताच हिज्जाजने मक्का शहरास वेढ़ा दिला. त्याने पवित्र काबागृहावर आगीच्या गोळ्यांचा आणि दगडांचा वर्षाव सुरु केला. हा वेढ़ा हिजरी सन ७२ च्या ज़ीकादा महिन्यात (अर्थात २५ मार्च इ. स. ६९२ मध्ये) सुरु झाला आणि तब्बल सात महिन्यांपर्यंत राहिला. या पूर्ण काळामध्ये पवित्र काबा आणि पूर्ण शहरावर आगीचा आणि दगडांचा वर्षाव होत राहिला.

माननीय इब्ने जुबैर (र.) यांनी मोठ्या धैर्याने या संकटास तोंड दिले. परंतु या वेढ्यामुळे शहरातील रसद संपत आली आणि लोकांवर उपासमाराची पाळी आली इब्ने जुबैर (र.) यांचे सवंगडी व साथीदार 'मक्का' सोडण्यास विवश होत होते. याच काळात माननीय इब्ने जुबैर (र.) आपल्या अत्यंत वृद्ध असलेल्या मातेच्या अर्थात सन्माननीय अस्मा (र.) यांच्या सेवेत हजर झाले आणि विचारले,

"माता ! आपण कुशल आहात ना ?"

"माझी कुशलता काय विचारतोस ? मला तर डोळ्यांनी दिसतदेखील नाही !" त्या उत्तरल्या.

"माता ! मृत्यूमध्ये खूप गोडवा आणि विश्रांती आहे !" इब्ने जुबैर (र.) म्हणाले.

"हे लाडक्या ! मी तुझी परिणती पाहिल्यावरच मरण पत्करू इच्छिते, जेणेकरून तुला हौतात्म्य आल्यास आपल्या हाताने कफन पांघरीन आणि विजय प्राप्त झाल्यास आनंद व्यक्त करीन !" माता उत्तरल्या. मातेचे हे उत्तर ऐकून इब्ने जुबैर (र.) हसले आणि आशीर्वाद घेऊन त्यांचा निरोप घेतला. दहा दिवसांनंतर अंतिम सलाम करण्यासाठी ते मातेच्या सेवेत हजर झाले. इब्ने जुबैर (र.) यांनी विचारले,

"मातावर्य ! माझे सर्व साथी माझी साथ सोडून हिज्जाज बिन यूसुफ़ला जाऊन भेटले. तो मलादेखील अभय देण्यास तयार आहे. अब्दुल मलिक बादशाहने वचन दिले की, माझ्या सर्व इच्छा पूर्ण करील. अशा अवस्थेत आपणच मला आदेश द्यावा की, मी काय करावे ?"

"लाडक्या! या गोष्टीचा निर्णय तूच चांगल्याप्रकारे घेऊ शकतोस. जर तू सत्याच्या समर्थनार्थ आणि मानवजातीच्या कल्याणास्तव युद्ध करीत आहेस, तर जीवाची पर्वा न करता रक्ताच्या शेवटच्या थेंबापर्यंत युद्ध सुरु ठेव आणि जर तू केवळ निरर्थक लढत असशील, तर खूप वाईट करशील. कित्येक निरपराधांचे प्राण वाया घालण्याचे पाप तुझ्या डोक्यावर असेल." माननीय अस्मा (र.) यांनी उत्तर दिले.

इब्ने जुबैर म्हणाले, "मातावर्य! मला मृत्यूची मुळीच भीती वाटत नाही. मी केवळ सत्यासाठीच जगलो आणि सत्यासाठीच मरण पत्करणार ! मला केवळ एवढेच भय आहे की, माझ्या मृत्यूनंतर ते माझ्या शरीराचे तुकडे करून सुळावर टांगतील."

माननीय अस्मा (र.) म्हणाल्या, ''हे शूर बाळा ! शेळीला कापल्यावर तिची चामडी ओढली काय आणि तिचे तुकडे केले काय, त्याने काय होणार ? तू ईश्वराचे नाव घेऊन युद्ध कर ! मृत्यूच्या भयाने असत्याची साथ देण्याची नामुष्की पत्करू नकोस. ईश्वराची शपथ ! प्रतिष्ठापूर्ण मृत्यू अपमानजनक सत्तेपेक्षा खूप श्रेष्ठ आहे. सत्य मार्गात लढताना शत्रूच्या तलवारींच्या घावांनी तुकडे तुकडे होणे हे पथभ्रष्टांच्या गुलामगिरीपेक्षा हज्जार पटीने श्रेष्ठ आहे !''

आपल्या मातेच्या या सत्यसमर्थक शब्दांनी माननीय इब्ने जुबैर (र.) खूप भावनावश झाले. त्यांनी आपल्या मातेस कवटाळले आणि म्हणाले,

''मातावर्य! मीदेखील असाच निश्चय केला आहे की, सत्यमार्गात प्राणपणाला लावून शत्रूंचा सामना करावा. परंतु मी केवळ आपला सल्ला घेऊ इच्छित होतो, जेणेकरून माझ्या मृत्यूनंतर आपणास दुःख होऊ नये. सर्व प्रशंसा ईश्वरासाठीच आहे. आपण माझ्यापेक्षाही जास्त धैर्यशील आणि संयमी आहात. आपल्या आदेशाने माझ्या श्रद्धेमध्ये बळ आणि निश्चयामध्ये शक्ती निर्माण केली. मी आज अवश्य हुतात्मा होईन. मला पूर्ण विश्वास आहे की, माझ्या हौतात्म्यानंतरही आपण अशाच धैर्य व संयमी स्वभावाचे दर्शन घडवाल. ईश्वराची शपथ ! मी कधीच वाईट आणि ईश्वरास न आवडणारी बाब पसंत केली नाही. कोणावरही अत्याचार केले नाहीत. दिलेला शब्द कधी मोडला नाही. आता केवळ ईश्वराच्या प्रसन्नतेशिवाय मला काहीच नको !'' मग त्यांनी आकाशाकडे पाहून म्हटले, ''हे ईश्वरा ! या सर्व गोष्टी मी गर्वाने नव्हे तर आपल्या मातेच्या मन:शांतीस्तव केल्या आहेत.''

''जा मुला ! ईश्वराच्या मार्गात आपल्या प्राणाचा बळी दे. मी मुळीच धैर्य सोडणार नाही !'' आणि त्यांनी माननीय इब्ने जुबैर (र.) यांना उराशी कवटाळले. परंतु मातेच्या हाताला माननीय इब्ने जुबैर यांनी अंगावर घातलेल्या लोखंडी चिलखताचा स्पर्ष होताच त्यांनी विचारले,

''बेटा हे काय आहे ?''

''हे शत्रूच्या वारांपासून आपला बचाव करण्यासाठी चिलखत आहे !''

''बेटा ! हुतात्मा होण्यासाठी जात आहेस आणि अशा वस्तुंचा आधार घेतोस ?'' मातेने विचारले. माननीय इब्ने जुबैर (र.) यांनी तत्काळ लोखंडी चिलखत काढून टाकले आणि डोक्यावर पांढरा रूमाल गुंडाळून आईस म्हणाले,

''हे मातावर्य ! आता तर आपण प्रसन्न आहात ना ?''

''होय, आता मी खूप समाधानी आहे. जा ! ईशमार्गात लढ आणि याच पोषाखात ईश्वरासमोर हजर हो !''

# (१०)

आपल्या धैर्यशील मातेचा निरोप घेऊन माननीय इब्ने जुबैर (र.) यांनी आपल्या बाह्या चढ़विल्या आणि तलवार उचलून रणभूमीत उतरले. या वेळी त्यांची फौज अगदीच थोडीशी होती. त्यांच्या सोबत त्यांचे दोन सुपूत्र आणि काही जीवलग साथीदार होते. ते मोठ्या शौर्याने शत्रुंवर हल्ले करीत होते. ते जिकडे तोंड फिरवित तिकडे त्यांचे शत्रू पळ काढ़ीत असत. ते ७२ वर्षांचे असूनदेखील एखाद्या तरुण दमाच्या शिपायाप्रमाणे लढ़ा देत होते. आपल्या दोन्ही हातांनी तलवार चालवीत ते दूरपर्यंत शत्रूंच्या जमावात घुसले आणि परत लढत लढत येऊन आपल्या साथीदारांपर्यंत आले. त्यांचे साथीदार शिपाई एकेक करून हुतात्मे झाले. मागून कोणीतरी सांगितले, ''आज्ञा असेल तर मी पवित्र काबाचा दरवाजा उघडतो. आपण आत जाऊन सुरक्षित व्हाल. परंतु माननीय इब्ने जुबैर (र.) यांनी आवेशाने उत्तर दिले, ''मी अपमान पत्करून जीवन स्वीकारणारा आणि मृत्यूच्या भीतीने स्वसंरक्षणास्तव पायऱ्या चढणारा नाही. मला अशा बाणाचे आकर्षण वाटते, जो माझी भेट मृत्यूशी करून देणारा आहे.''

यानंतर ते सिंहाप्रमाणे तुटून पडले आणि दुपारपर्यंत अत्यंत शौर्याने लढत राहिले. इथपर्यंत त्यांना खूप जखमा झाल्या. परंतु त्यांच्या माथ्यावर थकवा जाणवत नव्हता. एवढ्यात एका काळ्यावर्णीय माणसाने त्यांना शिवी दिली. त्यांनी तलवारीच्या एकाच घावात त्याचे दोन तुकडे केले. शेवटी शत्रूफौजेच्या एका शिपायाने त्यांच्या डोक्यावर दगडाचा प्रहार केला आणि त्यांच्या मस्तकातून रक्त वाहू लागले. खूप रक्त वाहिल्याने त्यांची शुद्ध हरवत होती. याच संधीचा फायदा उचलून शत्रूंनी त्यांच्या शरीरावर तलवारींचा वर्षाव केला आणि माननीय इब्ने जुबैर (र.) धारातिर्थी कोसळले. शत्रूंनी तत्काळ त्यांचे शीर धडावेगळे केले

हिज्जाज बिन यूसुफला इब्ने जुबैर (र.) यांच्या हौतात्म्याची वार्ता मिळताच त्याच्या आनंदास पारावार राहिला नाही. त्याने त्यांचे डोके अब्दुल मलिक बिन मरवानकडे 'दमास्कस'ला पाठविले आणि त्यांचे शरीर उंच सुळावर लटकविले. माननीय अब्दुल्लाह बिन उमर (र.) तेथून जात असताना. माननीय इब्ने जुबैर (र.) यांचे शव त्यांच्या नजरेस पडले आणि त्यांना एक जोरदार झटका बसला. त्यांना दु:ख अनावर झाले. त्यांनी इब्ने जुबैर (र.) यांचे शव पाहून म्हटले,

''अबू खबीब ! अस्सलामुअलैकुम, ईश्वराची शपथ ! आपण नमाजी आणि रोजेदार (उपवास ठेवणारे) सज्जन व्यक्ती होता.''

इब्ने जुबैर (र.) यांच्या हौतात्म्यानंतर त्यांच्या माता सन्माननीय अस्मा (र.) ह्या 'हजून'च्या स्थळावर गेल्या. याच स्थळावर इब्ने जुबैर (र.) यांचे शव टांगले गेले होते. योगायोगाने हिज्जाज बिन यूसुफसुद्धा तेथेच होता. सन्माननीय अस्मा (र.) यांना सांगण्यात आले की, हिज्जाज तुमच्या बाजूला उभा आहे. तेव्हा त्यांनी त्यास उद्देशून म्हटले,

“घोड्यावर स्वार झालेला हा स्वार कधी पायउतार होणार?”

“तो नास्तिक होता. त्याची हीच शिक्षा आहे.” हिज्जाज ने उत्तर दिले.

माननीय अस्मा म्हणाल्या, “ईश्वराची शपथ ! तो तर (अर्थात माननीय इब्ने जुबैर (र.)) नमाज पढणारा आणि रोजे धरणारा सज्जन आणि ईशपरायण होता. नास्तिक मुळीच नव्हता.”

“हे म्हातारे ! येथून निघून जा. तुझी अक्कल ठिकाणी नाही !”

“अक्कल तर तुझी ठिकाणावर नाही. मी आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांना हे म्हणाताना ऐकले की, सक़ीफ़ परिवारात एक खोटारडा आणि एक निर्दयी व निष्ठूर माणुस जन्माला येईल. म्हणजे खोटारड्या माणसाला (अर्थात मुख्तार सक़फ़ील) आम्ही पाहिले आणि तो निर्दयी व निष्ठूर माणूस तूच आहेस.”

आणखीन एका इतिहासकथनात आहे की, ज्या वेळेस माननीय इब्ने उमर (र.) यांनी इब्ने जुबैर (र.) यांचे टांगलेले शव पाहून त्यांची प्रशंसा केली, तेव्हा हिज्जाज बिन यूसुफने त्यांचे शव यहूदींच्या (‘ज्यू’ लोकांच्या) कब्रस्तानमध्ये फेकून दिले आणि त्यांच्या माता सन्माननीय अस्मा (र.) यांना बोलावले. परंतु त्यांनी येण्यास नकार दिला. हिज्जाज भयंकर संतापला आणि निरोप पाठविला की, “ताबडतोब या अन्यथा डोक्याचे केस धरून खेचून आणण्यात येईल.” हा निरोप ऐकताच अस्मा (र.) म्हणाल्या, “ईश्वराची शपथ ! जोपर्यंत तू केस धरून फरफटत ओढून घेऊन जात नाही, तोपर्यंत येणार नाही.” हे उत्तर ऐकून स्वत: हिज्जाज बिन यूसुफ त्यांच्याकडे आला आणि म्हणाला,

“खरोखर सांग, ईश्वराच्या शत्रूची काय परिणती झाली? त्याने किती भयानक परिणाम भोगला?”

माननीय अस्मा (र.) उत्तरल्या, “तू तर केवळ त्यांचे ऐहिक जीवन बरबाद करू शकलास, परंतु त्याने तुझे पारलौकिक जीवन पार नष्ट करून टाकले. मी आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांच्याकडून ऐकले की, ‘सक़ीफ़’ परिवारामध्ये एक खोटारडा आणि एक क्रूर व निर्दयी जन्माला येईल. खोटारडा (मुख़्तार सक़फ़ी) आम्ही पाहिला आणि क्रूर व निर्दयी मात्र तू आहेस.”

माननीय अस्मा (र.) यांचे सडेतोड़ उत्तर ऐकून हिज्जाज बिन यूसुफ़ला काही सुचत नव्हते. तो तेथून गुपचूप चालता झाला. माननीय इब्ने जुबैर (र.) यांच्या हौतात्म्याच्या काही काळानंतरच माननीय अस्मा (र.) या स्वर्गवासी झाल्या.

(११)

माननीय इब्ने जुबैर (र.) यांची गणना प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या अशा सोबत्यांमध्ये होते, जे ज्ञान आणि धर्म विद्येत पारंगत होते. माननीय इब्ने जुबैर (र.) यांच्या शिक्षण आणि प्रशिक्षणात त्यांचे आजोबा आणि प्रेषितांचे सासरे माननीय अबू बकर (र.), त्यांच्या माता सन्माननीय अस्मा (र.), सन्माननीय आयशा (र.) त्यांच्या मावशी व प्रेषितभार्या यासारख्या महान सोबत्यांचा मोलाचा वाटा आहे.

इस्लाम धर्मशास्त्राचा मूळ स्त्रोत असलेले दिव्य कुरआनचे ते प्रगल्भित विद्वान आणि पाठक होते. कधीकधी ते दिव्य कुरआनचे स्पष्टीकरण करीत असत. त्यांचे कुरआनचे स्पष्टीकरणाचा काही अंश 'सहीह बुखारी' या हदीसग्रंथातदेखील आहे. दिव्य कुरआनाच्या पठणाचा त्यांना विशेष छंद होता, म्हणून त्यांना 'कारीउल कुरआन' अर्थात कुरआनपाठक म्हटले जात असे.

माननीय इब्ने जुबैर (र.) यांनी आदरणीय प्रेषितांकडून तेहतीस 'प्रेषितवचने' कथन केली आहेत. धर्मविधीशास्त्रात त्यांना विशेष प्राविण्य लाभलेले होते. तसेच त्यांना अरबी भाषेशिवाय इतर बऱ्याच भाषा अवगत होत्या. त्यांच्याकडे विविध भाषा बोलणारी नोकरचाकर मंडळी होती. (संदर्भ : मुस्तदरक हाकिम) माननीय इब्ने जुबैर हे कुशल वक्ते देखील होते. तसेच त्यांना कवन आणि साहित्याचेदेखील विशेष ज्ञान होते.

(१२)

माननीय इब्ने जुबैर (र.) हे उच्चनीतिमत्तेचे मूर्त उदाहरण होते. उपासना, भक्ती, परखड भाषणशैली, धैर्य व संयम, प्रेषित जीवनचरित्राचा अंगीकार आणि शौर्य व युद्धकला यासारखे विशेष गुणधर्म त्यांच्यात होते. नमाज़ अदा करते वेळेस ईशस्मरणात एवढे तल्लीन होत असत की, नमाजसाठी उभे राहिल्यास एखाद्या तठस्थ खांबाप्रमाणे दिसत. अगदी थोडे देखील हलत डुलत नसत. पक्षी व कबुतरे त्यांच्या डोक्यावर व खांद्यावर बसत असत. माननीय अब्दुल्लाह बिन अब्बास (र.) म्हणत असत की, इब्ने जुबैर (र.) यांची नमाज आदरणीय प्रेषितांच्या नमाजीचे मूर्त उदाहरण आहे.

माननीय इब्ने जुबैर (र.) हे स्पष्टवक्ता होते. जी गोष्ट मनात असेल ती बोलून दाखवीत असत आणि कोणत्याही परिस्थितीस न जुमानता परखडपणे सत्य समोर ठेवीत असत. अमीर मआविया (र.) हे सामर्थ्यशाली शासक होते. परंतु 'यज़ीद'च्या राज्याभिषेकावेळी माननीय इब्ने जुबैर (र.) यांनी त्यांच्या सामर्थ्य व शक्तीस झुगारून देऊन त्यांचा तीव्र विरोध केला. कारण हा राज्याभिषेक लोकतंत्रविरोधी होता.

'यज़ीद' याने पाठविलेल्या लष्कराचा सरसेनापती 'हसीन बिन नबीज' याने सीरियाला येऊन आपले शासन घोषित करण्याचे निमंत्रण दिले व त्यात एक अट अशी ठेवली की, लष्कराने केलेल्या जनतेच्या कत्तलीस माफ करावे. परंतु इब्ने जुबैर (र.) यांनी त्याची ही अन्यायी व अमानुष अट झुगारुन दिली आणि स्पष्ट शब्दांत खड़सावले की, जनतेच्या प्रत्येक रक्ताच्या थेंबाचा बदला घेतल्याशिवाय राहणार नाही.

इस्लामी नियमांवर आधारित शासनाच्या या इस्लामी शासकाच्या बारा वर्षांच्या कारकिर्दीत त्यांना एकही दिवस विश्रांती मिळाली नाही. उमैया परिवाराशी कलह, मुख्तार सक़फ़ीचे बंड, ख़ारिजीन नावाच्या धर्मभ्रष्ट पंथाचे बंड आणि इतर प्रकारचे उपद्रव मोडीत काढण्यात त्यांचा संपूर्ण कार्यकाळ खर्ची झाला. या संपूर्ण प्रतिकूल परिस्थितीतही त्यांनी मोठ्या धैर्य आणि संयमाने परिस्थितीचा सामना केला. अगदीच शेवटच्या काळातील मक्का शहराच्या वेढ्याच्या वेळीसुद्धा अर्थात यशाची कोणतीही आशा नसताना त्यांनी जीवनाच्या अंतिम क्षणापर्यंत सत्य समर्थनार्थ अविश्रांत लढा दिला. त्यांनी आपल्या शासनकाळात पूर्णत: इस्लामी घटना व इस्लामी संविधान लागू केले. यासाठी त्यांनी बळाचा वापर करण्यासही मागे पुढे पाहिले नाही.

युद्धकला आणि शौर्याच्या व रणभूमी गाजविण्याच्या बाबतीत अरब प्रदेशातील सर्वच शूरवीर त्यांना आपले आदर्श मानीत असत. अरब प्रदेशाच्या एका अत्यंत शूर असलेल्या आणि युद्धकलेत पारंगत असलेल्या 'मुहल्लब' यास एकाने विचारले की,

''या काळात 'अरब प्रदेशाचे शूरवीर' कोणास म्हणता येईल?'' त्याने उत्तर दिले की,

''मुसैब बिन ज़ुबैर (र.), उमर बिन उबैदुल्लाह आणि 'इबाद बिन हसीन' हे अरब प्रदेशाचे शूरवीर आहेत.'' प्रश्न कर्त्याने विचारले,

''आणि 'इब्ने ज़ुबैर'?'' त्याने ताड़कन उत्तर दिले, ''ते तर युद्धाचे 'राक्षस' आहेत. मी मानवांबाबतीत बोलत होतो.''

# माननीय खालिद बिन वलीद (र.) 'सैफुल्लाह'

(१)

माननीय खालिद बिन वलीद (र.) इस्लामचे असे महान लढवय्ये, सरसेनापती आणि ध्वजवाहक आहेत की त्यांचे नाव ऐकताच छाती गर्वाने फुलते आणि नवचैतन्य निर्माण होते. खालिद बिन वलीद (र.) यांच्याकरीता स्वयं आदरणीय प्रेषितांनी ईश्वर दरबारी प्रार्थना केली होती की, 'हे ईश्वरा! 'खालिद' यांना इस्लाम धर्माच्या स्वीकृतीचे भाग्य लाभू दे !'

माननीय खालिद बिन वलीद (र.) हे 'अमरु बिन आस (र.)' आणि 'उस्मान बिन तलहा (र.) यांच्या सोबत प्रेषितदरबारी हजर झाले आणि आदरणीय प्रेषितांच्या हाती इस्लाम धर्माची दीक्षा घेतली. आदरणीय प्रेषितांनी त्यांना 'सैफुल्लाह' (अर्थात 'ईश्वराची तलवार') च्या उपाधीने सम्मानित केले आणि म्हटले, ''खालिद (र.) हे ईश्वराने इस्लामद्रोह्यांसाठी उपसलेली एक तलवार आहे.''

माननीय खालिद बिन वलीद (र.) यांची शौर्यगाथा आणि युद्धकौशल्याचे उदाहरण जगाच्या इतिहासात सापडणे केवळ कठीणच नव्हे तर अशक्य आणि अविस्मरणीय आहे.

नि:संदेह माननीय खालिद बिन वलीद (र.) इस्लामी इतिहासाचा एक अमूल्य ठेवा आहे. इस्लाम धर्मासाठी जीवाची बाजी लढ़वून इस्लामद्रोही शक्तींचा नायनाट करणाऱ्या माननीय खालिद बिन वलीद (र.) या शूरपुरुषाचे जीवनचरित्र आपल्या सर्वांसाठी एक अविस्मरणीय उदाहरण होय.

(२)

इस्लामपूर्व काळापासूनच प्रतिष्ठित असलेल्या 'मख़्ज़ूम' या परिवाराचे ते सुपुत्र असून मक्का शहरात स्थापन करण्यात आलेल्या नागरी शासनाचे नेतृत्व याच परिवाराकडे होते. माननीय खालिद बिन वलीद (र.) यांच्या वडिलांचे नाव 'वलीद बिन मुग़ैरा' आणि आईचे नाव 'लबाबतुस्सुग़रा' असे होते.

माननीय ख़ालिद बिन वलीद (र.) यांचे वडील हे मख़्ज़ूम परिवाराचे सरदार आणि कुरैश परिवाराचे मोठे वजनदार आणि प्रतिष्ठित गर्भश्रीमंत व्यक्ती होते. समाजात यांचे खूप वजन होते. कुरैश परिवार सुद्धा त्यांचा खूप आदर करीत असे.

वलीद बिन मुग़ैरा हे केवळ श्रीमंत आणि शूरवीरच नसून त्यांच्यात कमालीची विद्या, ज्ञान आणि नेतृत्वकौशल्य, तसेच वक्तृत्वकौशल्यदेखील होते. लोकांच्या भांडणतंट्यांची तडजोड आणि उभय पक्षांतील वादविवाद ते अत्यंत चाणाक्ष बुद्धीने

आणि कौशल्यपूर्ण शैलीने संपुष्टात आणीत असत. म्हणूनच अरबजण त्यांना न्यायप्रिय, दृष्टे आणि पुढारी यासारख्या उपाधिंनी संबोधित असत. श्रीमंती आणि वैभव त्यांच्या घरी सदैव नांदत असे. 'ताईफ़' मध्ये त्यांच्या भरपूर बागा होत्या. हज यात्रेच्या वेळी ते एकटेच संपूर्ण हज यात्रेकरूंचा पाहुणचार करीत आणि त्यावर लाखोंचा खर्च करीत असत. अशा प्रकारे सर्व तऱ्हेच्या वैभवसंपन्न घराण्याचे खालिद बिन वलीद (र.) हे सुपुत्र होत.

आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांनी वयाच्या चाळीसाव्या वर्षी इस्लाम धर्माचा प्रचार व प्रसार सुरु केला तेव्हा अरबजणांचे एक शिष्टमंडळ प्रेषितांचे काका 'अबू तालिब' यांना येऊन भेटले आणि म्हणाले की, आपले पुतणे मुहम्मद (स.) यांना धर्मप्रचार करण्यापासून परावृत्त करावे अन्यथा त्यांचे समर्थन अथवा पाठराखण करू नये. या शिष्टमंडळात वलीद बिन मुग़ैरासुद्धा सामील होते. त्यांनी तर हे देखील सांगितले की, मुहम्मद (स.) यांना आमच्या स्वाधीन करावे आणि मोबदल्यात माझा तरूण पुत्र 'अम्मारा' घ्यावा. परंतु 'अबुतालिब' यांनी त्यांचा प्रस्ताव धुडकावला.

(३)

माननीय अब्दुल्लाह बिन अब्बास (र.) यांचे कथन आहे की, या शिष्टमंडळाने आदरणीय प्रेषितांसमोरही प्रस्ताव ठेवला की, आपणास हवी तेवढी संपत्ती देऊ सरदारकी देऊत. अरब प्रदेशातील सर्वांत सुंदर असलेल्या तरुणीशी आपला विवाह करून देऊ, परंतु आपण इस्लामचा प्रचार करताना आम्ही मुळीच खपवून घेणार नाही. तुमच्या तोंडून आमच्या विभूंतीविरुद्ध व आमच्या पारंपरिक धर्माविरुद्ध निघणारे शब्द मुळीच ऐकून घेतले जाणार नाही. आदरणीय प्रेषितांनी त्यांचा कोणताही प्रस्ताव न स्वीकारता इस्लाम धर्माचा प्रसार व प्रचार सुरुच ठेवला आणि त्यांना रोखठोख शब्दांत बजावले,

''मी जो धर्म तुमच्यासमोर सादर करीत आहे, तो ईश्वरीय धर्म असून तो तुमच्यासमोर मी यासाठी सादर करीत नाही की, मला तुमची संपत्ती मिळावी, सुंदर व अतिसुंदर मुलींशी लग्न करून त्यांचा उपभोग घ्यावा आणि तुमच्यावर शासन करावे. माझा उद्देश या गोष्टींची प्राप्ती नसून मला स्वयं ईश्वरानेच दिव्य ज्ञान आणि आचरण, मार्गदर्शन देऊन तुमच्याकडे पाठविलेले आहे. तसेच मला एक दिव्य ग्रंथ देऊन तुमच्याकडे पाठविले आहे आणि असा आदेश दिला आहे की, मी तुम्हाला सत्यमार्गाचे दर्शन घडवावे, सदाचरणाचे मार्गदर्शन करावे. म्हणून मी ईश्वराचा संदेश तुमच्यापर्यंत पोहोचविला आहे की, तोच एकमेव पूज्य असून मी तुमच्या व सर्व जगाच्या मार्गदर्शनासाठी पाठविलेला प्रेषित आहे आणि जगातला प्रत्येक माणूस आपल्या कर्मांचा हिशोब देईल. त्याच्या सदाचरणाचे त्यास उत्तम फळ मिळेल आणि दुष्कर्मांची

शिक्षा त्यास भोगावीच लागल. मी सांगितलेल्या सत्य वचनाचा तुम्ही स्वीकार केल्यास तुम्हास ऐहिक आणि पारलौकिक यश मिळेल. जर तुम्ही हे सत्यवचन नाकारले. तर ईश्वरच तुमच्या आणि माझ्या विवादाचा अंतिम निर्णय करील !''

काही इतिहासकारांचे मत असे आहे की, या अरब शिष्टमंडळाचे सरदार आणि नेते 'वलीद बिन मुग़ैरा' यांनी आदरणीय प्रेषितांवर अवतरित झालेल्या दिव्य कुरआनास ईश्वरीय ग्रंथ असण्याचा मनोमन स्वीकारदेखील केला आणि काही प्रसंगी दबलेल्या स्वरात या गोष्टीचा उल्लेखदेखील केला, परंतु 'अबुजहल' या इस्लामद्रोह्याने त्यांना स्वस्वाभिमान आणि पारंपरिक धर्मप्रथेची आन देऊन इस्लाम स्वीकारण्यापासून परावृत्त केले.

इस्लामद्रोह्यांनी सामान्यजणांना आदरणीय प्रेषितांनी सादर केलेल्या इस्लामपासून दूर ठेवण्याचा जीवापाड खटाटोप चालू ठेवला होता. इस्लामद्रोही चळवळीमध्ये सर्वांत पुढे 'अबू जहल' होता. परंतु ही चळवळ 'वलीद बिन मुग़ैरा' यांच्याच मार्गदर्शनात चालू होती. कारण या चळवळीत सर्वांत जास्त चतुर आणि बुद्धिमान हाच माणूस होता. अशा प्रकारे इस्लामद्रोही असणाऱ्या, बुद्धिमान, धनाढ्य आणि बलाढ्य शक्ती आणि समाजात प्रतिष्ठापूर्ण वचक असलेल्या 'वलीद बिन मुग़ैरा' सारख्या व्यक्तीच्या पोटी 'माननीय खालिद बिन वलीद (र.) हे हिजरी सन पूर्व ३५ मध्ये जन्मले.आदरणीय प्रेषितांच्या प्रेषितत्वाच्या वेळी ते २२ वर्षांचे देखणे तरुण होते. बालपणापासूनच त्यांना कुस्ती, घोडेस्वारी, धनुर्विद्या आणि इतर शारीरिक पराक्रम करण्याचा कमालीचा छंद होता. कोणाचेही भय आणि भीती नावाची गोष्ट त्यांच्या जणू स्वभावातच नव्हती. ते खूप जोमाने व्यायाम करीत. युद्धकलेत नवनवीन तंत्राचा शोध लावीत. घोडेस्वारी, तलवारबाजी, भालाफेक आणि इतर युद्धकौशल्यांच्या स्पर्धेत ते नेहमीच बाजी मारीत असत. बुद्धिमत्ता, तरतरी, तापटपणा आणि चातुर्य यासारखे गुणधर्म त्यांच्या अंगी होते. कोणत्याही संकटातून मार्ग काढण्याचे कमालीचे कौशल्य त्यांच्यात आढळून येते. परिवाराच्या पारंपरिक प्रशिक्षण आणि वातावरणामुळे त्यांचे कौशल्य आणखीनच वृद्धिंगत झाले. पित्याच्या मृत्यूनंतर या बलाढ्य आणि धनाढ्य, बुद्धिमान आणि चतुर परिवारजणांच्या तसेच कबिल्यातील सर्वच लोकांच्या नेतृत्वाची जबाबदारी त्यांच्यावरच येऊन ठेपली. त्यांच्या वारसाहक्कात अमाप संपत्ती त्यांच्या हाती आली आणि ते एक यशस्वी व्यापारी सिद्ध झाले.

पित्याप्रमाणेच ते इस्लाम स्वीकारण्यापूर्वी इस्लामचे कट्टर विरोधक होते. इस्लामविरोधी कारवायासुद्धा मोठ्या जोमाने करीत असत. परंतु चातुर्य आणि बुद्धिमत्तेसह त्यांच्यात विवेकपूर्ण विचार करण्याची पात्रतादेखील असल्याने ते इस्लामी

शिकवणींनी खूप प्रभावित झाले. त्यांचे लहान बंधु इब्ने वलीद (र.) यांनी आपल्या सुस्वभावामुळे त्यांच्या पूर्वीच इस्लामचा स्वीकार केला होता. त्यांनी आपले बंधु खालिद बिन वलीद (र.) यांना मदीनाहून पत्र पाठविले की,

''परम दयाळू व परम कृपाळू ईश्वराच्या नावाने''

''तुमच्यासारख्या चतुर, बुद्धिमान व विवेकशील माणसाने इस्लामचा एवढ़ा विरोध करण्याचे मला खूपच आश्चर्य वाटते. खरे पाहता तुमच्यासारखा सूज्ञ माणूस इस्लामच्या सत्यनिष्ठ असण्यावरसुद्धा तुमचा विश्वास आहे. आदरणीय प्रेषितांनी मला विचारले, ''खालिद यांचे काय चालले आहे?'' मी म्हणालो, ''हे प्रेषिता! खालिद यांचे मनपरिवर्तन केवळ ईश्वराच्याच हाती आहे.'' आदरणीय प्रेषित म्हणू लागले, ''खालिद यांच्यासारखा माणूस इस्लामच्या वास्तविकतेपासून अनभिज्ञ राहुच शकत नाही. ते जर मुस्लिमांची साथ देऊन ईशद्रोह्यांशी सामना करतील, तर ते त्यांच्या हिताचे ठरेल. म्हणून हे बंधु ! तुमच्या जीवनाचा बराच काळ मार्गभ्रष्टतेतच वाया गेला. आता तरी सत्य धर्माचा स्वीकार करा आणि इस्लामच्या छत्रचायेत या.''

या पत्रामुळे माननीय खालिद बिन वलीद (र.) यांचे विचार बदलत गेले. काही दिवसांनंतर ते प्रेषितदरबारी हजर झाले आणि इस्लामचा स्वीकार केला. स्वत: खालिद बिन वलीद (र.) यांनी आपल्या इस्लाम स्वीकृतीचा वृत्तांत या शब्दांत मांडला -

''माझा भाऊ इब्ने वलीद (र.) यांच्या पत्रामुळे माझ्या अंत:करणावरील दाट तिमिर पार नष्ट झाले आणि मी इस्लामच्या देदिप्यमान प्रकाशित मार्गाकडे वळलो. आदरणीय ''प्रेषित मुहम्मद (स.) यांनी स्वत: एवढ्या आपुलकी आणि आस्थेने माझी चौकशी केली. मी तर त्यांचा कट्टर विरोधक आणि शत्रू असूनही माझ्याविषयी त्यांची ही काळजी पाहून मलादेखील खूपच आनंद झाला आणि मी प्रेषितदरबारी हजर होण्याचा पक्का निश्चय केला. मी मदीना शहरी जाण्यास निघालो तेव्हा मला 'सफ़वान' आणि 'अक्रमा' भेटले आणि मी त्यांना म्हणालो, ''मुहम्मद (स.) यांचे अरब आणि अजम (अरबेतर) वर प्रभुत्व वाढत आहे. आपणही त्यांची साथ दिल्यास त्यांना मिळणाऱ्या प्रभुत्व आणि प्रतिष्ठेत आपणही सहभागी होऊ. परंतु माझा सल्ला त्यांनी स्पष्टपणे नाकारला. मग मी आपले मित्र 'उस्मान बिन वलहा' यांना भेटलो आणि म्हणालो, ''हे उस्मान! मुस्लिमांचे प्रभुत्व दिवसेंदिवस वाढत आहे. एक वेळ अशी येईल की, ते आपले स्वामी व आपण त्यांचे गुलाम बनू. त्यापेक्षा ती वेळ येण्यापूर्वी आपणही इस्लामचा स्वीकार केला तर जास्त उत्तम ठरेल.'' उस्मान बिन तलहा यांना ही गोष्ट मी भीतभीतच केली. कारण त्यांचें पिता आणि चार भाऊ मुस्लिमविरोधी युद्धात ठार झाले होते. त्यामुळे मला वाटत होते की, तेसुद्धा 'सफ़वान' आणि

'अक्रमा' प्रमाणेच माझा प्रस्ताव नाकारतील. परंतु उस्मान बिन तलहा (र.) यांनी तर मला आश्चर्याचा धक्काच दिला. त्यांनी माझा प्रस्ताव तत्काळ स्वीकारला. दुसऱ्या दिवशी सकाळीच आम्ही दोघे 'मदीना' शहराकडे निघालो. 'हुदा' या स्थानावर अमरु बिन आस (र.) यांची भेट झाली. ते ॲबीसीनियाकडून येत होते. त्यांनी विचारले,

"हे खालिद ! कोठे निघालात ?"

"ईश्वराची शपथ ! आम्ही आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांच्याकडे इस्लाम स्वीकारण्याकरिता निघालो आहोत. मग आम्ही एकत्रितपणे मदीना शहरी प्रेषितदरबारी हजर होण्याकरिता निघालो. आमच्या आगमनाची वार्ता प्रेषितांना लागताच त्यांना खूप आनंद झाला आणि त्यांनी सोबत्यांना संबोधून म्हटले की, 'मक्का' शहराचे लाडके आमच्या स्वाधीन होत आहेत.' मी प्रेषितांना भेटण्यापूर्वी नवीन पोषाख अंगावर चढविला आणि प्रेषितांकडे निघालो. रस्त्यातच मला माझे बंधु इब्ने वलीद भेटले आणि म्हणाले, "चला ! आदरणीय प्रेषित तुमच्या आगमनाने खूप आनंदीत झाले. ते तुमची अतूरतेने वाट पाहात आहेत." आम्ही सर्वजण लगबगीने प्रेषितांकडे हजर झालो. प्रेषितांनी स्मित हास्याने आमचे स्वागत केले. आम्ही जवळ जाऊन प्रेषितांना सलाम केला. प्रेषितांनी आमच्या सलामचे उत्तर दिले. मी म्हणालो, "मी साक्ष देतो की, ईश्वर एक असून त्याचा कोणीच भागीदार नाही आणि मुहम्मद (स.) ईश्वराचे प्रेषित आहेत." प्रेषित म्हणाले, "ईश्वराची कृपा आहे की, तुम्हाला ईश्वराने इस्लाम स्वीकृतीची सुबुद्धी दिली. मला देखील हीच आशा होती की, तुमच्या विवेकशील स्वभावामुळे तुम्ही या सत्याचा अवश्य स्वीकार कराल."

"हे प्रेषित!" मी म्हणालो, "आजपर्यंत तुमच्याविरुद्ध बऱ्याच लढाया लढण्याचे पाप केले आहे. आपण ईशदरबारी मला या पापांतून मोक्ष मिळण्याची प्रार्थना करावी." प्रेषितांनी उत्तर दिले, "इस्लामचा स्वीकार केल्याने माणसाचे सर्व पाप नष्ट होतात." मी आश्चर्यचकित होऊन प्रेषितांकडे पाहिले, "हे प्रेषिता, खरोखरच?" यानंतर आदरणीय प्रेषितांनी ईशदरबारी प्रार्थना केली,

"हे ईश्वरा! तुझ्या धर्माविरुद्ध केलेल्या खालिद बिन वलीद (र.) च्या कारवायांचे पाप क्षमा कर !"

यानंतर 'अमरु बिन आस (र.)' आणि 'उस्मान बिन तलहा (र.)' यांनी इस्लाम स्वीकारला. मी (माननीय खालिद बिन वलीद (र.)) इस्लाम स्वीकारल्यावर मदीना शहरातच स्थायिक झालो. यासह मला मक्काहून मदीनास स्थलांतराच्या पुण्यकर्माचेही सौभाग्य लाभले. ही घटना मक्काच्या विजयाच्या सहा महीने पूर्वीची आहे. माननीय खालिद (र.) म्हणतात की, "आदरणीय प्रेषितांनी माझ्या निवासस्थानाचाही प्रबंध केला."

(४)

इस्लाम स्वीकारल्यावर माननीय खालिद बिन वलीद (र.) हे इस्लाम धर्माचे दोन मजबूत बाहू बनले आणि त्यांनी आपल्या धारदार तलवारीने इस्लामद्रोह्यांचा खरपूस समाचार घेतला. मोठमोठ्या इस्लामद्रोही बहादुरांना रणांगणात धूळ चारली. माननीय खालिद बिन वलीद (र.) इस्लाम स्वीकारल्यावर सर्व प्रथम 'मौता' च्या युद्धात आपली तलवार ईशद्रोह्यांवर चालवून शत्रूला धूळ चारली. त्यांच्या इस्लाम स्वीकारण्याच्या दोन महिन्यांनंतरच हे युद्ध झाले. मुस्लिम आणि ईशद्रोह्यांदरम्यान 'मौता' या स्थानावर घनघोर युद्ध झाले. या युद्धामध्ये माननीय झैद बिन हारिस (र.) माननीय जाफ़र बिन अबी तालिब (र.) आणि अब्दुल्लाह बिन रवाहा (र.) हे शत्रुंशी लढताना हुतात्मे झाले. म्हणून संपूर्ण लष्कराचे नेतृत्व माननीय खालिद बिन वलीद (र.) यांनी सांभाळले आणि शत्रूंच्या लष्करावर जोरदार हल्ला चढविला. खालिद बिन वलीद (र.) यांच्या हल्ल्यापुढे शत्रूंच्या लष्कराचे पाय डगमगले. शत्रूपक्षाच्या लष्कराचे शेकडो शिपाई मृत्यूमुखी पडले. अशा प्रकारे शत्रूपक्षाच्या हजारोंच्या लष्करास पराभूत करून माननीय खालिद बिन वलीद (र.) यांनी इस्लामी लष्करास विजय मिळवून दिला.

(५)

इसवी सन पूर्व सुमारे दोन हजार वर्षांपूर्वी इस्राईली वंशातील प्रेषितांवर अवतरित झालेल्या 'तौरेत' या ईश्वरीय ग्रंथात एक भविष्यवाणी करण्यात आली होती ती अशी की,

''ईश्वराचा प्रेषित 'सीना' पर्वताकडून येईल आणि 'फारान' च्या शिखरांकडून आपल्या दहा हजार पवित्र अनुयायांसोबत प्रकट होईल. त्याच्या उजव्या हाती दिव्य प्रकाश (दिव्य कुरआन) असेल.'' (संदर्भ : तौरेत प्रकरण इस्तिस्ना)

अर्थातच आदरणीय प्रेषितांनी मदीना शहरातून मक्कावर ताबा मिळविण्यासाठी निघताना इस्लामी लष्कराच्या 'मौमिना' या तुकडीचे सेनापती त्यांना बनविले. आपल्या लष्करास प्रेषितांनी आधीच सूचना दिल्या होत्या की, मक्काच्या लष्कराने हल्ला केला तरच तुम्ही त्यांच्यावर हल्ला करावा. मक्का शहरातील इस्लामद्रोह्यांचे सामुदायिकरीत्या मुस्लिम लष्करावर हल्ला करण्याचे धैर्य झाले नाही. परंतु अक्रमा बिन अबू जहल या ईशद्रोह्याने आपल्या काही सवंगड्यांना घेऊन इस्लामी लष्करावर बाणांचा वर्षाव केला. म्हणून माननीय खालिद बिन वलीद (र.) यांनी त्यांच्यावर हल्ला चढवून त्यांना जेर केले आणि शत्रूपक्षाचे बरेच शिपाई पळून गेले. या युद्धात शत्रूपक्षाचे २८ शिपाई ठार झाले.

'बुखारी' या ग्रंथात आहे की, आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांनी माननीय

खालिद बिन वलीद (र.) यांना या हल्ल्याबाबत जाब विचारला आणि खालिद बिन वलीद (र.) यांनी नम्रतेने प्रेषितांना सांगितले, “हे प्रेषिता! शत्रुपक्षाने हल्ला केल्यामुळेच विवश होऊन आम्ही त्यांच्या हल्ल्याचे प्रत्युत्तर दिले.” आदरणीय प्रेषित म्हणाले, “असो! ईश्वराची जशी इच्छा असेल, तेच होईल!”

मक्का विजयाच्या पाच दिवसांनंतर आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांनी माननीय खालिद बिन वलीद (र.) यांना तीस स्वारांची तुकडी देऊन ‘नखला’ पर्वतावरील ‘उज़्ज़ा’ या देवतेची मूर्ती तोडण्याकरिता रवाना केले. या ‘उज़्ज़ा’ नावाच्या विभूतीची त्या काळी पूजा करण्यात येत असे. २५ रमज़ान ८ हिजरी सनात तेथे पोहोचून माननीय खालिद बिन वलीद (र.) यांनी ती भव्य मूर्ती नष्ट केली.

(६)

‘काज़िमा’ च्या युद्धानंतर माननीय खालिद बिन वलीद (र.) यांना वार्ता मिळाली की, ‘ईराण’ चे एक मोठे लष्कर इस्लामी राज्यावर हल्ल्याच्या तयारीत आहे. इस्लामी राज्यावर हल्ला करण्यासाठी हे लष्कर ईराणचा अग्निपूजक असलेला ‘सम्राट किसरा’ याने ‘क़ारिस’ या शूर लष्करप्रमुखाच्या नेतृत्वात पाठविले होते. इकडून माननीय खालिद बिन वलीद (र.) यांनी देखील युद्धाची जोरदार तयारी केली. या दोन्ही लष्कराची ‘मज़ार’ या ठिकाणी समोरसमोर भेट झाली. दोन्ही लष्करात तुंबळ युद्ध झाले. ईराणी फौजेचे तीस हजार शिपाई या युद्धात ठार झाले. बाकीचे सैन्य पळून जाताना ‘सनी’ या कालव्यात बुडून ठार झाले आणि काही जण पळून जाण्यात यशस्वी झाले.

ईराणच्या सम्राटास या अपमानजणक पराभवाची खबर मिळताच तो भयंकर संतापला आणि बदला घेण्यासाठी त्याने आपल्या दुसऱ्या अतिबलाढ्य ‘ज़हगर’ आणि ‘बहमन’ सेनापतींच्या नेतृत्वात प्रचंड लष्कर इस्लामी राज्यावर चढ़ाईसाठी पाठविले. या लष्कराच्या शिपायांची संख्या साठ हजार एवढ़ी होती. माननीय खालिद बिन वलीद (र.) यांना या आक्रमणाची वार्ता कळताच त्यांनी माननीय सुवैद बिन मुकर्रिन (र.) यांच्या नेतृत्वात इस्लामी लष्कराचे काही दस्ते ‘मज़ार’ या ठिकाणी सोडून स्वत: बाकीचे लष्कर घेऊन शत्रूलष्कराचे ठिकाण ‘वलजा’ या स्थानाकडे कूच केले. ‘वलजा’ या ठिकाणी पोहोचल्यावर त्यांनी पाहिले की, सागरतटाचा भाग त्यांच्या अगदी जवळच आहे. त्या ठिकाणी लष्कराच्या तुकड्या लपून बसण्याची सोयीस्कर संधी होती. माननीय खालिद बिन वलीद (र.) यांनी आपल्या युद्धकौशल्याचा भरपूर उपयोग घेताना काही तुकड्या येथेच लपवून ठेवल्या आणि लष्कराचा काही भाग

घेऊन स्वत: पुढे रवाना झाले. शत्रूपक्षाबरोबर घनघोर युद्ध झाले. लढतालढता ईराणी सम्राटाची फौज थकून गेल्यावर खालिद बिन वलीद (र.) यांनी लपवून ठेवलेल्या फौजांना शत्रूवर हल्ला चढविण्याचा आदेश देताच इस्लामी लष्कर शत्रूवर अक्षरश: तुटून पडले आणि शत्रूपक्षास पळता भुई थोडी झाली. शत्रूपक्षाच्या फौजेत अगणित लोक ठार झाले आणि बाकीचे पळून गेले. या युद्धात 'जहग़र' हा ईराणचा सरसेनापती ठार झाला व 'बहमन' हा सेनापती मात्र पळून जाण्यात यशस्वी झाला. या युद्धानंतर माननीय खालिद बिन वलीद (र.) यांनी येथील संपूर्ण भूभाग इस्लामी सीमांशी जोडून तेथे इस्लामी अंमल लागू केला आणि तेथील जनतेस संरक्षण बहाल केले.

या 'ज़जला' ठिकाणच्या युद्धामध्ये अरबवंशाचे बरेच ख्रिस्तीधर्मिय ईराणी सम्राटाच्या समर्थनार्थ ठार झाले असल्याने त्यांच्यात बदल्याची आग धुमसत होती. त्यांनी इस्लामी लष्करावर चढ़ाई करण्याची जोरदार तयारी सुरु केली. इराक़च्या सरहदीवरील 'उलैयस' या ठिकाणी त्यांनी लष्करांची जमवाजमव केली. तिकडे ईराणचा सरसेनापती 'बहमन' आपला जीव मुठीत धरून ईराणच्या सम्राटाकडे पळून गेला आणि ईराणहून एक प्रचंड लष्कर घेऊंन 'उलैयस' या ठिकाणी पोहोचला. या भागाचा ईराणी राज्यपाल 'जाबान' याच्याकडे लष्कर ठेवून त्याने त्यास सांगितले की, ''मी ईराणच्या सम्राटाकडे जाऊन येईपर्यंत इस्लामी लष्करावर आक्रमणाची कारवाई करू नये.'' याच वेळी माननीय खालिद बिन वलीद (र.) यांनी 'उलैयस' वरील शत्रूच्या लष्करावर हल्ला चढविला. या वेळी 'जाबान' चे लष्कर आरामशीर जेवण करण्यात मश्गूल होते. कारण त्यांना आदेशच मुळात असा होता की, 'बहमन' परत येईपर्यंत युद्ध छेडू नये. खालिद बिन वलीद (र.) यांनी शत्रूपक्षावर जोरदार हल्ला चढवून हा प्रदेश जिंकून घेतला आणि ईराणी सम्राटाच्या लष्कराचे हजारो सैनिक मृत्युमुखी पडले.

या युद्धानंतर माननीय खालिद बिन वलीद (र.) यांनी 'अमग़ैशीया'कडे कूच केली. इस्लामी लष्कर आपल्यावर चालून येत असल्याचे पाहून तेथील जनतेने खालिद बिन वलीद (र.) यांच्याशी युद्ध न करता स्वत:ला इस्लामी राज्याशी जोडण्याची विनंती केली आणि माननीय खालिद (र.) यांनी त्यांच्या विनंतीस मान देऊन ईराणच्या जुल्मी राज्याच्या जोखडातून त्यांना मुक्त करून इस्लामी संरक्षण बहाल केले.

या विजयाची वार्ता इस्लामचे सर्वेसर्वा शासक माननीय अबू बकर (र.) यांना लागताच ते खूप खुश झाले.

(७)

'अमग़ैशिया'च्या जवळच 'हैरा' नावाचे एक प्राचीन शहर होते. तेथील ईराणी सम्राटाचा राज्यपाल 'अराज़बा' यास शंका आली की, 'अमग़ैशीया' हातातून गेल्यावर 'हैरा' शहरदेखील इस्लामी लष्कर काबीज करील. म्हणून त्याने आपल्या धाडसी मुलाच्या नेतृत्वाखाली प्रचंड सैन्य देऊन इस्लामी लष्कराचे आक्रमण रोखण्यासाठी पुढे पाठविले आणि स्वत: शहराबाहेर पाडाव यास्तव टाकला की, इस्लामी लष्कराविरुद्ध लढणाऱ्या आपल्या लष्करास मदतीची गरज पडली, तर तत्काळ मदतीस धावून जाता येईल. 'अमग़ैशिया' आणि 'हैरा' या दोन शहरांदरम्यान 'फ़रात' ही मोठी नदी वाहत असे. तिचे पात्रही खूप रुंद होते. 'अराजबा' च्या मुलाने या नदीचे पाणी कालव्यामार्फत दुसऱ्या दिशेला वळविले. यामुळे इस्लामी लष्कराची जहाजे चिखलात रुतू लागली. माननीय ख़ालिद (र.) यांनी शिपायांना आपली जहाजे तेथेच सोडून घोड्यांवर स्वार होऊन हल्ला चढ़विण्याचा आदेश दिला. आदेशाप्रमाणेच इस्लामी लष्कराने घोड्यांवर स्वार होऊन 'अराज़बा' आणि त्याच्या लष्करावर हल्ला चढ़विला. 'अराजबा' च्या मुलास या अकस्मात हल्ल्याची मुळीच कल्पना नसल्याने तो पार घाबरून गेला आणि आपल्या लष्कराच्या इतर बऱ्याच शिपायांसह ठार झाला. त्यांचा समाचार घेतल्यावर इस्लामी लष्कर 'हैरा' शहराकडे निघाले. नेमक्या याच वेळी येथील राज्यपाल 'अराबज़ा' याला आपल्या मुलाच्या वधाची आणि ईराणी सम्राट 'उर्दुशेर' च्या मृत्यूची एकाच वेळी वार्ता मिळाली. या वार्तेमुळे तो पार खचून गेला आणि आपले लष्कर घेऊन त्याने तेथून पळ काढला. 'हैरा' मधील लोक आपले रक्षणकर्ते असलेले ईराणी लष्कर पळून गेल्याचे आणि आपल्याला वाऱ्यावर सोडून दिल्याचे पाहताच त्यांनी एका किल्ल्यात जाऊन आश्रय घेतला. माननीय खालिद बिन वलीद (र.) यांनी जनतेस अभयपत्र पाठवून त्यात स्पष्टपणे लिहिले की, ''तुम्हाला इस्लामी लष्करास घाबरण्यांचे कोणतेही कारण नाही. आम्ही तुमच्यावर हल्ला करण्यासाठी आलेलो नसून तुमच्या रक्षणासाठी आलो आहोत. आम्ही तुम्हास ईराणी सम्राटाच्या जोखडातून व त्याच्या अन्यायी रहिवासी करातून मुक्त करीत आहोत व तुम्हास तुमच्या प्राण, वित्त आणि अब्रूच्या रक्षणाची संपूर्ण हमी देत आहोत.'

या पत्राच्या उत्तरात किल्ल्यात आश्रय घेतलेल्या नागरिकांच्या नेत्यांनी माननीय खालिद (र.) यांना वाटाघाटीच्या बोलणीसाठी विनंती केली आणि खालिद बिन वलीद (र.) त्यांच्याशी रीतसर विनंती करून त्यांना हे अभयपत्र प्रदान केले. हे अभयपत्र १२ हिजरी सनात देण्यात आले.

हैराच्या तहानंतर जवळपासच्या सर्वच प्रदेशांच्या जनतेने ईराणी सम्राटाच्या

जाचक कर आणि जुलमी कारभारास वैतागून इस्लामी संरक्षणाची विनंती माननीय खालिद (र.) यांना केली. खालिद बिन वलीद (र.) यांनी त्या सर्व भागावर इस्लामी अमल लागू करुन तेथील जनतेच्या रक्षणासाठी क़िआक़ा (र.), ज़रार बिन अझूर (र.), मसना बिन हारिसा (र.) यांना लष्कर देऊन सीमा संरक्षणासाठी आणि रयतेच्या संरक्षणासाठी नियुक्त केले.

या शिवाय माननीय खालिद बिन वलीद (र.) यांनी इस्लामी राज्याच्या अधिपत्याखाली आलेल्या संपूर्ण प्रदेशात राज्यपाल नियुक्त करून राज्यकारभारास नियोजनबद्ध वळण दिले. याच वेळी 'बानक़ियाद' आणि 'निस्तूना' या भागातील पादरी खालिद बिन वलीद (र.) यांच्या सेवेत हजर झाले आणि त्यांनी त्यांचा प्रदेशही इस्लामी शासनाच्या अधिपत्याखाली घेण्याची विनंती केली आणि खालिद बिन वलीद (र.) यांनी त्यांनाही संरक्षणपत्र देऊन ते दोन्ही प्रदेश इस्लामी राज्याच्या सीमांशी जोडलेत.

ही मोहीम फत्ते झाल्यावर माननीय खालिद (र.) ईराणी साम्राज्याच्या अत्यंत मजबूत असलेल्या 'अम्बार' या ठिकाणाकडे वळले. अम्बारवासियांना खालिद (र.) यांच्या आक्रमणाची वार्ता समजताच त्यांनी किल्ल्यात आश्रय घेतला. इस्लामी लष्कर शहरात दाखल होताच त्यांनी किल्ल्यातून बाणांचा वर्षाव सुरु केला. खालिद बिन 'वलीद' (र.) यांनी किल्ल्याच्या चारही बाजुंनी त्यांच्या रक्षणात्मक व्यवस्थेचा आढावा घेतला. ते या निष्कर्शावर पोहोचले की, अम्बारवासियांना युद्धकौशल्याचे मुळीच ज्ञान नाही. त्यांना सहज पराभूत करता येईल. म्हणून त्यांनी इस्लामी लष्करास आदेश दिला की, शत्रूपक्षाच्या शिपायांना लक्ष्य बनवून सलग बाणांचा वर्षाव करावा. अशा प्रकारे या युद्धात जवळपास एक हजार शत्रूचे सैनिक आंधळे झाले. 'अम्बार'च्या सेनाप्रमुख 'शेरबाद' याने लष्कराचे धैर्य खचंताना पाहिले आणि त्याने खालिद बिन वलीद (र.) यांना बोलणीचा प्रस्ताव पाठविला खरा पण यामध्ये खूपच कठीण अटी त्याने प्रस्तावित केल्या. त्यामुळे खालिद बिन वलीद (र.) यांनी त्याचा प्रस्ताव नाकारून आपले लष्कर कमी रुंदी असलेल्या किल्याच्या खंदकाजवळ घेऊन गेले. किल्ल्याच्या खंदकावर त्यांनी तात्पुरता पूल बनवून लष्करास किल्यात घुसविले. किल्ल्यात दडी मारलेल्या शिपायांमध्ये युद्धाचे धैर्य नसल्याने सेनापती 'शेरझाद' याने बिनशर्त बोलणी करण्याचा प्रस्ताव सादर केला आणि अखेर या युद्धाची सांगता बोलणीवर झाली. हा भाग इस्लामी शासनाच्या अधिपत्याखाली आल्यावर माननीय खालिद बिन वलीद (र.) यांनी 'जबर क़ान बिन बदर (र.)' यांना 'अम्बार' येथे राज्यपाल नेमून ते 'ऐतुल तमर' या ठिकाणाकडे वळाले.

'ऐनुल तमर' येथील ईराणी साम्राज्याचा शूर सेनापती 'मेहरान चोबीन' इस्लामी लष्कराविरुद्ध लढण्यासाठी जंगी तयारी करीत होता. त्याच्या मदतीकरिता 'तगलब'

'अयाद' आणि 'नमरद' वगैर अरबी वंशाचे ख्रिस्तीधर्मिय कबिलेसुद्धा 'अक़ा बिन अक़ा'च्या नेतृत्वात पोहोचले होते. 'मेहरान' याने एका विशिष्ट उद्दिष्टास्तव अरबी कबिल्यांना इस्लामी लष्करांसमोर केले. 'अक़ा बिन अक़ा' 'किर्ख़' या ठिकाणावर आपल्या फौजेची बांधणी करीतच होता की, ख़ालिद बिन वलीद (र.) यांच्या फौजेने त्याच्यावर हल्ला चढविला. खालिद बिन वलीद (र.) त्याच्या फौजांच्या रांगा भेदून त्याच्यापर्यंत जाऊन पोहोचले आणि त्याच्या हातापायांत बेड्या टाकल्या. प्रमुख सेनापती अटक झाल्याचे पाहून लष्कराने पळ काढला. इस्लामी लष्कराने त्यांचा पाठलाग करून बऱ्याच जणांना अटक केली आणि बाकीचे शिपाई पळून जाऊन त्यांनी 'ऐनुल तमर' या किल्यात आश्रय घेतला. मेहरान याने ख्रिस्तीधर्मिय अरबजणांचा अपमानजनक पराभव पाहून किल्ल्यातूनही पळून गेला. माननीय खालिद (र.) यांनी किल्ल्यास पूर्ण वेढा दिला. किल्ल्यातील शत्रूपक्षाने शेवटी खालिद बिन वलीद (र.) यांच्यापुढे आपला निभाव लागत नसल्याचे पाहून किल्ल्याचे द्वार उघडले. खालिद बिन वलीद (र.) यांनी सर्व अरबवंशीय ख्रिस्तीधर्मियांना अटक केली.

ज्या काळामध्ये ख़ालिद बिन वलीद (र.) इराक़च्या मोहिमेत व्यस्त होते, तेव्हा 'दवामतुल जन्दल' या ठिकाणी बंडाचे निषाण फडकले आणि 'कलब', 'बेहरा', 'गुस्सान', 'तनुख' आणि 'झजाअम' या कबिल्यांच्या 'अकीदर आणि 'जोदी' यांना आपले प्रमुख नियुक्त करून इस्लामी शासनाविरुद्ध बंडाचे रणशिंग फुंकले. इस्लामी शासक माननीय अबू बकर (र.) यांनी हे बंड मोडून काढण्यास्तव माननीय अयाज़ बिन ग़नम (र.) यांना ख़ालिद बिन वलीद (र.) यांच्या मदतीस्तव बोलावले.

'ऐनुल तमर' ची मोहीम जिंकल्यावर ख़ालिद बिन वलीद (र.) यांनी लष्कर घेऊन 'दवामतुल जंदल' कडे कूच केली. खालिद बिन वलीद (र.) 'दवामतुल जंदल' कडे कूच केले. खालिद बिन वलीद (र.) 'दवामतुल जंदल' येथे पोहोचताच 'अक़ीदर' याने 'जोदी' ची साथ असे म्हणून सोडली की, 'मी खालिद बिन वलीद (र.) यांच्याशी टक्कर घेऊ शकत नाही.' ख़ालिद बिन वलीद (र.) यांना त्याच्या फरार होण्याची वार्ता मिळताच त्यांनी लष्कराची एक तुकडी त्याच्या पाठलागास्तव पाठविली. तो अटक झाला. ख़ालिद बिन वलीद (र.) यांनी त्यास बंडाळीच्या अपराधास्तव ठार केले. यानंतर ख़ालिद बिन वलीद (र.) आणि अयाज़ (र.) यांनी 'दवामतुल जन्दल' ला दोन्हीकडून घेराव घातला. बंडखोरांच्या मदतीसाठी अरबवंशाचे ख्रिस्तीधर्मिय मोठ्या संख्येने तेथे जमले होते. हे सर्व जण 'जोदी' आणि इतर सेनापतींच्या नेतृत्वात खालिद बिन वलीद (र.) यांच्या लष्कराशी लढा देत होते. परंतु खालिद बिन वलीद (र.) आणि अयाज़ (र.) यांच्यासमोर त्यांचा टिकाव लागला नाही आणि त्यांना पराभवाची

नामुष्की पत्करावी लागली. 'जोदी' आणि 'वदीआ' हे सेनाप्रमुख अटक झाले आणि लष्कराच्या इतर शिपायांनी किल्ल्याचा आश्रय घेतला. किल्ल्यात थांबण्यासाठी जागा उरली नसल्याने आतील लोकांनी किल्ल्याचे द्वार बंद करून घेतले आणि बाहेरील लोकांना किल्ल्यात प्रवेश करता आला नाही. हे बाहेर सुटलेले लोक अरब वंशाच्या 'कल्ब' परिवाराचे होते. त्यांनी खालिद बिन वलीद (र.) यांच्या एका तुकडीचे सेनापती असलेले आसिम बिन अमरु (र.) दयेची याचना केली. कारण 'कलब' परिवार 'आसिम बिन अमरु (र.) यांच्या दुरून नात्यामध्ये होते. माननीय आसिम (र.) यांनी त्यांची याचना मंजूर करून त्यांना अभय दिले. माननीय खालिद बिन वलीद (र.) यांनीदेखील 'कलब' परिवारजणांना क्षमा दिली. यानंतर त्यांनी किल्ल्याचे फाटक उघडून आतील सर्व बंडखोरांना अटक केली आणि मग त्या सर्वांना आणि त्यांचा म्होरक्या असलेल्या 'जोदी' यास बंडाळीच्या अपराधास्तव ठार करण्यात आले.

(८)

खालिद बिन वलीद (र.) अजून 'दवामतुल जन्दल' येथेच होते की, इराक़मध्ये ईराणी उपद्रव्यांनी बंडाचे निशाण फड़कावले. त्यांनी 'हसीद' आणि 'ख़नाफस'वर आक्रमण केले. 'अम्बारचे राज्यपाल' जबरक़ान बिन बदर (र.) यांना या उपद्रवाची वार्ता मिळताच त्यांनी 'हैरा'चे राज्यपाल 'क़आक़ाअ बिन अमरु (र.)' यांची मदत मागविली. 'क़आक़ाअ (र.)' यांनी तत्काळ वेगवेगळे दोन लष्कर 'अबद बिन फ़दकी' आणि 'उरवा बिन जाअदल' यांच्या नेतृत्वात त्यांच्या मदतीस पाठविले. त्यांनी 'रैफ़' या ठिकाणी बंडखोरांना रस्त्यातच रोखले. ऐन याच वेळी तिकडून खालिद बिन वलीद (र.) आणि 'अयाज़ बिन ग़नम (र.)' 'दवामतुल जन्दलची मोहीम सर करून येत होते. त्यांना ही परिस्थिती समजताच त्यांनी शत्रूपक्षाचा विध्वंस सुरु केला आणि बंडखोरांना यमसदनी धाडले. अशा प्रकारे बऱ्याच लढाया आणि बंडखोऱ्या झाल्या आणि या संपूर्ण प्रकरणांत ख़ालिद बिन वलीद (र.) यांचे युद्धकौशल्य इस्लामी राज्याच्या सीमा विस्तारण्यास कारणीभूत ठरले.

माननीय ख़ालिद बिन वलीद (र.) यांनी इराक़मध्ये 'मोहर्रम' १२ हिजरी ते 'सफ़र' १३ हिजरी अर्थात चौदा महीने व्यतीत केले. यामध्ये त्यांनी पंधरा युद्धे केली आणि प्रत्येक युद्धात यशस्वी झाले.

(९)

ज्या काळात माननीय खालिद बिन वलीद (र.) ईराणी साम्राज्याचा नायनाट करीत होते, त्याच काळात 'रोम'शीसुद्धा संघर्ष चालू झाला होता. चार इस्लामी लष्करे

माननीय अबू उबैदा बिन जर्राह (र.), माननीय उमर बिन आस (र.) माननीय यज़ीद बिन अबुसुफ़ियान (र.) आणि माननीय शरजील बिन हसना (र.) यांच्या नेतृत्वाखाली रोमी साम्राज्याच्या विविध ठिकाणांवर चाल करून गेले. रोमी शत्रू पूर्ण पराकाष्ठेने इस्लामी लष्कराचा सामना करीत होते आणि इस्लामी लष्करास पुढे जाण्यास प्रतिकार करीत होते. अशा परिस्थितीमुळेच इस्लामी शासक माननीय अबू बकर सिद्दीक (र.) यांनी माननीय खालिद बिन वलीद (र.) यांना आदेश पाठविला की, 'रोमी साम्राज्याविरुद्ध युद्ध करणाऱ्या इस्लामी लष्कराच्या मदतीस जावे.' हा आदेश मिळताच माननीय खालिद बिन वलीद (र.) आपले निम्मे लष्कर घेऊन इस्लामी लष्कराच्या मदतीसाठी सीरियाकडे निघाले.

माननीय खालिद (र.) यांनी 'सीरिया'च्या युद्धमोहिमेवर जाण्यासाठी अत्यंत कठीण मार्ग निवडला. हा मार्ग अतिशय धोक्याचा होता. एव्हाना पाच-सहा दिवसांचा असलेला सरळ मार्ग सोडून ते 'हूरान' च्या पूर्वेस विस्तारलेल्या 'हमाद'चा मार्ग निवडला. हे मार्गभ्रमण त्यांच्या युद्धकौशल्याचा एक भाग होता. तब्बल अठरा दिवसाच्या प्रवासानंतर ते 'बुरसीबा' या ठिकाणी पोहोचले. तेथील लोकांनी या गोष्टीची कधीच कल्पना देखील केली नसेल की, एखादे लष्कर ते भयानक वाळवंट पार करून आपल्यावर आक्रमण करेल. आपल्यावर अचानकच होणाऱ्या या अकस्मात हल्ल्यामुळे ते पार खचून गेले. त्यांची तारांबळ उडाली आणि कसेबसे लढून त्यांनी अखेर माघार घेतली. 'सवा'चा भाग ताब्यात घेतल्यावर खालिद बिन वलीद (र.) 'अर्क', 'पालमोरा', 'क़रीतैन', 'हवारैन' आणि 'क़सम' चा भाग ताब्यात घेत ते सरळ दक्षिणेकडे आपला मोर्चा घेऊन जात होते. 'सीरियाच्या' 'दमास्कस' ला सोडून ते 'मरज राहत'ला पोहोचले. या ठिकाणी रोमन साम्राज्याच्या लष्कराने खालिद बिन वलीद (र.) यांना निकराची झुंज दिली. परंतु अखेर त्यांना पराभवाचे तोंड पाहावे लागले. 'मरज राहत'चा भाग जिंकून खालिद बिन वलीद (र.) हे 'यरमुक' च्या भागात आपल्या विजयी सैन्याच्या ताफ्यासह दाखल झाले आणि 'हूरान'च्या पर्वताच्या पायथ्याशी राखून ठेवलेल्या इस्लामी लष्करास जाऊन मिळाले. याच ठिकाणी एक प्रचंड रोमी लष्कराशी त्यांचा सामना झाला. परंतु या प्रचंड लष्कराने खालिद बिन वलीद (र.) समोर आत्मसमर्पण केले. याच ठिकाणी चारीही इस्लामी लष्कराचे सरसेनापती माननीय अबू उबैदा (र.) यांनी लष्कराचे नेतृत्व खालिद बिन वलीद (र.) यांना सोपविले. यानंतर खालिद बिन वलीद (र.) यांनी 'बसरा' शहरावर हल्ला चढविला. दोन्ही फौजांदरम्यान तुंबळ युद्ध झाल्यावर बसराचा रोमी राज्यपाल 'बतरीक' हा खालिद बिन वलीद (र.) यांना शरण आला व त्याने त्यांच्याशी तह केला.

तिकडे रोमन साम्राज्याचा सम्राट 'हरक़िल' यास इस्लामी लष्कराच्या विजयी घोड़दौड़ीची वार्ता मिळाली. कधीच पराभवाचे तोंड न पाहणाऱ्या या सम्राटास मुस्लिमांचा भयंकर संताप चढला. तो रोमी साम्राज्याच्या अपमान व नामुष्कीच्या ज्वराने अक्षरश: फणफणत होता. त्याने प्रचंड मोठमोठ्या लष्करी तुकड्या इस्लामी लष्करावर चोहीकडून जोरदार हल्ला चढ़विण्यासाठी पाठविल्या. या रोमी सैन्याचे नेतृत्व 'क़बक़लार' आणि 'तझारिक़' या दोन बलाढ्य सेनापतींकडे होते. या दोघांनी पॅलेस्टाईनमध्ये 'अजनादेन' या ठिकाणी पड़ाव टाकला. माननीय अबू बकर सिद्दीक़ (र.) यांनी 'पॅलेस्टाईन' ताब्यात घेण्याच्या मोहिमेवर अमरु बिन आस (र.) यांची नेमणूक केली होती. या प्रसंगी ते 'ग़रबात' मध्ये होते. त्यांना रोमी लष्कराची वार्ता मिळताच ते 'अजनादैन' कडे रवाना झाले. माननीय खालिद बिन वलीद (र.) सुद्धा 'बसरा' सर करून त्यांच्या मदतीस पोहोचले.

हिजरी सन १३ च्या जमादिल आखिरा महिन्यात या दोन्ही लष्करांदरम्यान तुंबळ लढ़ाई झाली. दोन्ही फौजा एकमेकांवर हिंस्त्र पशूप्रमाणे तुटून पडल्या. या भयंकर युद्धात रोमी लष्कराचे दोन्हीही सेनाप्रमुखांना ठार करण्यात आले आणि रोमच्या प्रचंड लष्करास अपमानजणक पराभव पत्करावा लागला.

'अजनादैन' मध्ये रोमी लष्कराचा समाचार घेतल्यावर खालिद बिन वलीद (र.) आणखीन एका रोमी लष्कराकडे आपली दृष्टी वळविली. हे रोमी लष्कर 'दरआ' च्याजवळ असलेल्या 'दरोज' पर्वत आणि 'यरमूक' नदीच्या खाडीमध्ये स्थायिक होते. या लष्कराकडे दुर्लक्ष करून 'दमास्कस' कडे वाटचाल करणे अशक्यप्राय होते. म्हणून माननीय खालिद (र.) यांनी उमर बिन आस (र.) यांना 'बरशेबा' च्या स्थळावर सोडून काही लष्कराचा भाग घेऊन 'दरआ' च्या स्थानावर पोहोचले. या ठिकाणीसुद्धा रोमी लष्करास इस्लामी लष्कराने धूळ चारली आणि अशा प्रकारे इस्लामी लष्करास 'दमास्कस' चा मार्ग मोकळा झाला. येथून 'दमास्कस' केवळ पासष्ठ मैल दूर होते.

'यरमूक' चे हे पहिलेच युद्ध सुरु असताना तिकडे इस्लामी शासक माननीय अबू बकर (र.) यांचा स्वर्गवास झाला आणि इस्लामी शासनाची धुरा माननीय उमर फारुक़ (र.) यांच्या हाती आली. यरमूकची ही पहिली लढाई संपल्यावर इस्लामी लष्कर 'दमास्कस' कडे निघाले आणि शहरास चारी बाजुंनी वेढ़ा घातला. 'दमास्कस' येथे पडणारी थंडी इस्लामी लष्करासाठी असहनीय होती. तरी देखील इस्लामी फौजेने मोठ्या धैर्याने या नैसर्गिक आपत्तीस तोंड दिले. हा वेढा तीन महिने सहा दिवसांपर्यंत चालू होता. शहरवासियांनी किल्ल्यातून इस्लामी लष्करावर बाणांचा वर्षाव सुरू केला. परंतु एके दिवशी झाले असे की, शहरवासीयांकडून होणारा बाणांचा वर्षाव खूप कमी

झाला. खालिद बिन वलीद (र.) यांच्या चाणाक्ष बुद्धीत वीज चमकल्यासारखे झाले. काही तरी गड़बड़ असल्याचे त्यांनी ओळखले. त्यांना वार्ता मिळाली की, तेथील शहरपालास मुलगा झाल्याने त्याने पूर्ण शहरवासियांना भोजनाचे निमंत्रण दिले होते. जेवण आणि मद्याच्या मैफली रंगल्या होत्या. सर्वत्र बेधुंद वातावरण होते. इकडे खालिद बिन वलीद (र.) लष्कराची एक छोटीशी तुकडी सोबत घेऊन किल्ल्याच्या पहारेदारांवर हल्ले करीत त्यांना ठार करीत सुटले आणि आत जाऊन किल्ल्याचे मुख्य द्वार उघडून शहरात प्रवेश केला व जोरदार हल्ला चढ़विला. या अकस्मात हल्ल्यासमोर 'दमास्कस' च्या लोकांचा निभाव लागला नाही आणि त्यांनी आत्मसमर्पण केले. अशा प्रकारे इस्लामी लष्कराने माननीय अबु उबैदा बिन जर्राह (र.) आणि माननीय खालिद बिन वलीद (र.) यांच्या नेतृत्वाकाली 'दमास्कस' फत्ते केले.

(१०)

दमास्कस मुस्लिमांच्या ताब्यात गेल्याने रोमी साम्राज्य पार हादरून गेले आणि सम्राट 'हरक़िल' चा संताप अनावर झाला. पराभवाची कल्पनाही न करणाऱ्या रोमी सम्राटास अतिशय अपमानजणक पराभव आणि तोही मुस्लिमांच्या छोट्याशा लष्करशक्तीसमोर ! या विचाराने त्याची पार झोप उडाली. केवळ एकच विचार त्याच्या डोक्यात थैमान घालत होता. पराभवाचा वचपा काढायचा कसा ? अतिसंतापाने तो अक्षरशः वेडा झाला होता. इस्लामी लष्कराचा वचपा काढण्यासाठी 'बसयान' या ठिकाणी पन्नास हजाराचे बलाढ्य लष्कर जमा करण्यात आले. माननीय अबू उबैदा बिन जर्राह (र.) यांना या लष्करी तयारीची वार्ता मिळताच ते माननीय खालिद बिन वलीद (र.) यांना घेऊन जार्डनच्या 'बसयान' स्थानाकडे निघाले आणि त्याच्या जवळच असलेल्या 'फ़हल' या ठिकाणी तळ ठोकला. इस्लामी लष्कराचे हे धैर्य पाहून रोमी लष्कराच्या पायाखालची जमीन सरकली आणि त्यांनी इस्लामी लष्कराकडे तड़जोड़ीचा प्रस्ताव ठेवला. माननीय 'अबू उबैदा (र.)' यांनी 'मआज बिन जबल (र.)' यांना रोमी लष्कराशी बोलणी करण्यास्तव पाठविले. रोमी लष्कराने त्यांच्याकडील युद्धसामग्री आणि सैन्याच्या प्रचंड संख्येचा उल्लेख करून 'मआज़ बिन जबल (र.) यांना प्रभावित करण्याचा प्रयत्न केला. परंतु 'मआज बिन जबल (र.)' मुळीच प्रभावित न होता त्यांना सांगितले की,

"जर तुम्ही इस्लामचा स्वीकार कराल तर तुम्ही आमचे बांधव आहात. जर हे मान्य नसेल तर 'जिझिया' (कर) द्यावे. त्याच्या मोबदल्यात आम्ही तुमच्या सर्व अधिकारांचे रक्षण करू आणि हेसुद्धा मान्य नसेल, तर तुमच्या आमच्या दरम्यान ही तलवारच अंतिम निर्णय करील. तुम्ही आम्हाला तुमच्या प्रचंड लष्कर संख्येचे भय

दाखवीत आहात. परंतु आम्ही मुळीच घाबरत नाहीत. तुमची संख्या आकाशातील ताऱ्यांएवढी जरी असली, तरी आम्ही काळजी करणार नाही. ईश्वराने म्हटले आहे की, कधी कधी थोडे संख्याबळ असलेले लष्करसुद्धा विजय प्राप्त करते."

उभय पक्षांत कोणताच समझोता झाला नाही आणि त्यांच्यात घनघोर युद्ध सुरु झाले. पहिल्या दिवशी रोमन लष्कराने आपली हत्यारे सोडून पळ काढला. दुसऱ्या दिवशीही रक्तरंजित युद्ध झाले आणि खालिद बिन वलीद (र.) यांनी रोमी लष्कराच्या मोठमोठ्या अकरा सेनापतींना कंठस्नान घातले. हे युद्ध इतके तीव्र झाले की, रणांगणात रक्ताच्या नद्या वाहत होत्या. भयंकर रक्तपात झाला आणि रोमी लष्कर अखेर इस्लामी लष्करास शरण आले.

या शानदार विजयप्राप्तीनंतर इस्लामी लष्कराने 'हमस' या शहराकडे कूच केली. हे सीरियाचे एक अति महत्त्वाचे शहर होते. रोमन सम्राट 'हरक़िल' या पराभवाची वार्ता ऐकून अस्वस्थ झाला. त्याने या वेळेस खूपच मोठे लष्कर इस्लामी फौजेचा, रस्ता रोखण्यासाठी पाठविले. या रोमन लष्कराचा सरसेनापती 'तोज़र' हा होता. 'तोज़र'च्या लष्कराला इस्लामी लष्कराने मागून व समोरून, दोन्ही दिशेने चिरडले. या युद्धामध्ये प्रचंड संख्येत रोमन सैन्य ठार झाले. 'हमस' शहराकडे जाताना इस्लामी लष्करावर बरेच हल्ले झाले, परंतु शत्रूचा निभाव लागला नाही. इस्लामी लष्कर 'हमस' शहराचे मुख्य द्वार असलेल्या 'रस्तन' समोर डेरेदाखल झाले आणि शहराच्या चोहोबाजुंनी वेढ़ा दिला.

तिकडून 'हरक़िल' ने आणखीन एक मोठी कुमक रोमन लष्कराच्या मदतीस पाठविली. परंतु खालिद बिन वलीद (र.) यांनी ते लष्कर 'हमास' शहरात दाखल होण्यापूर्वीच त्यास रस्त्यातच अडविले. ज्या काळात हे युद्ध चालू होते, त्या काळात खूप कडाक्याची थंडी पडलेली होती. उष्ण हवामानात जगण्याची सवय असलेल्या इस्लामी लष्करास एवढ़ी थंडी सहन करणे कठीण असूनही त्याने शहराचा वेढा निरंतर चालूच ठेवला. अखेर रोमन लष्कराने अभय देण्याची याचना केली. ही याचना स्वीकारण्यात आली आणि 'हमस' शहरावर इस्लामी लष्कराने ताबा मिळविला. माननीय अबू उबैदा बिनुल जर्राह (र.) तेथेच थांबले आणि खालिद बिन वलीद (र.) 'दमास्कस' कडे रवाना झाले.

## (११)

रोमन साम्राज्यावर इस्लामी लष्कराच्या सततच्या विजयांनी रोमन सम्राट 'हरक़िल' अतिशय क्षुब्ध झाला. त्याचा संताप अनावर झाल्याने बदल्याच्या भावनेने तो पेटून उठला. त्याने आपल्या साम्राज्यातून इस्लामी लष्कराचा चुराडा करण्याची

प्रतिज्ञाच केली. यासाठी त्याने ‘अर्मेनिया’, ‘कॉन्स्टॅटिनोपाल’, ‘अलजझायर’ या ठिकाणांहून प्रचंड लष्कर गोळा केले. या लष्कराचे बळ अभूतपूर्व होते. या लष्करामध्ये अत्यंत कुशल आणि नावाजलेले शूरवीर सेनापती होते. एवढेच नव्हे तर चर्चमधील पादरी आणि मठात वास्तव्य करणारे ख्रिश्चन संन्यासीसुद्धा रणभूमीवर इस्लामी लष्कराच्या विरुद्ध उतरले होते. ते धर्माची आन देऊन रोमन लष्करात युद्धप्रेरणा निर्माण करीत होते. या लष्करातील सैनिकांची संख्या दोन लाखांपेक्षाही जास्त होती. इस्लामी लष्करास याची खबर मिळताच इस्लामी लष्करास ताब्यात घेतलेल्या शहरातून बोलावून एका ठिकाणी गोळा करण्याचे आदेश इस्लामी सेनापतीने दिले. याबरोबरच इस्लामच्या केंद्रीय सत्तेची मदत मागविण्यात आली. शहरवासियांना त्यांच्यावर लागू करण्यात आलेल्या कराची रक्कम परत करण्यात आली. इस्लामी लष्कराच्या या सहिष्णुतापूर्ण कार्यामुळे शहराचे ख्रिश्चन आणि ज्यू रहिवासी अत्यंत प्रभावित झाले आणि त्यांनी इस्लामी लष्कराच्या विजयाची प्रार्थना केली.

संपूर्ण इस्लामी लष्कर एकत्र येऊन यरमूकमध्ये रोमन लष्कराचा सामना करण्यास सज्ज झाले. नेहमीच विजयाची कल्पना करणारे आणि कधीच पराभव न पत्करण्याच्या तंद्रीत असलेले रोमन सैनिक यरमुक आणि जॉर्डनच्या नद्यांच्या अशा संगम असलेल्या मैदानात उतरले की तिन्ही बाजूला अफाट पाण्याचा घेराव होता. समोरून फक्त अतिशय कमी रुंदीचा रस्ता होता. इस्लामी लष्करास पराभूत करण्याच्या उन्मादात झिंगलेल्या या रोमन लष्कराने कल्पनासुद्धा केली नाही की, एवढी हत्यारे, प्रचंड संख्याबळ आणि रणांगणाची भौगोलिक परिस्थिती पाहता त्यांना इस्लामी लष्करासमोर पराभवाची नामुष्की पत्करावी लागेल. चारही बाजुंनी नदीच्या अफाट पाण्याने वेढलेले रोमन लष्कर पाहून माननीय अमरु बिन आस (र.) यांच्या तोंडून विनासयास शब्द बाहेर पडले,

“मुस्लिमांनो ! तुम्हाला खूशखबर आणि आनंदाची वार्ता आहे की, रोमन लष्कर आपोआपच कैद झाले आहे.”

इस्लामी लष्कराने पाडाव टाकण्याकरिता निवडलेली जागा युद्धासाठी खूप अनुकूल होती. त्या ठिकाणी ते रसद आणि मदतसुद्धा मागवू शकत होते. पराभव झाल्यास इतरत्र पळण्यास जागा देखील खूप मोकळी होती. या उलट पराभवाच्या परिस्थितीत रोमन लष्करास नदीच्या अथांग पाण्यात बुडून मरण्याशिवाय दुसरा पर्यायदेखील नव्हता. दोन-अडीच लाख रोमन लष्कराच्या मुकाबल्यात इस्लामी लष्कराची संख्या केवळ ४६ हजार एवढीच होती. परंतु त्यांच्या स्वभावात लढवय्यी वृत्ती आणि रणभूमीवर लढताना हुतात्मा होण्याची तीव्र तहान होती. या उलट रोमन

लष्करास मृत्यूचे भय भेडसावत होते. पूर्वीप्रमाणेच या वेळीही त्यांची इच्छा होती की, इस्लामी लष्करास संपत्तीची देवाणघेवाण करून हे प्रकरण येथेच संपवावे. या उद्दिष्टपूर्तीस्तव रोमन लष्कराचा सेनापती 'बाहान' याने इस्लामी लष्करापुढे प्रस्ताव ठेवला की संपत्ती घेऊन त्यांनी 'रोम'चा जिंकलेला भाग सोडून जावे. परंतु इस्लामी लष्कराने हा प्रस्ताव नाकारला आणि तडजोडीची शक्यता मावळली.

उभय पक्षांत तुंबळ युद्ध सुरु झाले. या युद्धात इस्लामी लष्कराचे दहा शिपाई हुतात्मे झाले आणि शत्रूंचे हजारो सैनिक ठार झाले. माननीय खालिद बिन वलीद (र.) यांनी आपले संपूर्ण कौशल्य पणाला लावले. रोमन लष्करसुद्धा मोठ्या धैर्याने इस्लामी लष्कराचा सामना करीत होते. त्यांच्या लष्कराच्या तीस हजार सैन्याच्या पायात बेड्या या कारणास्तव होत्या की, त्यांनी माघार घेऊ नये. त्यांना युद्धाने घाबरून मागे सरकण्याचा विचारदेखील येता कामा नये. त्यांचे शेकडो पादरी क्रूस घेऊन त्यांना युद्धाची प्रेरणा देत होते.

रोमन लष्कराचा सरसेनापती 'बाहान' याने इस्लामी लष्करप्रमुख अबू उबैदा (र.) यांना प्रस्ताव पाठविला की, तड़जोड़ीच्या बोलणीसाठी आपला एक दूत पाठवावा. हा संदेश घेऊन 'जरजा' इस्लामी लष्कराच्या स्थळी आला. संध्याकाळची वेळ असल्याने इस्लामी लष्कर नमाज पढण्यात मश्गूल होते. 'जरजा' इस्लामी लष्कराचे हे दृश्य पाहून खूप प्रभावीत झाला. मुस्लिम शिपायी नमाज पढल्यानंतर तो सरसेनापती 'अबू उबैदा बिन जर्राह (र.) यांच्या सेवेत हजर झाला आणि त्याने प्रश्न केला की,

"आदरणीय प्रेषित येशू मसीह (अ.) यांच्या बाबतीत तुमची काय श्रद्धा आहे?" माननीय अबू उबैदा (र.) म्हणाले, "हे ग्रंथधारका! ज्याप्रमाणे आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांच्यावर ईश्वराने दिव्य कुरआन अवतरित केले, त्याचप्रमाणे आदरणीय प्रेषित येशू मसीह (अ.) यांच्यावरसुद्धा 'बायबल' हा ग्रंथ अवतरित केला. येशू मसीह (अ.) हेसुद्धा ईश्वराचे प्रेषित होते. म्हणून तुम्ही आपल्या धर्माच्या मूळ विचारसरणीस न बदलता त्यात अतिशयोक्ती करू नये. येशू मसीह (अ.) हे केवळ ईश्वराचे प्रेषित आहेत. ईश्वराने आपला आदेश येशू (अ.), माता मरयम (मेरी) (अ.) यांच्याकडे पाठविला आणि ईश्वरीय आदेशाने ते विनापित्याचे जन्मले. म्हणून तुम्ही तीन ईश्वर (स्वयं ईश्वर, येशू मसीह आणि मेरी) असण्याची श्रद्धा न बाळगता एकमेव ईश्वरालाच सार्वभौम उपास्य समजावे आणि आदरणीय येशू मसीह (अ.) यांना ईश्वराचे प्रेषित समजावे. ईश्वर हा मानवासारखा मुळीच नाही. त्याने मानवीय गुणधर्माप्रमाणे कोणत्याच स्त्रीशी संगत केली नाही आणि त्याच्या मेरी (अ.) शी शारीरिक संबंधांमुळे येशू (अ.) जन्माला आले नाही. कारण हा गुणधर्मच मुळात ईश्वरामध्ये नाही. जे काही या अथांग विश्वात आहे ते सर्व

त्याचेच आहे. हीच शिकवण येशू प्रेषितांनी दिली आहे. म्हणून तुम्ही येशू मसीह (अ.) यांनी सांगितलेल्या सत्याचा स्वीकार करा. अंतिम निवाड्याच्या दिवशी संपूर्ण मानवजातीस आपल्या कर्मांचा जाब द्यावा लागेल."

अबू उबैदा (र.) यांचे हे उत्तर ऐकून विनासायास त्याच्या तोंडून हे शब्द निघाले,

"खरोखरच आदरणीय येशू मसीह (अ.) असेच होते, जसे तुमच्या प्रेषित मुहम्मद (स.) यांनी वर्णन केले." असे म्हणून त्याने इस्लाम धर्म स्वीकारला. आता तो आपल्या लष्कराकडे परत जाऊ इच्छित नव्हता. परंतु अबू उबैदा (र.) यांनी त्यास इस्लामी लष्कराच्या दूतासोबत अर्थात माननीय खालिद बिन वलीद (र.) सोबत त्यास रोमन सेनापती 'बाहान'कडे पाठविले. 'बाहान'ने त्यांचा विशेष सत्कार करून बसण्याची विनंती केली. मग 'बाहान' ख़ालिद बिन वलीद (र.) यांना येशू मसीह (अ.) यांची प्रशंसा करून म्हणाला,

"आमचा बादशाह जगाच्या संपूर्ण बादशाहांचा सम्राट आणि आमचे राष्ट्र जगाच्या सर्व राष्ट्रांपेक्षा श्रेष्ठ आहे." माननीय खालिद बिन वलीद (र.) त्याचे वाक्य न संपताच म्हणाले,

"तुम्ही तुमच्या जागी आपल्या राजाला काहीही समजा, परंतु आम्ही ज्याला आपला प्रमुख नेमला आहे, त्याच्या मनात स्वत: बादशाह असण्याचा थोडा जरी विचार आला, तर आम्ही त्यास तत्काळ पदच्युत करु." 'बहान' परत म्हणाला, "आमच्या या सुखी आणि समृद्ध देशात तुमचे अरब लोक खूप शांती व समृद्धतेने नांदत आहेत. आम्ही त्यांच्याशी नेहमीच बंधुभाव आणि कृपापूर्ण वर्तन केले. त्यांना कधीच दुखावले नाही. म्हणून तुम्ही आमचे आभार मानावयास हवे होते. परंतु तुम्ही उलट आमच्यावरच हल्ले चढ़वून आमचे उपकार आणि सौजन्य धुळीस मिळविले. कदाचित तुम्हाला कल्पना नाही की, तुमच्या पूर्वीसुद्धा बऱ्याच लोकांनी आमच्या देशावर हल्ले केले, परंतु त्यांना आमच्या अतिप्रबळ शक्तीसमोर नामुष्की पत्करावी लागली. मग शेवटी तुमच्यासारखे दुर्बल आणि तुटपुंजे हत्यार व कमी संख्याबळ असलेले लोक आमच्यावर कसा विजय मिळवू शकतील ? ठीक आहे. आतापर्यंत तुम्ही आमच्यावर जी आक्रमणे केली, ती तुमची दुर्बल परिस्थिती पाहून आम्ही तुम्हाला माफ करतो. झाले गेले विसरून जा. तुम्ही आमचा देश रिकामा करा. आम्ही तुम्हास आणि तुमच्या प्रत्येक सेनापतीस प्रत्येकी दहा हजार दिरहम आणि प्रत्येक अधिकाऱ्यास प्रत्येकी एक हजार दिरहम आणि प्रत्येक शिपायास शंभर शंभर दिरहम देऊ."

बाहानचे भाषण संपल्यावर माननीय ख़ालिद बिन वलीद (र.) म्हणाले,

"परम दयाळू आणि कृपाळू ईश्वराच्या नावे,

तुम्ही आपल्या राष्ट्राच्या प्रतिष्ठेचे जे वर्णन केले आहे, ते आम्हास चांगल्याप्रकारे ठाऊक आहे. तुम्ही आपल्या शेजारील अरब राष्ट्राशी जे वर्तन केले तेदेखील आम्हास चांगले ठाऊक आहे. परंतु तुमचे हे वर्तन त्यांच्यावर उपकारासाठी नसून ते तुमच्या राज्याच्या स्थैर्य आणि धर्मप्रचारासाठी होते. याचाच परिणाम आहे की, त्यांच्यापैकी बऱ्याच लोकांनी तुमचा धर्म स्वीकारला आणि ते तुमच्याबरोबर येऊन आमच्या विरोधात उतरले.

हे खरे आहे की, आमच्याजवळ परिपूर्ण हत्यारे नाहीत आणि आर्थिकरीत्या आम्ही दुर्बल आहोत. इस्लामपूर्व काळात आम्ही भ्रष्ट वर्तनाचे होतो. एका ईश्वरास सोडून अनेक विभूतींची पूजा करीत होतो. आपसात खूप भांडत होतो आणि रक्तपात करीत होतो. परंतु शेवटी ईश्वरास आमची दया आली आणि त्याने आमच्यापैकीच एक प्रेषित (आदरणीय मुहम्मद (स.)) आमच्याकडे पाठविला. तो आमच्यापैकी सर्वांत जास्त प्रामाणिक, दानशूर आणि सद्‌वर्तनी आणि पवित्र चारित्र्याचा होता. त्याने आम्हास केवळ एकमेव ईश्वराच्या दासत्वाकडे हाक दिली. तसेच त्याने असादेखील आदेश दिला की, आम्ही त्याच्या धर्माचा सर्वत्र प्रचार करावा. ज्याने हा धर्म स्वीकारला, तो आमचा बंधु झाला, ज्याने धर्म स्वीकारला नाही आणि 'जिझिया' (कर) दिला, त्यांच्या रक्षणाची जबाबदारी आमच्यावर असेल आणि ज्याने या दोन्ही प्रस्तावांचा इन्कार केला, त्याने असे समजण्यास हरकत नाही की, त्याचा संबंध अशा लोकांशी आला, जे मृत्यूवर एवढे प्रेम करतात, जेवढे तुम्ही जीवनाशी प्रेम करता.

अवघे विश्व ईश्वराचे आहे. तो वाटेल त्यास देतो, परंतु खबरदार! शेवटी तेच लोक यशस्वी होतात जे ईशपरायण असतात.''

खालिद बिन वलीद (र.) यांचे भाषण ऐकून 'बाहान' म्हणाला,

''आम्ही तुमचा धर्म स्वीकारणार नाही व तुम्हीदेखील आमचा धर्म स्वीकारू नका. आम्ही 'जिझिया' देखील देणार नाही. कारण आम्ही 'जिझिया' घेत असतो, देत नाही.''

एकूणरीत्या ही तडजोडीची बोलणी फिस्कटली आणि दोन्ही फौजांत तुबळ युद्धाची सुरुवात झाली. या रक्तरंजित युद्धात हजारो रोमन सैनिक ठार झाले. इस्लामी लष्कराचेही शेकडो सैनिक हुतात्मे झाले. रोमन साम्राज्याविरुद्ध हे एक निर्णायक युद्ध होते. इस्लामी लष्कराने आपले प्राण पणाला लावून रोमन साम्राज्याचा दणदणीत पराभव केला. या युद्धात रोमचे निम्मे सैनिक ठार झाले आणि यानंतर इतक्या मोठ्या प्रमाणात कधीच सैन्य गोळा होऊ शकले नाहीत. रोमन सम्राटास पराभवाची वार्ता मिळताच त्याने तत्काळ 'सीरिया' देश सोडून 'कॉन्स्टॅटिनोपाल'कडे पळ काढला आणि हा संपूर्ण भाग इस्लामी राज्याच्या अंमलाखाली आला.

'यरमूक'च्या या निर्णायक युद्धानंतर इस्लामी लष्कराचे सरसेनापती माननीय अबू उबैदा बिन जर्राह (र.) यांनी ख़ालिद बिन वलीद (र.) यांना 'क़न्सरीन' चा भाग जिंकण्याच्या मोहिमेवर रवाना केले. वाटेत त्यांना एका रोमन लष्कराचा सामना करावा लागला. खालिद बिन वलीद (र.) त्या लष्करास पराभूत करून पुढे निघाले. 'कन्सरीन' च्या लष्कराने किल्ल्यात आश्रय घेऊन काही दिवस इस्लामी लष्कराचा सामना केला. परंतु अखेर त्यांनी तडजोडीची विनंती करून हे शहर इस्लामी शासनाच्या अधिपत्याखाली आले. याबरोबरच इस्लामी लष्कराने हलब, अन्ताकिया, मिनबज, मरअश, हिस्नहरीस आणि इतर बरेच प्रदेश बळकावले. यानंतर इस्लामी लष्कराने आपले सर्वांत महत्त्वाचे आणि अंतिम उद्दिष्ट अर्थात 'बैतुल मुकद्दस' (पवित्र स्थळ) अर्थात 'मस्जिद-ए-अक़्सा' वर विजय मिळविण्याकडे आपले लक्ष वळविले. ही मस्जिद 'यरुशलेम' या शहरात होती आणि आजही आहे. इस्लामी लष्कराने यरुशलेम शहरास पूर्ण वेढा घातला. ख्रिश्चन धर्मियांनी इस्लामी लष्कराशी सामना करण्याचा मूर्खपणा केला नाही. त्यांनी पूर्वी पत्करलेल्या पराभवांची नामुष्की चांगलीच भोगली होती. ते मानसिकरीत्या आधीच खचलेले असल्याने त्यांनी तडजोडीचा प्रस्ताव सादर केला. परंतु त्यांनी अशी अट घातली की, इस्लामी राज्याचे शासक स्वत: बोलणीकरिता यावेत. त्यामुळे सरसेनापती अबू उबैदा (र.) यांनी इस्लामी शासक माननीय उमर फारुक़ (र.) यांना या अटीचे सविस्तर पत्र धाडले. हे स्थळ मुस्लिमांसाठी खूप महत्त्वाचे आणि पवित्र आहे. याच ठिकाणाहून आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांना ईश्वराने आपल्या भेटीकरिता बोलाविले होते. ख्रिश्चन लोकांकडून कोणताच प्रतिकार न होता हे स्थळ इस्लामी शासनाच्या स्वाधीन होत असल्याने माननीय उमर फ़ारुक़ (र.) येथे येण्यास स्वखुशीने राजी झाले. हिजरी सन १६ च्या 'रजब' महिन्यात आपल्यासोबत काही प्रेषित सोबत्यांना घेऊन ते इस्लामी राजधानी 'मदीना' येथून निघाले. 'जाबिया' या ठिकाणी पोहोचताच माननीय खालिद बिन वलीद (र.), यज़ीद बिन अबुसुफ़ियान (र.) आणि इतर दुसरे लष्करी अधिकारी त्यांच्या आगमनाची वाट पाहातच होते. त्यांनी त्यांचे स्वागत केले. यानंतर ते 'बैतुल मुकद्दस' येथे पोहोचले आणि त्यांनी तहाच्या करारावर सही केली व ख्रिश्चन धर्मियांच्या स्वाधीन केले. ख्रिश्चन धर्मियांनी हे सुरक्षापत्र घेऊन मोठ्या आनंदाने 'यरुशलेम' शहर मुस्लिमांच्या स्वाधीन केले. हिजरी सन १७ मध्ये रोमन सम्राट 'हरक़िल' याने 'हमस' या शहरावर परत एकदा ताबा मिळविण्याचा प्रयत्न केला. परंतु इस्लामी लष्कराने मोठ्या कौशल्याने हे युद्ध जिंकले आणि यानंतर कधीच रोमन लष्कराने स्वत:हून इस्लामी लष्कराशी भिडण्याचा विचारही मनात येऊ दिला नाही. हा त्यांचा शेवटचा हल्ला होता.

माननीय खालिद बिन वलीद (र.) हे केवळ एक शूर योद्धेच नसून ते अतिशय अभ्यासु वृत्तीचे व्यक्तिमत्त्व होते. आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांची बरीच वचने त्यांनी कथन केली आहेत. तसेच त्यांच्यात इस्लामी विधीचीसुद्धा प्रचंड जाण होती. खालिद बिन वलीद (र.) यांच्यात उच्चनीतिमत्ता, धर्मयुद्धाची अतिप्रचंड प्रेरणा, आदरणीय प्रेषितांवर असीम श्रद्धा व प्रेम आणि त्यांचा अपार आदर, शौर्य, सत्यनिष्ठा आणि दानशूरता यासारखे अगणित गुणधर्म होते. ते अतिशय शूर योद्धे आणि अतिशय कोमल हृदयी, दयाळू आणि मनमिळाऊ स्वभावाचे होते. त्यांच्यात उत्तम वक्तृत्व कला होती. लष्करासमोर आवेशपूर्ण भाषणामुळे लष्कराच्या अंगात नवीन स्फूर्ती निर्माण करण्याचे त्याचे कसब अप्रतिम होते. आपल्यापेक्षा दुर्बलावर ते कधीच हल्ला करीत नसत. सत्य प्रस्थापित करण्यासाठी आणि मानवसमाजास मानवीय बंधनाच्या अत्याचारी जोखडातून मुक्त करून शांती व समृद्धीची हमी देणाऱ्या इस्लामी छत्रछायेत आणण्याकरिता त्यांनी धर्मयुद्धासाठी आपले अवघे जीवन समर्पित केले. यासाठी त्यांनी आपल्या जीवनात तीनशे लढाया लढल्या. यापैकी एकाही लढाईत त्यांना पराभव पत्करावा लागला नाही. त्यांच्या शरीराच्या प्रत्येक भागावर जखमांचे व्रण होते. प्रत्येक क्षण आणि प्रत्येक रात्र त्यांनी मानवजातीस अन्याय व अत्याचारातून मुक्त करण्याच्या काळजीत खर्च केली. रणांगणांवर वीरमरण पत्करण्याची त्यांची अतितीव्र इच्छा होती. परंतु जगात असे हत्यारच मुळी निर्माण झाले नव्हते, जे 'सैफुल्लाह' (ईश्वराची तलवार) अर्थात खालिद बिन वलीद (र.) यांना ठार करील.

खालिद बिन वलीद (र.) यांनी विजय मिळविलेल्या शहराच्या रहिवाशांशी ते अत्यंत प्रेमळ वर्तन करीत. त्यांची दानशूरता आणि मृदुस्वभाव पाहून पराभूत जनता तोंडात बोटे घालीत असे आणि ईशदरबारी प्रार्थना करीत की, 'ईश्वरा! यासारखा सेनापती आम्हास आजीवन लाभू दे !' खालिद बिन वलीद (र.) हे दुर्बल, याचक, अनाथ, वृद्ध, अपंग, गरीब, दीन, लाचार आणि विधवा यांच्यावर विशेष कृपा व दयेचे वर्तन करीत आणि त्यांना सढळ हाताने मदत करीत.

खालिद बिन वलीद (र.) यांच्या शौर्याची व दानशूरतेची प्रशंसा स्वत: आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) करीत आणि ही खालिद बिन वलीद (र.) यांच्याकरिता मोठीच सौभाग्याची बाब होय. आदरणीय प्रेषितांनीच त्यांना 'सैफुल्लाह' (ईश्वराची तलवार) चा किताब बहाल केला होता.

त्यामुळे आपण ईशदरबारी प्रार्थना करू या की, या थोर आणि अतिबलाढ्य, मृदुस्वभावी, सत्यनिष्ठ, दानशूर, अन्याय व असत्यावर तलवार खेचणारा परमवीर धर्मयोद्धा की ज्याचा ऐतिहासिक कारनामा सूर्याप्रमाणे संपूर्ण विश्वास प्रकाशित करणारा आहे. त्यांच्यावर ईश्वरीय कृपांचा वर्षाव होवो आणि त्याचे गुणधर्म अंगीकारण्याची आपणां सर्वांना सद्‌बुद्धी मिळो !

# माननीय अबू हुरैरा दौसी (र.)

## (१)

माननीय अबू हुरैरा (र.) हे प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या अशा महान त्यागी सोबत्यांपैकी एक होते ज्यांनी आदरणीय प्रेषितांचे सान्निध्य मिळविण्यासाठी आपले वतन, घरदार आणि संपत्तीचा त्याग केलेला होता. प्रेषितांचे शिष्यत्व त्यांना जगाच्या संपूर्ण संपत्तीपेक्षाही जास्त मौलिक होते. प्रत्यक्ष प्रेषितांकडून धर्मशिक्षण घेऊन त्यांनी लाखो विद्यार्थ्यांची ज्ञानतृष्णा विझविली.

आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांचे वचन तोंडपाठ करून कथन करणाऱ्या सात सोबत्यांपैकी ते एक होते. त्यांनी सर्वाधिक म्हणजे 'पाच हजार तीनशे चौऱ्याहत्तर' प्रेषितवचने कथन केली आहेत. आदरणीय प्रेषितांनी त्यांना प्रचंड स्मरणशक्ती प्रदान करण्याची ईश्वराकडे प्रार्थना केली होती. म्हणून त्यांची स्मरणशक्ती कमालीची होती.

माननीय अबू हुरैरा (र.) यांचे त्यांच्या माता-पित्यांनी 'अब्देशम्स' असे नांव ठेवले होते. परंतु इतिहासात ते 'अबू हुरैरा' या नावाने अजरामर झाले. ते 'येमेन'च्या 'दौस' कबिल्याचे सुपुत्र होत. त्यांची वंशशृंखला अशी आहे -

'अबू हुरैरा (र.) पिता हनिया पिता सआद पिता सआलबा पिता सलीम पिता फ़हम पिता ग़नम पिता दौस'. अबू हुरैरा (र.) यांच्याकडे एक मांजर होते. या मांजरावर त्यांचे खूप प्रेम होते. अरबी भाषेत मांजराला 'हुरैरा' असा शब्द आहे. मांजर नेहमीच जवळ ठेवणारे म्हणजेच 'अबू हुरैरा' असे त्यांचे टोपणनाव पडले.

माननीय अबू हुरैरा (र.) यांचे पिता त्यांच्या बालपणातच वारल्याने त्यांचे जीवन अत्यंत हलाखीचे होते. ते दररोज आपल्या शेळ्या जंगलात चारण्यास घेऊन जात आणि संध्याकाळी परत घेऊन येत असत. परंतु हळूहळू त्यांच्या शेळीपालन व्यवसायात विकास झाला. मग त्यांनी आपल्या शिक्षणाकडे विशेष लक्ष पुरविले. त्यांनी साहित्य व कवनशास्त्रात प्राविण्य मिळविले. आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांनी मक्का शहरात प्रेषितत्वाची घोषणा केल्यावर 'येमेन' 'दौस' कबिल्यातील एका सुस्वभावी आणि श्रीमंत असलेल्या ''तुफ़ैल बिन अमरु (र.)' यांनी प्रेषितदरबारी जाऊन इस्लामचा स्वीकार केला आणि 'येमेन' ला परत येऊन इस्लामचा प्रचार केला. त्यांच्या प्रचाराच्या परिणामस्वरुपी केवळ चारच जणांनी इस्लाम धर्म स्वीकारला. हे चार भाग्यवान म्हणजे 'तुफ़ैल (र.)' यांचे आई, वडील, पत्नी आणि माननीय अबू हुरैरा (र.) हे होत. माननीय

तुफ़ैल (र.) यांनी 'येमेन' मध्ये इस्लामचा प्रचार करण्याचा खूप प्रयत्न केला. परंतु लोकांनी त्यांच्याकडे दुर्लक्ष केले. ते निराश होऊन मक्का शहरात प्रेषितदरबारी हजर झाले आणि म्हणाले,

"हे प्रेषित मुहम्मद (स.) ! मी एकेश्वरवादाचा प्रचार व प्रसार करण्याचा खूप प्रयत्न केला, परंतु माझ्या समाजाचे लोक याकडे दुर्लक्ष करण्याचे दुर्भाग्य ओढवून घेतात." आदरणीय प्रेषितांनी ईश्वरदरबारी प्रार्थना केली,

"हे ईश्वरा ! 'येमेन' वासियांना सत्यधर्म स्वीकारण्याची सुबुद्धी दे."

मग आदरणीय प्रेषितांनी माननीय तुफ़ैल (र.) यांना आदेश दिले की, परत येमेनला जाऊन इस्लामचा प्रचार करावा. माननीय तुफ़ैल (र.) यांनी येमेनला जाऊन धर्मप्रचार सुरू केला आणि बघताबघता लोक मोठ्या संख्येने इस्लाम धर्म स्वीकारू लागले. हिजरी सन ७ मध्ये माननीय तुफ़ैल (र.) आपल्या समाजाच्या ऐंशी परिवारांना (जवळपास एक हजार सदस्यांना) घेऊन मदीना शहरी प्रेषितांच्या सेवेत हजर झाले. त्यांच्यासोबत माननीय अबू हुरैरा (र.) हेसुद्धा आपल्या मातेसोबत होते. या वेळी आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) हे 'ख़ैबर' च्या मोहिमेवर गेलेले होते. म्हणून हा संपूर्ण काफ़िला 'ख़ैबर' स्थळी पोहोचला. या प्रवासात अबू हुरैरा (र.) यांचा गुलाम हरवला गेला. माननीय अबू हुरैरा (र.) प्रेषितदरबारी पोहोचताच त्यांचा गुलामसुद्धा तेथे पोहोचला होता. आदरणीय प्रेषितांची भेट घेऊन अबू हुरैरा (र.) यांनी आपल्या गुलामास आनंदाने स्वतंत्र केले. यानंतर माननीय अबू हुरैरा (र.) यांनी प्रेषितांकडेच आजीवन वास्तव्य केले.

(२)

मदीना शहरात स्थायिक झाल्यानंतर आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या स्वर्गवासापर्यंत (अर्थात हिजरी सन ७ ते ११) चा हा काळ म्हणजे माननीय अबू हुरैरा (र.) यांच्या जीवनाचा अमूल्य ठेवा होय. हा संपूर्ण काळ त्यांनी आदरणीय प्रेषितांच्या सान्निध्यात व्यतीत केला. त्यांच्या जीवनाचा एकच उद्देश होता, तो म्हणजे आदरणीय प्रेषितांच्या दिव्य ज्ञानाने आपली ओटी भरून घ्यावी. 'मुस्नदे हम्बल' या ग्रंथात आहे की, आदरणीय प्रेषितांना एकदा ते म्हणाले, "हे प्रेषिता! आपल्या दिव्यज्ञानाचा अभ्यास माझ्या आत्म्यास शांती प्रदान करण्याचे साधन आहे."

माननीय अबू तलहा (र.) यांनी म्हटले की, 'आम्ही व प्रेषितांचे इतर सोबती आपले घर-परिवार आणि व्यवसाय यासारख्या कामात व्यस्त असल्याने प्रेषितांजवळ

जास्त वेळ देऊ शकत नसत. परंतु माननीय अबू हुरैरा (र.) हे रात्रंदिवस आणि प्रवास व युद्धांत सुद्धा आदरणीय प्रेषितांसोबतच असतात. अबू हुरैरा (र.) हे गरीब आणि दीन होते. त्यांच्याकडे धनसंपत्ती मुळीच नव्हती. त्यामुळे व्यवसायाची भानगडसुद्धा त्यांच्यामागे नसल्याने आपला पूर्ण वेळ ते प्रेषितांच्याच सोबत व्यतीत करीत असत. आणि आदरणीय प्रेषितांच्या मुखातून निघणारे प्रत्येक वचन आणि एकन एक शब्द व एकन एक कर्म आणि क्रिया अर्थात संपूर्ण आचरणप्रणाली मुखपाठ करून ते काटेकोरपणे लिहून ठेवीत असत.'

स्वयं आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांनी देखील त्यांच्या 'प्रेषित वचनसंग्रह शक्ती' ची मुक्त कंठाने प्रशंसा केली. माननीय अबू हुरैरा (र.) यांनी ज्ञानार्जनास्तव आपले जीवन समर्पित केले. त्यामुळे त्यांनी व्यवसाय व इतर कामात वेळ मुळीच दिला नाही. त्यांनी उपासमार, तहान व अतिशय दारिद्रयपूर्ण जीवन व्यतीत करून इस्लामचे अपार ज्ञान मिळविले. स्वत: आदरणीय प्रेषितांनी त्यांच्या बाबतीत म्हटले की, "अबू हुरैरा' हे ज्ञानाचे अधांग सागर आहेत!" (संदर्भ : बुखारी)

एकदा एका युद्धानंतर धर्मयोद्धयांनी शत्रूकडून भरपूर संपत्ती आणली, तेव्हा प्रेषितांनी त्यांना विचारले, 'अबू हुरैरा (र.)! बोला, तुम्हाला किती संपत्ती पाहिजे!" यावर अबू हुरैरा (र.) उत्तरले, "हे आदरणीय प्रेषित! ही धनसंपत्ती माझ्या काय कामी येईल! मला तर केवळ 'ज्ञान' पाहिजे!"

(३)

येमेनहून मदीना शहरी स्थलांतर केल्यानंतर माननीय अबू हुरैरा (र.) हे आपल्या मातेस सोबत घेऊन आले होते. ते आपल्या आईचा खूप आदर करीत असत. परंतु त्यांच्या आईने बऱ्याच दिवसांनंतर इस्लामचा स्वीकार केला. माननीय अबू हुरैरा (र.) घरी येताच आपल्या आईस सलाम करीत असत. त्यांची आई मोठ्या प्रेमाने त्यांच्या सलामचे उत्तर देत असे. अबू हुरैरा (र.) यांनी कोणतीच वस्तू आपल्या मातेला सोडून खाल्ली नाही. त्यांनी आपल्या मातेची खूप सेवा केली.

माननीय अबू हुरैरा (र.) यांनी प्रेषितांच्या सोबत राहून केवळ ज्ञानच मिळविले नसून बऱ्याच युद्धांत ते सहभागी झाले. 'ख़ैबर', 'मक्का विजय', 'हुनैन' आणि 'तबूक' च्या युद्धात ते आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या खांद्याला खांदा लावून शत्रूशी लढले. आदरणीय प्रेषितांनी त्यांना काही ठिकाणी विशेष लष्करी मोहिमेवरसुद्धा पाठविले.

माननीय अबू हुरैरा (र.) हे 'यरमूक' च्या युद्धात जातीने लढले. हे युद्ध अतिशय रक्तरंजित होते. याच युद्धामुळे ख्रिस्ती धर्मिय सत्तेचा अंत झाला आणि इस्लामी लष्कराने एका बलाढ्य सत्तेचा गर्व धुळीस मिळविला. रोमन लष्कराने एकदा इस्लामी लष्करावर जोरदार हल्ला चढविला तेव्हा माननीय अबू हुरैरा (र.) यांनी इस्लामी लष्करास उद्देशून एक आवेशपूर्ण भाषण केले.

"हे मुस्लिम शिपायांनो! आपल्यापैकी कोणीच नेहमीसाठी जिवंत राहणार नाही. या जगात कोणीच अमृताचा घोट पिऊन आलेला नाही. मृत्यू हा अटळ आहे. म्हणून मृत्यूशय्येवर पाय रगडून अपमानजणक मरण पत्करण्यापेक्षा शत्रूशी मुकाबला करताना वीरमरण पत्करावे. स्वर्गातील अप्सरा तुमची आतुरतेने वाट पाहत आहेत. त्यांच्या भेटीची तयारी करा. ईश्वराची प्रसन्नता मिळविण्यासाठी कंबर कसा. तुम्ही ज्या ठिकाणी उभे आहात ती जागा आणि ती अवस्था ईश्वरास खूप प्रिय आहे."

माननीय अबू हुरैरा (र.) यांच्या भाषणाने इस्लामी लष्करात नवचैतन्य निर्माण झाले आणि मग सर्वांनी एकजूट होऊन शत्रूशी निकराचा लढा दिला. इस्लामी लष्कराने शत्रूचा पराभव केला. 'इब्ने यसीर' या इतिहासकाराने लिहिले की, माननीय उमर फारुक़ (र.) यांच्या इस्लामी शासनकाळातील 'आज़रबायजान' लष्करी कारवाईत माननीय अबू हुरैरा (र.) यांनी प्राणपणाला लावून शत्रूशी झुंज दिली.

(४)

माननीय उमर फारुक़ (र.) यांच्या शासनकाळात पौर्वात्य देशांवरील लष्करी कारवाईत भाग घेतल्यानंतर माननीय अबू हुरैरा (र.) मदीना शहरात परतले आणि त्यांनी प्रेषितवचनांचे शिक्षण देण्यात आपले उर्वरित जीवन समर्पित केले. इब्ने हजर (र.) आणि इब्ने कसीर (र.) यांनी आपल्या इतिहास ग्रंथात लिहिले की, जेव्हा इस्लामचे तिसरे शासक माननीय उस्मान (र.) यांच्याविरुद्ध काही बंडखोरांनी उपद्रव माजविला तेव्हा, त्यांच्या रक्षणार्थ माननीय अबू हुरैरा (र.) यांनी लोकांना भाषण दिले,

"आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले की, माझ्या मृत्यूनंतर उपद्रव माजेल आणि तुमच्यात फूट पडेल."

लोकांनी अबू हुरैरा (र.) यांना विचारले,

"अशा प्रसंगी आम्ही काय करावे ?"

माननीय अबू हुरैरा (र.) यांनी उत्तर दिले,

"अशा प्रसंगी या शांतीप्रेमी माननीय उस्मान (र.) यांची साथ द्यावी." हे उत्तर ऐकून लोकांनी माननीय उस्मान (र.) यांना आपली मदत घेण्याचीं कळकळींची विनंती केली. परंतु माननीय उस्मान (र.) यांनी असे सांगून की, 'मी ठार झालो तर चालेल, परंतु मुस्लिमांचा आपसात लढून होणारा रक्तपात मुळीच सहन करणार नाही,' ही विनंती नाकारली. अखेर उपद्रव्यांनी माननीय उस्मान (र.) यांना ठार केले. अबू हुरैरा (र.) यांना या घटनेचा जबर धक्का बसला.

हिजरी सन ५८ मध्ये माननीय अबू हुरैरा (र.) खूप आजारी पडले आणि त्यांच्या जगण्याच्या आशा मावळल्या. माननीय अब्दुर्रहमान (र.) आणि अबू सलमा (र.) हे त्यांच्या प्रकृतीची विचारपूस करण्यासाठी आले, तेव्हा अबू हुरैरा (र.) म्हणाले,

"हे ईश्वरा ! आता मी पार थकलो. मला या जगाचा खूप कंटाळा आला." हे वाक्य दोनदा म्हटल्यावर ते अबू सलमा (र.) यांना उद्देशून म्हणाले, "हे अबू सलमा! ईश्वराची शपथ, ज्याच्या ताब्यात माझे जीवन आहे, तो काळ जास्त दूर नाही जेव्हा लोक खऱ्या सोन्यापेक्षाही जास्त आवडीने मृत्यूस कवटाळतील. तुम्ही जिवंत राहाल तर अवश्य पाहाल की, लोक कब्रस्तानातून जाताना कबरीकडे पाहून कामना करतील की, याच्या ठिकाणी मी असतो तर किती चांगले झाले असते."

मृत्यूशय्येवर असताना एकदा त्यांना रडू कोसळले, लोकांनी याचे कारण विचारल्यावर ते म्हणाले, "परलोकी प्रवास खूप मोठा आहे आणि शिदोरी खूप कमी आहे. मी सध्या स्वर्ग व नरकाग्नीच्या वळणरस्त्यावर आहे. मला माहीत नाही मी कोणीकडे जात आहे. हे ईश्वरा ! मी तुझ्या भेटीसाठी आतुर आहे. मला तुझी प्रसन्नता हवी आहे. अशा प्रसन्नावस्थेत मी तुला भेटू इच्छितो."

जीवनाच्या अगदी अंतिम क्षणामध्ये उपदेश करताना ते म्हणाले,

"माझ्या कबरीवर छत टाकू नये. माझ्या दफनाविधीत उशीर करू नये. मी आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांना असे म्हणताना ऐकले आहे की, ईश्वरावर श्रद्धा ठेवणारा म्हणतो की, माझा दफनविधी लवकर उरकून घ्या आणि ईशद्रोही म्हणतो की, मला कोठे घेऊन जात आहात?"

यानंतर त्यांनी इहलोकाचा त्याग करून परलोकांकडे कूच केले. या वेळी त्यांचे वय ७८ वर्षांचे होते. माननीय अबू हुरैरा (र.) हे ५८ हिजरी सनात मृत्यू पावले. मृत्यूसमयी त्यांच्या पश्चात त्यांची पत्नी, तीन मुले व एक मुलगी होती.

माननीय अबू हुरैरा (र.) यांच्याकडे आदरणीय प्रेषितांचा खूप मोठा म्हणजे ५३७४ प्रेषितवचनांचा संग्रह होता. प्रेषितांच्या सोबत्यांपैकी सर्वांत मोठा संग्रह त्यांच्याकडे होता. मुस्लिम समुदाय त्यांच्या उपकाराचे ऋण कधीच फेडू शकणार नाही. ज्ञान आणि विद्येच्या या अतिमहान व्यक्तीच्या स्वभावात शौर्य, दानशूरता आणि सडेतोड भाष्याचेही विशेष गुण होते. सत्यवचन, परखड भाषण व सूचना देण्यात ते कोणासही घाबरत नसत. माननीय अबू हुरैरा (र.) यांचा सुरुवातीचा काळ अत्यंत हलाखीचा होता, तर दुसरा काळ सुखसमृद्धीचा होता. जीवनाच्या सुरुवातीच्या काळात त्यांनी खूप संकटे झेलली परंतु त्यांचा संयम आणि धैर्य कधीच डगमगले नाही. त्यांच्या स्वभावात खूप साधेपणा आणि विनयशीलता होती. त्यांच्या समृद्धीच्या काळातसुद्धा त्यांनी आपली साधी जीवनशैली सोडली नाही. ते जेव्हा अतिशय श्रीमंत झाले, तेव्हा गाढवावर बसून ते फिरायचे. खजुरींचा पाला त्यांच्या गाढवाच्या पाठीशी बांधलेला असायचा आणि खजुरीच्या फांदीला सोलून त्याची लगाम गाढवास लावलेली असे. रस्त्यावरून जाताना ते लोकांना हसत हसत म्हणत,

"ए सरका रे! रस्ता मोकळा करा. श्रीमंतांची स्वारी येत आहे!"

मग अशाच अवस्थेत जंगलात जाऊन लाकडाची मोळी घेऊन येत असत. एके दिवशी अशाच अवस्थेत ते बाजारातून जात होते. रस्त्यात 'सआलबा बिन मालिक' भेटले आणि अबू हुरैरा (र.) त्यांना म्हणाले, "रस्ता मोकळा करा!" यावर 'सआलबा बिन मालिक' म्हणाले, "आहो एवढा मोकळा रस्ता आहे की तुमच्यासाठी!" होय, खरे आहे पण मी एवढी मोठी लाकडांची मोळी घेऊन येत आहे. म्हणून रस्ता द्या म्हणालो!"

दानधर्म आणि दीनदलितांची मदत करण्याचा अबू हुरैरा यांच्यात विशेष गुणधर्म होता. ते आपली संपत्ती गरिबांवर पाण्यासारखी खर्च करीत असत. ते पाहुणाचारदेखील खूप जोरदार करीत असत. काही जण त्यांच्याकडे कित्येक आठवडे वास्तव्य करीत असत आणि अबू हुरैरा (र.) सुद्धा मोठ्या आनंदाने त्यांचा सत्कार आणि पाहुणाचार करीत असत. आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांची सर्वांत जास्त संख्येत अर्थात ५३७४ वचने सुरक्षित ठेवणारे, रणांगणात युद्ध कौशल्याने शत्रुंना धूळ चारणारे, अन्याय व अत्याचारी शासनाची कानउघाडणी करणारे आणि अत्यंत दानशूर माननीय अबू हुरैरा (र.) यांनी इस्लाम धर्माची आजीवन सेवा केली. त्यांच्या महान कार्याचे ऋण जगातील संपूर्ण मानवजातीवर राहील.

# माननीय अमरु बिन आस (र.) – इजिप्तजेते

(१)

एकदा आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांना एका लष्करी मोहिमेच्या नेतृत्वासाठी अतिशय बुद्धिमान आणि युद्धकुशल शूरवीराची गरज भासली, म्हणून त्यांनी माननीय अमरु बिन आस (र.) यांना प्रेषितदरबारी हजर राहण्याचे आदेश दिले. माननीय अमरु बिन आस (र.) आदेश मिळताच प्रेषितदरबारी हजर झाले. आदरणीय प्रेषितांनी म्हटले,

''मी तुम्हाला एका मोहिमेवर रवाना करीत आहे. ईश्वराची इच्छा असल्यास तुम्ही सुरक्षित राहाल आणि बरीच संपत्ती तुमच्या पदरी येईल.''

माननीय अमरु (र.) यांनी अत्यंत नम्रपणे उत्तर दिले,

''हे प्रेषित ! मी संपत्ती मिळविण्यासाठी इस्लामचा स्वीकार केला नसून केवळ ईश्वराच्या प्रसन्नतेसाठी इस्लामचा स्वीकार केला आहे.''

''पवित्र संपत्ती पवित्र आचरण असणाऱ्या व्यक्तीकडे येणे उत्तम आहे.'' प्रेषितांचे हे उत्तर ऐकून माननीय अमरु बिन आस (र.) आनंदाने मोहिमेवर रवाना झाले. त्यांना आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांनी 'मर्दे स्वालेह' अर्थात 'शुद्ध आचरण असलेले पुरुष' या नावाने संबोधित केले.

माननीय अमरु बिन आस (र.) हे इस्लामच्या आरंभ काळातील अशा शूरवीरांपैकी आहेत ज्यांच्या शौर्य, युद्धकौशल्य, दमदार नेतृत्व आणि विवेकशील युद्धनीतिमुळे इस्लामी शासनास स्थैर्य लाभले. ते कुरैश कबिल्याचे सुपुत्र होत. त्यांची वंशावळ अशी आहे.

'अमरु पिता आस पिता वायल पिता हाशिम पिता सईद पिता सहम पिता अमरु पिता हसीस पिता कआब पिता नुवैयी पिता ग़ालिब.'

त्यांच्या मातेचे नाव 'नाबिग़ा' असे होते. त्यांचे पिता 'आस बिन वायल' हे कबिल्याचे सरदार व न्यायाधीश होते. तसेच ते अतिशय श्रीमंत असल्याने समाजात त्यांचे वर्चस्व होते. ते इस्लामचे कट्टर विरोधी होते. ते मरणोत्तर जीवनावर विश्वास ठेवीत नसत. माननीय अब्दुल्लाह बिन अब्बास (र.) यांचे कथन आहे की, ज्या वेळी आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांचे सुपुत्र 'क़ासिम' आणि 'अब्दुल्लाह' यांचे बालपणातच निधन झाले, तेव्हा याच 'आस बिन वायल' यांनी उपहासात्मक विधान काढले की,

'मुहम्मद (स.) यांची वंशवेल समाप्त झाली. त्यांचा एकही पुत्र त्यांचा वारसा

चालविण्यासाठी शिल्लक राहिलेला नाही. आता मुहम्मद (स.) वारले की लोकांचा पिच्छा आपोआपच सुटेल.' याच प्रसंगी दिव्य कुरआनाची 'सूरह-ए-कौसर' अवतरली आणि यामध्ये ईश्वराने आपल्या लाडक्या प्रेषितांच्या सांत्वनास्तव घोषणा केली की, 'हे प्रेषिता! आपला वारसा निश्चितच चालू राहील. तुम्ही शोकाकुल होऊ नका. ज्यांनी तुमच्यावर उपहासात्मक वाक्य काढले, त्यांचीच वंशवेल आम्ही संपवीत आहोत.'

आणि खरोखरच! आदरणीय प्रेषितांचा उपहास करणाऱ्यांची वंशवेल संपूनच गेली. त्यांच्या वंशाचा कोणीच वारसदार शिल्लक राहिला नाही.

इस्लामच्या या अतिकठोर द्वेष्ट्याच्या घरात इस्लामसाठी जीवन अर्पण करणारे माननीय अमरु बिन आस (र.) जन्मले होते. अमरु बिन आस (र.) हे आदरणीय प्रेषितांपेक्षा सहा वर्षांनी लहान होते. त्यांच्या इस्लामद्रोही पित्याने त्यांच्या शिक्षण व प्रशिक्षणावर विशेष लक्ष दिले होते. म्हणूनच ते शिक्षण व प्रशिक्षण घेऊन उच्चदर्जाचे युद्धनीतिज्ञ बनले. माननीय अमरु (र.) यांनीसुद्धा इस्लामद्वेषाचा पित्याचा हा वारसा बऱ्याच काळापर्यंत सुरु ठेवला.

(२)

त्यांचे धाकटे बंधू माननीय हिश्शाम बिन आस (र.) यांनी मात्र इस्लामच्या प्रारंभी काळातच इस्लाम स्वीकारला आणि इस्लामद्रोह्यांच्या छळ आणि अमानवी यातनांना बळी पडले. शेवटी त्यांनी 'ॲबीसीनिया' कडे स्थलांतर केले. माननीय अमरु बिन आस (र.) यांनी प्रेषित मुहम्मद (स.) यांचा जोरदार विरोध केला. त्यांनी इस्लामी लष्कराबरोबर घनघोर युद्ध केले.

आपल्या इस्लामस्वीकृतीचा वृत्तांत त्यांनी स्वत:च या शब्दांत मांडला,

''मी 'एहज़ाब'च्या युद्धातून परत येत असताना आपल्या हाताखालील तमाम लोकांना निमंत्रित करून सांगितले की, ईश्वराची शपथ! आपण किती जरी प्रयत्न केले तरी मुहम्मद (स.) यांची भूमिका निश्चितच दृढ आणि न्यायनिष्ठ वाटते. तसेच ते नेहमीच आपल्यापेक्षा प्रभावी ठरतात. मुहम्मद (स.)च्या काही सोबत्यांनी 'ॲबीसीनिया' देशात राजा 'नेगूस'चा आश्रय घेतला आहे. आपणही तेथेच स्थायिक होऊ या. येथे मुहम्मद (स.) च्या प्रभुत्वाखाली राहण्यापेक्षा राजा 'नेगूस' च्याच आश्रयात राहणे श्रेयस्कर आहे. या ठिकाणी (अर्थात मक्का शहरात) आपल्या समाजाने जर मुहम्मद (स.) यांचा पराभव केला, तरी राजा 'नेगूस'चे आपल्याबरोबर चांगलेच वर्तन राहील. कारण आपण श्रीमंत आणि प्रतिष्ठित लोक आहेत.' माझ्या या विचारावर सर्वच सहमत झाले. मग आपसात सल्लामसलतीत निर्णय झाला की, आपल्याकडील

प्रसिद्ध आणि मूल्यवान असलेली वस्तू अर्थात उच्च दर्जाचे चामडे आपण राजाला भेट म्हणून देऊ. तो आपल्यावर खूप प्रसन्न होईल. म्हणून आम्ही विपुल प्रमाणात चामडे घेऊन ॲबीसीनियाकडे निघालो. ॲबीसीनियात पोहोचताच आमची गाठ माननीय इब्ने उमैया (र.) यांच्याशी पडली. त्यांना आदरणीय प्रेषितांनी काही कामानिमित्त राजा नेगूसकडे पाठविले होते. आम्ही राजा नेगूसच्या दरबारी पोहोचलो. मी राजा बेगूसला नीतिनीयमाप्रमाणे साष्टांग नमस्कार केला. त्याने माझे स्वागत करून विचारले, 'आमच्यासाठी काही विशेष भेट आणली काय?' आम्ही उच्चदर्जाचे सोबत आणलेले चामडे त्याच्या समोर ठेवले. राजा खूप प्रसन्न झाला. मग मी त्यास म्हणालो, ''राजवर्य! आपल्याकडे आमच्या शत्रू (अर्थात आदरणीय प्रेषित (स.) ने पाठविलेला माणूस आलेला आहे. त्यास (अर्थात माननीय इब्ने उमैया (र.)) ठार करण्याकरिता आमच्या स्वाधीन करावे. त्याने आमच्या बऱ्याच प्रतिष्ठितांना त्रास दिला आहे.'' माझे हे वाक्य ऐकून राजा नेगूस अत्यंत क्रोधित झाला. त्याने आपला हात आपल्या माथ्यावर मारला. त्याच्या या कृत्याने मला खूप अपमानित झाल्यासारखे वाटले. मी म्हणालो,

''हे राजन ! मला याची पूर्वकल्पना असती की, माझ्या बोलण्याचे आपणास इतके वाईट वाटेल, तर मी बोललोच नसतो. क्षमस्व !'' राजा नेगूस क्रोधित होऊन म्हणाला, ''तुम्ही एका अशा पुरुषाच्या सोबत्यास माझ्या हातून ठार करू इच्छिता ज्यावर आदरणीय मूसा (अ.) या प्रेषिताप्रमाणेच दिव्य बोध होतो.''

मी प्रश्न केला, ''हे राजन ! खरोखरच हे सत्य आहे काय?'' बादशाह उत्तरला, ''अमरु ! तुम्ही खरोखरच दुर्दैवी आहात. माझा तुम्हाला सल्ला आहे. तुम्ही त्यांना शरण जा. त्यांचे अनुकरण स्वीकारा. ज्याप्रमाणे मूसा प्रेषितांनी 'फॅरो' या क्रूर बादशाहाचा पराभव केला होता, त्याचप्रमाणे प्रेषित मुहम्मद (स.) सुद्धा आपल्या सर्व शत्रुंचा पराभव करतील. म्हणून तुम्ही माझ्या हातावर आदरणीय प्रेषितांच्या सत्य धर्माची दीक्षा घ्यावी.'' असे म्हणून राजा नेगूस याने आपला हात पुढे केला आणि मी त्याच ठिकाणी इस्लामचा स्वीकार केला. माझ्या विचारातही अभूतपूर्व क्रांती घडून आली होती. दरबारातून मी सरळ आपल्या सवंगड्यांकडे आलो. त्यांच्यासमोर मी इस्लाम स्वीकारण्याची घटना जाहीर केली नाही आणि सरळ मदीनाकडे प्रस्थान केले. रस्त्यात माननीय खालिद बिन वलीद (र.) व उस्मान बिन तलहा (र.) भेटले आणि मी त्यांना विचारले, ''हे खालिद कोठे निघालात?'' ''ईश्वराची शपथ! आम्ही आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांच्याकडे इस्लाम स्वीकारण्यासाठी निघालो आहोत. मग आम्ही एकत्र प्रेषित दरबारी पोहोचलो. आधी माननीय खालिद बिन वलीद (र.) यांनी प्रेषितांकडून इस्लामची दीक्षा स्वीकारली मग मी प्रेषितांजवळ जाऊन म्हणालो,

“हे प्रेषित ! मी इस्लाम स्वीकारण्यासाठीच हजर झालो. परंतु आपण माझे पाप आणि आपणास केलेला विरोध क्षमा करावा !”

यावर प्रेषित म्हणाले, “हे अमरु ! इस्लामचा स्वीकार केल्यावर ईश्वर संपूर्ण पाप माफ करतो आणि इस्लामसाठी केलेल्या स्थलांतरामुळेसुद्धा पुर्वी केलेले सर्व पाप धुवून निघतात.” प्रेषितांचे हे उत्तर ऐकून मला खूप मानसिक समाधान लाभले आणि मी तत्काळ इस्लामचा स्वीकार केला आणि मक्का शहरी परतलो.”

परंतु आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांना सोडून त्यांचे मन मक्का शहरात रमले नाही. त्यांनी काही दिवसांतच मदीनेस स्थलांतर करून प्रेषितांसोबत वास्तव्य केले.

(३)

माननीय अमरु बिन आस (र.) यांच्या सर्व लढ़ायांपैकी सर्वांत महत्त्वाचे युद्ध म्हणजे इजिप्तवर केलेली यशस्वी चढ़ाई होय. याच विजयपूर्ण युद्धाने इतिहासात त्यांची विशेष ओळख आहे. सीरियावरील महत्त्वपूर्ण विजयानंतर त्यांनी आपल्या लष्करी कारवाईचा मोर्चा इजिप्तकडे वळविला. यामध्ये त्यांनी अतिशय सुपीक आणि समृद्ध असलेले इजिप्त तर ताब्यात घेतलेच, शिवाय तराबलस आणि जवळपासच्या इतर प्रदेशांवरही सत्य धर्माचा झेंडा रोवून मानवजातीस अन्यायी व अत्याचारी सत्तेच्या जोखडातून मुक्त केले.

इजिप्त देशावर सुद्धा रोमन सम्राटाचा ताबा होता. रोमन सम्राटाच्या हातून ‘सीरिया’ हिसकावून घेतल्यामुळे तो इजिप्तमध्ये इस्लामी लष्करास पराभूत करण्याची जोरदार तयारी करीत होता. इजिप्तवर चढाई करण्यात मोठ्या अडचणी आणि समस्या असूनही माननीय अमरु बिन आस (र.) यांनी इस्लामी शासक माननीय उमर फ़ारुक़ (र.) यांची परवानगी मिळविली. हिजरी सन १८ मध्ये माननीय अमरु बिन आस (र.) यांनी इजिप्तच्या ‘बेबीलॉन’ शहरावर हल्ला केला. घनघोर युद्धानंतर इस्लामी लष्कराने या शहराचा ताबा घेतला. यानंतर त्यांनी नाईल नदीवर वसलेले प्राचीन शहर ‘ग़रजुल’ बलाढ्य येथे लष्कर तैनात केलेले होते. या लष्कराने तब्बल एक महिण्यापर्यंत इस्लामी लष्करास झुंज दिली आणि शेवटी शरणागती पत्करली. या किल्ल्याच्या पायथ्याशी नाईल नदी वाहात असे. जहाजे आणि युद्धनौका किल्ल्याच्या मुख्य द्वारावर थांबत असत. अर्थात हे एक बंदरच होते. या किल्ल्यास ताब्यात घेतल्याशिवाय इजिप्त देशात पुढचा विजय मिळविणे अतिशय कठीण व जवळपास अशक्यच होते. माननीय अमरु (र.) यांनी या किल्ल्यास वेढ़ा दिला. हा वेढ़ा बरेच दिवस चालू होता. किल्ल्याच्या रक्षणार्थ असलेल्या लष्कराने देखील खूप निकरीची झुंज दिली. इस्लामी लष्कराने

केंद्रीय इस्लामी शासनाकडून मदतीसाठी आणखीन कुमक मागविली. माननीय उमर फारुक़ (र.) यांनी दहा हजारांचे लष्कर पाठविले . या लष्कराचे नेतृत्व माननीय ज़ुबैर (र.) यांच्याकडे होते. त्यामुळे माननीय ज़ुबैर (र.) यांनी किल्ल्याच्या खंदकाची पाहणी करून रणनीती आखली. तरीदेखील सात महिने उलटूनही किल्ला ताब्यात आला नाही. म्हणून माननीय ज़ुबैर (र.) यांनी एक लांबलचक सोल घेऊन किल्ल्याच्या तटावर चढून आत शिरकाव केला. त्यांच्या मागे इस्लामी लष्करसुद्धा आत शिरले आणि आत जाऊन किल्ल्याचे मुख्य प्रवेश द्वार उघडले. संपूर्ण इस्लामी लष्कर किल्ल्यात शिरले आणि इजिप्शियन सैन्याची तारांबळ उडाली. इजिप्शियन लष्कराने काही सामान्य अटी समोर ठेवून इस्लामी लष्कराबरोबर तड़जोड़ केली. माननीय अमरु (र.) यांनीसुद्धा जास्त रक्तपात घडू नये या पवित्र हेतूने त्यांना अभयदान दिले. या किल्ल्याचे नाव 'क़सर-ए-शमा' असे होते.

(४)

'कसर-ए-शमा' येथे काही दिवस वास्तव्य केल्यावर माननीय अमरु बिन आस (र.) यांनी इजिप्तचे सर्वांत मोठे आणि महत्त्वाचे शहर 'अस्कंदरीया' कडे आपला मोर्चा वळविला. रस्त्यामध्ये 'अश्मून', 'आलिया', 'कूम', 'माफूक', 'करयून' आणि इजिप्तच्या आणखीन काही ठिकाणच्या फौजांनी इस्लामी लष्करास अयशस्वी झुंज दिली आणि पराभव पत्करला. अशा प्रकारे माननीय अमरु (र.) यांनी आपली यशस्वी घोडदौड चालूच ठेवली आणि 'अस्कंदरीया' शहरास धडक मारली. या शहरात तब्बल पन्नास हजाराचे रोमन लष्कर इस्लामी लष्कराचा सामना करण्यास सज्ज होते. शहरास चारही बाजुंनी उंच तटबंदी होती. हत्यारे आणि रसदसुद्धा मुबलक प्रमाणात रोमन लष्कराकडे होती.

शिवाय त्यांच्याकडे युद्ध नौकादेखील होत्या. 'बलाजुरी' आणि 'मुक़रीज़ी' या इतिहासतज्ञांनी लिहिले की, येथील सेनापती 'मक़ोक़िस' हा इस्लामी लष्करास टक्कर देण्याच्या मन:स्थितीत नव्हता. कुशल योद्धा असल्याने आणि युद्धांचा दीर्घ अनुभव असल्याने इस्लामी लष्कराचे बळ त्याने ओळखले होते. तरीदेखील रोमन सम्राटाच्या मर्जीखातर त्यास हे युद्ध करणे भाग पडले. त्याला याची चांगलीच जाण होती की, रोमन साम्राज्याच्या अधिपत्याखाली असलेले सीरिया आणि इतर भाग इस्लामी लष्कराने मोठ्या जिद्द आणि चिकाटीने हिसकावून घेतले होते. ते सहजासहजी इजिप्त सर केल्या वाचून श्वासही घेणार नाही. म्हणून त्याने माननीय अमरु (र.) यांच्याशी एक गुप्त करार केला की, हे युद्ध आमची मर्जी व इच्छा नसताना रोमन सम्राटाच्या आग्रहाखातर आम्ही करीत आहोत. बळजबरीच हे युद्ध आमच्यावर लादण्यात येत असून इच्छा नसतानाही

आम्हास तुमच्याविरुद्ध लढ़ावे लागत आहे. त्यामुळे तुम्ही आमच्या समाजाच्या लोकांना ठार करु नये. अशा प्रकारे हे युद्ध टळले आणि इस्लामी लष्कराशी तडजोड झाली.

या घटनेमुळे इजिप्त देशाच्या इतर शहरात राहणाऱ्या रोमन नागरिकांचे धैर्य खच्ची झाले. माननीय अमरु बिन आस (र.) यांनी इतर शहरांना ताब्यात घेण्यासाठी उमैर (र.), उक़बा (र.) आणि खारजा (र.) यांच्या नेतृत्वात लष्करे रवाना केली. बऱ्याच ठिकाणी रोमन लष्कराशी त्यांचा सामना झाला आणि इस्लामी लष्कराने कोठेच माघार न घेता आपली यशस्वी घोडदौड चालू ठेवली. अशा प्रकारे अल्पशा काळातच संपूर्ण इजिप्त इस्लामी लष्कराने रोमन सम्राटाकडून हिसकावून तेथील जनतेच अन्यायमुक्त केले.

(५)

इजिप्तवर विजय मिळविल्यानंतर माननीय अमरु बिन आस (र.) यांनी आपला मोर्चा 'बरका' कडे वळविला. 'बरक़ा' हा अतिशय दाट वस्तीचा आणि इजिप्त व पश्चिमी तराबलसच्या दरम्यानचा सुपीक प्रदेश होता. परंतु या ठिकाणी इजिप्तचेच शासन होते. 'बरक़ा' मध्ये दाखल होताच माननीय अमरु (र.) यांनी येथील सर्वांत महत्त्वाचे केंद्रीय शहर 'अन्ताबलस' ला लष्करी वेढ़ा दिला. परंतु येथील नागरिकांनीसुद्धा युद्धाच्या भानगडीत न पडता हे शहर इस्लामी लष्कराच्या स्वाधीन केले. 'बरक़ा' ताब्यात घेतल्यावर माननीय अमरु (र.) यांनी 'उक़बा बिन नाफेअ (र.) यांना 'जवेला' कडे लष्करी कारवाईसाठी रवाना केले. हे शहर सुडानच्या सीमेवर होते. मागील युद्धातील पराभवामुळे आणि इस्लामी लष्कराच्या सहिष्णुतावादामुळे, तसेच त्याच्या उदार नीतीमत्तेमुळे तेथील रहिवाशांनीसुद्धा युद्ध न करताच रोमन साम्राज्य झुगारून इस्लामी शासन व्यवस्था पसंत केली आणि हे शहर इस्लामी लष्कराच्या अधिपत्याखाली आले. यानंतर माननीय अमरु (र.) यांनी आपला मोर्चा रोमन सागराच्या किनाऱ्यावरील आणि आफ्रिका प्रदेशातील 'तराबलस' कडे वळविला. तराबलसवासियांना इस्लामी लष्कराची वार्ता मिळताच त्यांनी किल्ल्यात आश्रय घेतला. अमरु बिन आस (र.) यांनी पूर्वेकडे पाडाव टाकून पूर्ण किल्ल्यास वेढा दिला. हा वेढा पूर्ण दोन महिन्यांपर्यंत होता. परंतु शहरात प्रवेश करण्याचा कुठलाच मार्ग निघत नव्हता. योगायोगाने इस्लामी लष्कराचे काहीजण शिकारीसाठी गेल्यावर त्यांची दृष्टी किल्ल्याकडे जाणाऱ्या एका मार्गावर पडली. तसेच त्यांना हेदेखील आढळून आले की, समुद्र आणि किल्ल्यादरम्यान कोणतीच तटबंदी नाही. त्यांनी याची भौगोलिक परिस्थिती अमरु बिन आस (र.) यांना तत्काळ कळविली. माननीय अमरु बिन आस (र.) यांनी याच मार्गाने शहरात पूर्ण लष्करासह प्रवेश केला आणि रोमन लष्कराची दानादान उडविली. दोन्ही सैन्यांत घनघोर युद्ध झाले आणि

त्यांचा इस्लामी लष्करासमोर टिकाव लागला नाही. शत्रूपक्षाने इस्लामी लष्करासमोर शरणागती पत्करली.

'तराबलस' वर विजयी पताका रोवून माननीय अमरू बिन आस (र.) यांनी तेथेच तळ ठोकून लष्कराचा एक दस्ता 'तराबलस' पासून थोड्या अंतरावर असलेल्या 'सबरा' शहराकडे पाठविला. हा दस्ता शहरात दाखल झाला आणि येथील सुरक्षा दलाने इस्लामी लष्करासमोर आत्मसमर्पण केले.

माननीय अमरु बिन आस (र.) यांनी लाखो चौरस मैल क्षेत्रावर इस्लामी शासनाचा झेंडा रोवला आणि आता ते 'अस्कंदरीया'पासून शेकडो मैल दूरवर एका अशा ठिकाणी वास्तव्यास होते जेथे पाणी कमी होते आणि प्रवासही खडतर होता. परंतु त्यांचे मनोबल खूप कणखर आणि मजबूत होते. आता त्यांना आपली विजयी दृष्टी ट्यूनेशिया, अलजझायर आणि मोरॅक्कोकडे वळली. त्यामुळे त्यांना इस्लामी शासक माननीय उमर फारुक़ (र.) यांना पत्र पाठविले की, "आम्ही 'तराबलस'पर्यंतचा भाग ताब्यात घेतला. आता येथून टयूनेशिया, अलजसायर आणि मोरॅक्को फक्त नव्वद दिवसांच्या अंतरावर आहे. परवानगी असेल, तर आम्ही या प्रदेशावरही इस्लामी राज्य स्थापन करू. माननीय उमर फारुक़ (र.) यांनी पत्राचे उत्तर देताना लिहिले,

"अफ्रिक़िया (ट्यूनेशिया, अलझझायर व मोरॅक्को) मध्ये प्रवेश करू नका. हा प्रदेश उपद्रव आणि वैरभावाचे केंद्र आहे. तेथील लोक संघटित नसतात. तेथील पाणीच असे आहे की, त्यास पिणारा माणूस हा कठोरहृदयी होतो." याचबरोबर माननीय अमरु बिन आस (र.) यांना माननीय उमर फारुक़ (र.) यांनी इजिप्तचे राज्यपालपद बहाल करण्याचीदेखील घोषणा केली. अस्कंदरीयावर ताबा मिळविल्यानंतर बरेच रोमन लोक शहर सोडून रोमन सम्राटाच्या शहरात जाऊन वसले होते. त्यामुळे तेथील बरेच बंगले आणि हवेल्या रिकाम्या होत्या. माननीय अमरु बिन आस (र.) यांनी याच ठिकाणी देशाची राजधानी बनविण्याची परवानगी माननीय उमर (र.) यांच्याकडे मागितली. परंतु माननीय उमर फारुक़ (र.) यांनी परवानगी दिली नाही आणि त्यांना लिहिले की,

"मला योग्य वाटत नाही की, तुमच्या आणि माझ्या दरम्यान एवढी मोठी नदी आडवी असावी आणि एवढे मोठे अंतर असावे."

यानंतर माननीय अमरु (र.) यांनी 'किस्तान' नावाचे नवीन शहर उभारले आणि याच शहरास येथील इस्लामी सत्तेचे केंद्र बनविले. हे शहर अशा प्रकारे उभारण्यात आले, त्याचा सविस्तर वृतान्त शिबली नोअमानी (र.) या इतिहासतज्ञांनी 'अल फारुक़' या ग्रंथात अशा प्रकारे सादर केला आहे,

“माननीय अमरु (र.) हे ‘अस्कंदरीया’हून ‘कसर-ए-शामा’ येथे आले. अस्कंदरीयावरील हल्ल्याच्या वेळी ठोकण्यात आलेले तळ अजूनही तसेच रिकामे पडलेले होते. म्हणून त्यांनी याच तळावर नवीन शहर वसविले. प्रत्येक कबिल्याच्या सीमा निश्चित करण्यात आल्या आणि ‘मआविया बिन खदीज’, ‘शरीक बिन समी’, ‘अमरू बिन मख़्ज़ूम’ आणि ‘इब्ने नाशेरा’ यांना नगररचना करण्याची जबाबदारी सोपविली. येथे एक विशाल ‘जामा मस्जिद’ (केंद्रीय मस्जिद) उभारण्यात आली. या अतिविशाल मस्जिदीस तिन्ही बाजुंना द्वार बसविण्यात आले आणि मुख्य प्रवेशद्वार हे राजधानीच्या इमारतीच्या समोरच्या दिशेस ठेवण्यात आले. माननीय अमरु (र.) यांनी इस्लामी शासक माननीय उमर फारुक़ (र.) यांच्यासाठीसुद्धा एका निवासाची इमारत उभी केली परंतु माननीय उमर फारुक़ (र.) यांनी लिहिले की, “त्याचे मी काय करणार.” म्हणून शेवटी ही विशाल वास्तु शहराच्या मुख्य बाजारपेठेसाठी वापरण्यास घेतली. हे शहर हिजरी सन २१ मध्ये उभारण्यात आले.”

किस्तात शहर उभारण्यास सुरुवात झाली तेव्हाच माननीय अमरु (र.) यांनी शहराच्या समोर आणि नाईल नदीच्या पश्चिमी किनाऱ्यावर एक अस्थायी स्वरुपाची छावणीदेखील उभारली. नंतर माननीय उमर फारुक़ (र.) यांनी अमरु बिन आस (र.) यांना आदेश पाठविला की, “शहराच्या चारही बाजूस भव्य तटबंदी उभी करा.” हा आदेश मिळताच अमरु बिन आस (र.) यांनी एका भव्य व अलिशान आणि मजबूत किल्ल्याची निर्मिती केली.

माननीय उमर फारुक़ (र.) यांनी इस्लामी राज्यांच्या सर्व राज्यपालांना आदेश दिला की, त्यांनी ‘हज’ च्या प्रसंगी मदीना शहरी यावे आणि संपूर्ण जनतेस आवाहन केले की, “जर नागरिकास एखाद्या राज्यपालाविरुद्ध तक्रार असेल, तर ती निर्भयतेने माझ्याकडे करावी.” एकदा माननीय उमर फारुक़ (र.) यांनी अशाच प्रसंगी लोकांना उद्देशून भाषण करताना म्हटले,

“इस्लामी शासनाच्या जनवासियांनो! ज्या लोकांची मी तुमच्या राज्याचे राज्यपालपदी नेमणूक करतो, त्यांना या गोष्टीचा मुळीच अधिकार नाही की, त्यांनी तुम्हास चापट मारावी, तुमची संपत्ती बळकावावी किंवा इतर कोणत्याही प्रकारे तुमचा छळ करावा. या उलट मी नेमलेल्या राज्यपालांची जबाबदारी आणि कर्तव्य हे आहे की, त्यांनी तुमच्या प्राण, संपत्ती आणि इभ्रतीचे रक्षण करावे आणि तुम्हाला आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या सत्यमार्गावर आचरणाची दिशा द्यावी. हे प्रत्येक राज्यपालाचे परम कर्तव्य असून ज्या राज्यपालाने या कर्तव्यात थोडी जरी कुचराई केली, त्याच्या बाबतीत निःसंकोचपणे तक्रार करावी. मी या तक्रारीची याच ठिकाणी

गंभीर दखल घेऊन फिर्यादीस न्याय देईन.''

एवढ्यात एक बिगरमुस्लिम इजिप्शियन उठून उभा राहिला आणि म्हणाला, ''अमीरुल मुअमिनीन 'अमरु बिन आस' या राज्यपालाने मला विनाकारण शंभर कोरडे मारले.'' माननीय उमर फ़ारुक़ (र.) यांनी त्यास सांगितले की, ''तुम्हीसुद्धा राज्यपालास शंभर कोरडे मारू शकता आणि ते देखील या सर्व उपस्थितासमोर!' आणि मग राज्यपाल अमरु बिन आस (र.) यांनी त्यास दोनशे दिरहम घेऊन ही शिक्षा माफ करण्याची विनंती केली व फिर्यादीने ती आनंदाने मान्य केली.

एकदा तर अतिशय विलक्षण घटना घडली. ती अशी की, इस्लामी शासक माननीय उमर फारुक़ (र.) यांच्याकडे तक्रार आली की, इजिप्तचे राज्यपाल अमरु बिन आस (र.) यांचा मुलगा 'इब्ने अमरु' याने घोडदौडीच्या प्रशिक्षण मैदानावर एका इजिप्शियन बिगर मुस्लिम रहिवाशास असे सांगून बदडले की, 'मी मोठ्या बापाचा अर्थात राज्यपालाचा पुत्र असल्याने माझ्या सरावाच्या वेळी घोडेस्वारीसाठी येऊन मला त्रास देऊ नकोस.'

माननीय उमर फारुक़ (र.) यांनी फिर्यादीस आपल्याचकडे थांबवून घेतले. आणि इब्ने अमरु या आरोपीस तत्काळ हजर होण्याचे आदेश दिले. त्यांनी फिर्यादीच्या हातात कोरडा देऊन म्हटले,

''या मोठ्या बापाच्या बिघडलेल्या पुत्राचा या कोरड्याने खरपूस समाचार घे. तुझा आत्मा शांत होईपर्यंत मारीत राहा!''

फिर्यादीने हातात कोरडा घेऊन सर्वांसमक्ष 'इब्ने अमरु' अर्थात राज्यपालाच्या पुत्राला बदडण्यास सुरुवात केली. याचबरोबर माननीय उमर फारुक़ (र.) म्हणत होते,

''मार! आणखीन मार, या मोठ्या बापाच्या लाडात बिघडलेल्या पुत्राला!! आणखीन मार!!!''

फिर्यादीने त्यास मारुन झाल्यावर माननीय उमर फारुक़ (र.) यांनी इजिप्तचे राज्यपाल असलेले आरोपीचे वडील माननीय अमरु (र.) यांना फिर्यादीसमोर करून म्हणाले,

''तुझी इच्छा असेल तर यांनादेखील चांगले बदडून काढ़! याच मोठ्या बापाचा तो बिघडलेला पूत्र आहे!'' परंतु फिर्यादी म्हणाला, ''हे उमर (र.)! आता माझी तक्रार संपली. मला न्याय मिळाला!'' आता माननीय उमर फारुक़ (र.) यांनी या दोन्ही बाप- लेकांना क्रोधपूर्ण शब्दात खड़सावले,

''याच्या आईने (अर्थात फिर्यादीच्या आईने) तर याला 'स्वतंत्र' मानवाच्या स्वरुपात जन्म दिला, तुम्ही केव्हापासून यास गुलाम बनविले ?''

माननीय उमर फारुक़ (र.) यांच्या या वाक्याचा अर्थ असा की, प्रत्येक माणूस हा स्वतंत्रपणे जन्मतो. अर्थात स्वातंत्र्य हा प्रत्येक मानवाचा जन्मसिद्ध अधिकार आहे. म्हणून त्याच्यावर अत्याचार करणे म्हणजे त्याचे स्वातंत्र्य हिरावून घेणे व त्यास गुलाम बनविणे होय.. इस्लामी शासनाच्या राज्यपालाच्या मुलालासुद्धा जनतेवर अत्याचार करण्याचा नैतिक अधिकार नाही. म्हणून अत्याचारपीडितास समाधान होईपर्यंत आरोपीस शिक्षा मिळालीच पाहिजे. हाच इस्लामी शासनाचा नियम आहे. याच नियमामुळे जनतेने रोमन साम्राज्य झुगारून इस्लामी शासनाची न्यायपूर्ण छत्रछाया स्वीकारली आणि जवळपास ७५ टक्के विश्व इस्लामी शासनाच्या अधिपत्याखाली आले.

(६)

इजिप्तच्या इस्लामी राज्यपालपदी असताना माननीय अमरु बिन आस (र.) यांनी 'नहरे अमीरुल मुआमिनीन' हा कालवा बांधला. याचा संक्षिप्त इतिहास असा आहे की, हिजरी सन २१ मध्ये मदीना शहर आणि याच्या परिसरात भयंकर दुष्काळ पडला. नद्या-नाले पूर्णत: आटून गेले होते. परिणामी तेथील व्यापारसुद्धा बंद झाला. ही दुष्काळजन्य परिस्थिती हातळण्यासाठी उमर फारुक़ (र.) यांनी सर्व राज्यपालांना पाचारण केले. सर्व राज्यपालांनी मदीनासाठी भरघोस मदत केली. 'इजिप्त' मदीनापासून खूप दूर असल्याने तेथून मदत पोहोचू शकली नाही. म्हणून माननीय उमर (र.) यांनी त्यांना पत्र लिहिले की, 'तत्काळ मदत पोहोचवावी.'

यावर माननीय अमरु (र.) यांनी उत्तर दिले की 'हे अमीरुल मुअमिनीन, लवकरच मदत पाठवीत आहे. रसद घेऊन उंटाचा मोठा काफिला रवाना करीत आहे. तसेच समुद्र मार्गानेही रसद येण्याची आशा आहे.'

यानंतर त्यांनी 'नहरे अमीरुल मुअमीनीन' या विशाल कालव्याची निर्मिती केली. शेवटी संपूर्ण इजिप्त जिंकून इस्लामी शासनास जोडणारा हा थोर सेनापती परलोक मार्गी रवाना झाला.

# माननीय झैद बिन साबित (र.) अन्सारी

(१)

प्रेषित मुहम्मद (स.) यांनी मक्का शहर त्याग करून मदीना शहरात वास्तव्य केले आणि संपूर्ण मदीना शहर प्रेषितत्वाच्या सुगंधाने दवळून निघाले. सर्वत्र मदीना शहरात आनंदाचे वातावरण होते. एके दिवशी काही सोबत्यांनी बारा वर्षे वयाचा एक गोंडस आणि निरागस मुलगा प्रेषितदरबारी हजर केला आणि आदरणीय प्रेषितांना म्हणाले,

"हे प्रेषित ! हा मुलगा 'नज्जार' परिवाराचा सुपुत्र असून यास दिव्य कुरआनचा अभ्यास करण्याचा खूप छंद आहे. याने आतापर्यंत कुरआनाच्या एकूण सतरा 'सूरती' मुखपाठ केल्या आहेत."

विश्वकृपाळू प्रेषित मुहम्मद (स.) हे ऐकून खूप आनंदीत झाले. त्यांनी या मुलास दिव्य कुरआनच्या मुखपाठ असलेल्या सूरती वदन्याचा आदेश दिला. या सुकुमाराने तत्काळ आदेशाचे पालन केले. आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) खूप प्रसन्न झाले आणि आशीर्वाद देऊन त्याच्या डोक्यावरून मायेचा हात फिरविला, हेच बाळ 'माननीय झैद बिन साबित अन्सारी (र.) होत.

(२)

धार्मिक ज्ञानसंपदा आणि शिक्षण-प्रशिक्षणात हाडाचे शिक्षक असलेल्या प्रेषितसोबत्यांपैकी एक असलेले माननीय झैद बिन साबित अन्सारी हे वयाच्या अकराव्या वर्षीच इस्लामचे खंदे समर्थक बनले. त्यांचा जन्म हिजरी सन पूर्व १२ मध्ये झाला. ते 'अबू सईद' या टोपणनावानेसुद्धा ओळखले जातात. ते इस्लामी धर्मशास्त्राचे अतिशय महान विद्वान होते. त्यांची वंशपरंपरा अशी,

झैद पिता साबित पिता ज़हाक़ पिता झैद पिता लज़ान पिता अमरु पिता अबद पिता ऑफ़ पिता ग़नम पिता मालिक पिता नज्जार.

माननीय झैद बिन साबित (र.) यांचे पिता प्रेषित स्थलांतराच्या पाच वर्षांपूर्वीच वारले होते. लहानपणीच त्यांची पितृछाया हरपल्याने ते माता 'नवार बिन्त मालिक' यांच्याच प्रेमळ मायेत वाढले. हिजरी सन पूर्व १ मध्ये इस्लाम धर्माचे प्रचारक व प्रसारक माननीय मुसअब बिन उमैर (र.) हे मदीना शहरी आले, त्याच

वेळी त्यांच्या इस्लाम प्रचारकार्यामुळे 'अवस' आणि 'ख़जरच'च्या घराण्यात इस्लाम धर्मावर चर्चा रंगल्या. याच काळात इस्लाम धर्म स्वीकारण्याचे सौभाग्य मिळविणाऱ्यांपैकी माननीय झैद बिन साबित (र.) सुद्धा आहेत. ईश्वराने त्यांना अत्यंत पवित्र आचरण आणि मनमिळाऊ स्वभावाने वरदानित केले होते. इस्लाम स्वीकारताच त्यांनी दिव्य कुरआनचे शिक्षण घेण्यास प्रारंभ केला. त्यांच्या अभ्यासु वृत्तीमुळे ते सर्व अन्सारी सोबत्यांमध्ये प्रतिष्ठित होते. प्रचंड स्मरणशक्ती असल्याने आणि अभ्यासु वृत्तीमुळे सर्वांचे ते खूप लाडके होते. त्यांनी अगदीच अल्पकाळात अरबी भाषेव्यतिरिक्त इतर बऱ्याच भाषांचे शास्त्रशुद्ध ज्ञान मिळविले होते. त्यांना अरबी, इब्रानी, ॲबिसीनीयन, क़ब्ती, रोमन, पर्शियन आणि इतर अनेक भाषांतर उत्तम प्रभुत्व मिळविले होते. त्यांचे हस्ताक्षरदेखील अतिशय सुरेख होते. शिवाय कलाकुसरीच्या कामात त्यांनी विशेष प्राविण्य मिळविले होते. अंकगणित आणि भूमिती शास्त्रात त्यांनी बरेच संशोधन केले होते.

आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) त्यांच्यातील या सर्व विषयांच्या प्राविण्यामुळे त्यांचा खूप लाड़ पुरवीत असत. त्यामुळे आदरणीय प्रेषितांवर अवतरित होणारे दिव्य कुरआन लिहिण्याची कामगिरी देखील त्यांच्यावरच सोपविण्यात आली होती.

(संदर्भ : मुस्नदे अहमद)

(३)

'बदर'च्या रणांगणावरील इस्लाम आणि इस्लामविरोधी शक्तीदरम्यान हिजरी सन २ मधील रमज़ान महिन्यात झाले. धर्मयुद्धात सहभागी होण्याकरिता वयाचीं पंधरा वर्षे पूर्ण होण्याची अट प्रेषितांनी लावली होती. परंतु धर्मयुद्धाने प्रेरित झालेले माननीय झैद (र.) हे आपल्या सवंगड्यांना घेऊन प्रेषितदरबारी हजर झाले आणि युद्धात सहभागी होण्याची परवानगी देण्याची विनंती केली. परंतु आदरणीय प्रेषितांनी त्यांना परवानगी दिली नाही.

वयाच्या अवघ्या सोळाव्या वर्षी त्यांनी ओहदच्या धर्मयुद्धात आपल्या युद्धकौशल्याची चुणूक दाखविली. यानंतर त्यांनी आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांच्याबरोबर बऱ्याच युद्धांत आपले कौशल्य दाखविले. तबूकच्या युद्धात त्यांनी अभूतपूर्व कौशल्य दाखविले. एवढेच नव्हे, तर अतिशय कमी वयात आदरणीय प्रेषितांनी त्यांना लष्कर प्रमुखपदसुद्धा दिले.

माननीय उमर फारुक़ (र.) यांच्या इस्लामी शासनकाळात ते मदीना शहराचे न्यायाधीश होते. एकदा इस्लामी शासक माननीय उमर फ़ारुक़ (र.) आणि 'उबै बिनकआब (र.)' यांच्यात काही कारणास्तव मतभेद निर्माण झाले. त्यांचे मतभेद प्रकरण माननीय झ़ैद (र.) यांच्या न्यायालयात दाखल झाले. माननीय उमर फ़ारुक़ (र.) हे इस्लामी शासक असल्याने माननीय झ़ैद (र.) यांनी त्यांना विशेष आसनाची व्यवस्था केली आणि माननीय उबै बिन कआब (र.) हे सामान्य आसनावर बसले. ही विशेष व्यवस्था पाहून माननीय उमर (र.) खूप नाराज झाले आणि माननीय झ़ैद (र.) यांना म्हणाले, ''न्यायालयात राजा आणि प्रजेदरम्यान असा कोणताच भेद असेलला मी खपवून घेणार नाही आणि ते माननीय उबै बिन कआब (र.) यांच्या बाजूला जाऊन बसले.

माननीय उमर फारुक़ (र.) यांना माननीय झ़ैद (र.) यांच्या कार्यकौशल्यावर खूप विश्वास होता. ते मक्का शहरी पवित्र हज यात्रेस गेल्यावर माननीय झ़ैद (र.) यांच्यावरच इस्लामी शासनाची जवाबदारी सोपवून गेले होते. शिवाय शासकीय कारभाराचे इस्लामी नियम आणि कायदेकानू तयार करण्यात त्यांनी खूप हातभार लावला. शासकीय वेतनश्रेणी आणि आर्थिक व्यवस्थेचे उत्तम नियम त्यांनी घालून देण्यास मदत केली.

हिजरी सन २४ मध्ये माननीय उमर (र.) यांच्या हौतात्म्यानंतर माननीय उस्मान (र.) यांनी इस्लामी शासनाची धुरा सांभाळली, तेव्हासुद्धा त्यांनी इस्लामी राज्यकारभारास भरपूर मदत केली. माननीय उस्मान (र.) सुद्धा त्यांचा खूप आदर करीत असत.

माननीय उस्मान (र.) यांच्या हौतात्म्यानंतर माननीय अली (र.) यांनी हाती इस्लामी शासनाची धुरा सांभाळली. त्यांच्या काळातही माननीय झ़ैद बिन साबित (र.) यांनी इस्लामी शासनाची आजीवन सेवा केली.

माननीय झ़ैद (र.) यांना असलेल्या धर्मज्ञानाच्या बाबतीत आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) हे स्वत: म्हणत की, इस्लामच्या अनिवार्य कर्मांचे सर्वांत जास्त ज्ञान झ़ैद (र.) यांना आहे. वारसाहक्क विधीतील अतिशय कठीण ज्ञानावर त्यांना कमालीचे प्रभुत्व होते. प्रेषितांच्या काळातसुद्धा ते धर्मविधीच्या विविध विषयांवर फतवे देत असत. माननीय उमर फारुक़ (र.) यांनी मदीना शहरात त्यांची उपस्थिती अगदी अनिवार्य समजली होती. त्याचप्रमाणे माननीय झ़ैद (र.) यांना दिव्य कुरआन,

प्रेषितवचने आणि धर्माविधी तत्त्वज्ञानातही पारंगत होते. एवढ़ेच नव्हे तर कुरआनच्या पठनातील उच्चारशास्त्रातही ते कुशल होते. त्यांच्याकडून एकूण ९२ प्रेषितवचने कथन करण्यात आली आहेत.

माननीय ज़ैद (र.) शुद्ध आचरणाचे व्यक्ती होते. त्यांच्या नीतिमत्ता ग्रथाच्या पानावर इस्लाम स्वीकारण्यातील पुढाकार, ज्ञानार्जनाचा छंद, प्रेषितावरील अपार प्रेम, प्रेषित जीवनचरित्राचे अनुकरण, सत्यवचन आणि नम्रता हे विशेष गुणधर्म स्पष्टपणे आढळतात. त्यांनी जीवनाचा अधिकांश काळ प्रेषितांच्या सोबत व्यतीत केला. सकाळी उठून ते प्रेषितांकडे जात असत. आदरणीय प्रेषितसुद्धा त्यांच्यावर खूप प्रेम करीत असत. त्यांना आपल्याजवळ बसवीत असत. 'ज्यू' लोकांकडून होणारा इब्रानी भाषेतील पत्रव्यवहार तेच हाताळत असत. आदरणीय प्रेषितांच्या आदेशामुळेच त्यांनी इब्रानीसह अनेक भाषा अवगत केल्या होत्या.

प्रेषित जीवनाच्या नियमांचा माननीय ज़ैद (र.) अगदी काटेकोरपणे अनुकरण करीत आणि इतरांनाही याचे नियम शिकवीत असत. प्रेषित जीवनाच्या नियमांविरुद्ध कोणाचेही कर्म ते मुळीच खपवून घेत नसत. एके दिवशी आपल्या शिष्यांना उद्देशून म्हणाले, ''तीन गोष्टी मुस्लिम माणसाच्या अंत:करणास चैतन्य प्रदान करतात. प्रथम हे की, प्रत्येक कार्य ईशप्रसन्नतेखातरच करावे. द्वितीय हे की, शासकांना सत्यनिष्ठेचा आग्रह करावा, तृतीय हे की, संघटित राहावे.

माननीय ज़ैद (र.) यांचा स्वभाव खूप मनमिळाऊ होता. ते सर्वांनाच मोठ्या आनंदाने, प्रेमपूर्वक व आस्थेने भेटत असत. कोणत्याही लहान-मोठ्या प्रश्नाचे समाधानकारक उत्तर देत असत. आपल्या ज्ञानावर कधीच गर्व करीत नसत. विद्येबरोबरच त्यांच्यात विनयशीलता होती. अशा या अत्यंत महान आणि सूज्ञ इस्लामी विद्वानाचे जीवनचरित्र आपल्यासाठी मोठाच बोधात्मक उपदेश आहे. वयाच्या ५६ व्या वर्षी हिजरी सन ४६ मध्ये हे महान विद्वत्ता, ज्ञान-विज्ञानाचा अभूतपूर्व खजिना संपूर्ण मानवजातीस देऊन परलोकी प्रवासास निघाला.

# माननीय अम्मार बिन यासिर तय्यबुल मुतय्यिब (र.)

(१)

आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या दरबारी एकदा माननीय अली (र.) हजर होते. एवढ्यात एक अत्यंत देखणी देहयष्टी, रुंद आणि उंच शरीर, सुंदर आणि बोलके डोळे असलेला एक तरुण आत येण्याची परवानगी मागत होता. त्यांचा आवाज ऐकून आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) म्हणाले,

"हे पवित्र आचरणाच्या तरुणा! तुमचे हार्दिक स्वागत असो."

हे तरुण ज्यांना स्वयं आदरणीय प्रेषितांनी "तय्यबुल मुतय्यिब" (पवित्र आचरणाचा) या अति-प्रतिष्ठित शब्दांनी संबोधिले, हेच माननीय अम्मार बिन यासिर (र.) होत. माननीय अम्मार बिन यासिर (र.) यांची गणना प्रेषितांच्या अतिशय लाडक्या सोबत्यांमध्ये होते. त्याचे पिता माननीय यासिर (र.) आणि माता सन्माननीय सुमैया (र.) यांनीदेखील इस्लाम स्वीकारला होता. माननीय अम्मार बिन यासिर (र.) यांची वंशशृंखला अशी आहे,

"अम्मार पिता यासिर पिता आमिर पिता मालिक पिता कनाना पिता क़ैस पिता अलहसीन पिता लूझीम पिता औफ़ पिता आमिरुल अकबर पिता याम पिता अनस."

माननीय अम्मार (र.) यांचे पिता माननीय यासिर (र.) हे 'कहतानी' वंशाचे असून 'येमेन' चे रहिवासी होते. ते आपल्या हरवलेल्या भावाच्या शोधार्थ 'मक्का' शहरी आले होते. त्यांच्यासोबत त्यांचे दोन बंधु 'मालिक' आणि 'हारिस' देखील होते. त्यांचा भाऊ मक्का शहरात त्यांना सापडला नाही. म्हणून त्यांचे बंधु 'येमेन'ला परत गेले, परंतु माननीय यासिर मक्का शहरातच स्थायिक झाले. ही घटना प्रेषितजन्माच्या पांच वर्षापूर्वीची आहे. अबू हुज़ैफ़ा यांनी माननीय यासिर (र.) यांचे लग्न 'सुमैया' नावाच्या मुलीशी केले. याच सन्माननीय सुमैया (र.) च्या पोटी अम्मार (र.) आणि अब्दुल्लाह (र.) ही दोन मुले जन्मली. काही काळानंतर आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांनी इस्लामचा प्रचार सुरु केला आणि या संपूर्ण कुटुंबाने इस्लामचा स्वीकार केला.

'सहीह बुखारी' ग्रंथात आहे की, माननीय अम्मार (र.) यांनी व त्यांच्या

परिवाराने अगदीच सुरुवातीच्या काळात इस्लाम स्वीकारला. हा काळ इतका कठीण होता की, इस्लामचे नाव घेणाऱ्यास असीम यातना सहन कराव्या लागत असत. इस्लाम स्वीकारतेवेळेस यांचा परिवार अबू जहल या अत्यंत भयानक इस्लामद्रोह्याचे गुलाम होता. इस्लाम धर्माचे द्रोही आपल्या नातेवाईकांना आणि जवळच्या लोकांनासुद्धा आतोनात अमानवी यातना देत होते. या दोन मुले अर्थात अम्मार, अब्दुल्लाह आणि त्यांचे माता-पिता यासिर आणि सुमैया यांच्यावरसुद्धा खूप अमानवी अत्याचार करण्यात आले. माता सुमैया (र.) आणि पिता यासिर (र.) हे खूप वृद्ध होते. इस्लामद्रोह्यांनी केलेले असीम अत्याचार सोसूनही त्याचे पाय कधीच डगमगले नाहीत. वृद्ध असलेले यासिर (र.) शेवटी शत्रूंचे अत्याचार सहन करताना मृत्यू पावले आणि मग एके दिवशी 'अबू जहल' या इस्लामद्रोह्याने अतिशय वृद्ध असलेल्या सुमैया (र.) यांच्या गुप्तांगावर भाला मारून ठार केले. इस्लाम स्वीकारण्यावरून ईश्वरासाठी दिलेले हे इतिहासातील पहिले बलिदान होय. यानंतर अम्मार (र.) यांचे बंधु अब्दुल्लाह (र.) यांनासुद्धा क्रूरकर्मा 'अबू जहल' याने ठार केले. आता केवळ अम्मार बिन यासिर (र.) राहिले. त्यांना या घटनांचे अपार दुःख झाले. परंतु क्षणभरही त्यांनी इस्लामचा ध्यास सोडला नाही. माता, पिता आणि बंधुच्या हौतात्म्यानंतर त्यांच्यावर अमानवी अत्याचारांची शृंखला चालूच होती.

## (२)

मदीनेस स्थलांतरापर्यंत माननीय अम्मार बिन यासिर (र.) यांनी इस्लाम द्रोह्यांचे खूप छळ सोसले. दरम्यानच्या काळात ॲबीसीनियामध्ये ते काही काळ राहिले. माननीय अम्मार (र.) प्रेषित स्थलांतरपूर्वी एक महिन्यापूर्वी मदीनेस स्थलांतर केले. त्यांच्यासोबत आणखीन प्रेषितांचे पाच सोबती होते.

माननीय अम्मार (र.) यांनी आधी 'कुबा'कडे स्थलांतर केले. तेथे माननीय मुबश्शिर (र.) यांनी त्यांना आश्रय देऊन त्यांचा पाहुणचार केला होता. नंतर आदरणीय प्रेषितांनीसुद्धा 'कुबा'कडे स्थलांतर केले होते. त्यांनी तेथे 'मस्जिद-ए-कुबा'ची आधारशिला ठेवली. इतर सोबत्यांप्रमाणे माननीय अम्मार (र.) यांनीदेखील या कामात मन लावून भाग घेतला. काही दिवसांनंतर माननीय अम्मार (र.) प्रेषितांसोबत मदीनेस आले. प्रेषितांनी त्यांना कायमस्वरुपी तेथे राहण्याकरिता जागा सुद्धा प्रदान केली.

माननीय अम्मार (र.) हे इस्लामचे शूर शिपाई होते. आदरणीय प्रेषितांवर त्यांचे जीवापाड प्रेम होते. अगदी 'बदर'च्या युद्धापासून इस्लामचे अंतिम युद्ध म्हणजे 'तबूक'पर्यंत प्रत्येक युद्धात ते प्रेषितांबरोबर प्राण पणाला लावून लढले. आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) सुद्धा त्यांच्या कार्य, प्रामाणिकतेची अगदी मनापासून कदर करीत असत.

एका युद्धाच्या वेळी लष्करप्रमुख खालिद बिन वलीद (र.) आणि अम्मार बिन यासिर (र.) यांच्यात मतभेद झाले. प्रेषितदरबारी आल्यावरसुद्धा खालिद बिन वलीद (र.) यांनी अम्मार बिन यासिर (र.) यांना खूप ठणकावले. तेव्हा अम्मार बिन यासिर (र.) प्रेषितांना म्हणाले, "हा माणूस आपल्या उपस्थितीतसुद्धा मला दरडावून बोलत आहे." यावर आदरणीय प्रेषित खालिद बिन वलीद (र.) यांना उद्देशून म्हणाले, "हे खालिद (र.)! तोंड बंद करा! जो अम्मारकरिता वाईट शब्द बोलतो, तो जणू ईश्वराविरुद्ध वाईट शब्द बोलतो. जो अम्मार यांचा द्वेष करतो, तो जणू ईश्वराचा द्वेष करतो आणि जो अम्मार यांचा अपमान करतो, तो जणू ईश्वराचा अपमान करतो!" आदरणीय प्रेषितांचे हे शब्द ऐकून माननीय खालिद बिन वलीद (र.) खूप घाबरले. त्यांनी अम्मार (र.) यांची माफी मागितली. माननीय खालिद बिन वलीद (र.) म्हणतात की, "तो दिवस माझ्यासाठी खूप कठीण होता. मी प्रेषितांना विनंती केली की, मी अम्मारची माफी मागितली आणि त्यांनी मला मन:पूर्वक माफ केले. म्हणून आपण ईशदरबारी माझ्या मोक्षाची प्रार्थना करावी."

**(३)**

माननीय अबू बकर (र.) यांचा इस्लामी खलीफ़ा खूप आदर करीत असत. इस्लामचे दुसरे खलीफ़ा माननीय उमर फारुक़ (र.) यांचेदेखील ते खूप जवळचे मित्र होते. एकदा कुरैश कबिल्याचे काही प्रतिष्ठित लोक माननीय अबू सुफ़ियान (र.), माननीय हारिस (र.), माननीय सुहैल बिन अमरु (र.) हे माननीय उमर फारुक़ (र.) यांच्याकडे आलेले होते. एवढ्यात माननीय अम्मार (र.), माननीय बिलाल (र.) आणि माननीय सुहैब (र.) देखील माननीय उमर (र.) यांना भेटण्यासाठी आले, तेव्हा माननीय उमर फारुक़ (र.) यांनी प्रथम माननीय अम्मार (र.), बिलाल (र.) आणि सुहैब (र.) यांची भेट घेतली आणि मग माननीय अबू सुफ़ियान (र.) यांना भेटले. हिजरी सन २० मध्ये माननीय उमर फारुक़ (र.) यांनी माननीय अम्मार (र.) यांची

'कुफा'च्या राज्यपालपदी नेमणूक केली तेव्हा कुफावासीयांना उद्देशून 'आदेशपत्र' पाठविले,

"कुफावासियांनो ! मी तुमच्याकडे माननीय अम्मार (र.) यांना राज्यपालपदी पाठविले आणि माननीय इब्ने मसऊद (र.) यांना धर्मशिक्षक आणि मंत्रीपदी पाठविले आहे. हे दोघेजण आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांचे लाडके आणि बदरच्या युद्धात सहभागी होण्याचे सौभाग्य मिळविलेले ज्येष्ठ सोबती आहेत. त्यांच्या आदेशांचे पालन करावे. इब्ने मसऊद (र.) यांना मी तुमच्या भागाच्या आर्थिक प्रकरणांची जवाबदारी पण सोपविली आहे. उस्मान बिन हारिस (र.) यांना पूर्व इराक़चे भूमापन आणि महसुलाची जवाबदारी सोपविली आहे. माननीय अम्मार (र.) यांनी एक वर्ष, नऊ महिण्यांपर्यंत 'कुफ़ा'चे राज्यपालपद भूषविले.

(४)

माननीय अम्मार बिन यासिर (र.) यांचे राहणीमान अत्यंत साधे होते. संपूर्ण आयुष्यभर इस्लामची सेवा करण्यात गेले त्यामुळे त्यांना स्वत:चे घर बांधण्याचीसुद्धा सवड मिळाली नाही. ते राज्यपालपदी असतानासुद्धा त्यांच्या राहणीमानात काहीच बदल झाला नाही. ते स्वत:ची कामे स्वत:च करीत. बाजारात स्वत: जाऊन जीवनावश्यक वस्तूंची खरेदी करून स्वत:च्या पाठीवर घेऊन येत. घरातील सर्व कामकाज स्वत:च करीत. पोषाखसुद्धा खूप साधा वापरीत. एखाद्या ठिकाणी फाटल्यास स्वत:च्या हाताने त्यात ठिगळ लावीत. ते अतिशय सौम्य स्वभावाचे होते. धैर्य आणि संयम त्यांच्या स्वभावात होता. कलह आणि भांडणतंट्यापासून ते खूप दूर असत. बदरच्या युद्धात त्यांचा एक कान तुटला होता. एकदा एक टवाळखोराने त्यांना चिडविण्यासाठी आरोळी मारली, "ए कानकाप्या!" माननीय अम्मार (र.) यांनी त्याच्या खांद्यावर हात ठेवून अतिशय प्रेमपूर्वक स्वरात म्हटले,

"माझा हा कान इस्लामरक्षणार्थ कापण्यात आला व मला याचा अभिमान आहे!"

त्यांचे माननीय अली (र.) यांच्यावर खूप प्रेम होते. त्यांना कोणी वाईट म्हटलेले ते खपवून घेत नसत. सत्यवचन बोलण्यात ते कोणासमोरही घाबरत नसत. ते प्रत्येक काम ईश्वराच्या प्रसन्नतेखातर करीत असत. सत्यासाठी ते आजीवन लढ़ले.

# माननीय हस्सान बिन साबित अन्सारी (र.) - इस्लामी कवि

(१)

अरब समाजाचा आणि जगातील इतर राष्ट्रांचासुद्धा इस्लामपूर्व काळ हा अगदीच मार्गभ्रष्ट काळ होता. लिहिण्या-वाचण्याची कमतरता असलेल्या अरब समाजात मात्र कवनशास्त्र खूप प्रगत होते. अरब लोक अशिक्षित व असंस्कृत तर होतेच, परंतु अख्ख्या जगामध्ये कवनशास्त्रात त्यांचा कोणी स्पर्धक नव्हता. उच्च भाषाशैली आणि कविता त्यांच्या स्वभावातच होती. जणू अगदी लहानलहान मुलेसुद्धा कवनशास्त्रात तरबेज असत. एवढेच नव्हेतर गुलामांनासुद्धा कवनशास्त्रावर कमालींचे प्रभुत्व होते. त्या काळात मोठमोठी कविसंमेलने होत असत. या कविसंमेलनात दूरदूरचा प्रवास करून पुरुष व महिला मोठ्या संख्येत सहभागी होत असत. स्त्रियांसुद्धा कवनशास्त्रात खूप तरबेज होत्या. अरबांना आपल्या काव्यशक्तीचा एवढा अभिमान होता की, बिगर अरबांना ते 'अजमी' (अर्थात बोलता न येणारा) या नावाने संबोधत असत. तसे पाहता 'अरब' या शब्दाचाच अर्थ 'वक्तृत्व कलेत पारंगत असलेला' असा होतो. आणि त्यांच्या वक्तृत्व प्राविण्यामुळेच ते जगभर 'अरब' या नावाने प्रसिद्ध होते.

हे लोक आपल्या वक्तृत्वकलेने सर्वांनाच प्रभावित करीत असत. वैयक्तिक आवडीशिवाय हे लोक आपल्या वक्तृत्वकलेने आणि काव्याने राजकीय परिस्थिती आणि सामाजिक परिस्थिती बदलून टाकीत असत. अगदी युद्धाच्या वेळी योद्ध्यांना युद्धप्रेरणा देण्यासाठी सर्वांत जास्त प्रभावी माध्यम वक्तृत्वशास्त्रच होते. एखाद्याचा विरोध करण्यासाठीसुद्धा सर्वांत प्रभावी माध्यम कवनशास्त्रच होते. 'तलवारीपेक्षाही जास्त तीक्ष्ण असलेले प्रभावी हत्यार म्हणजे कवनशास्त्र', असेच त्या काळी समीकरण होते. कवनशास्त्राने त्या काळी मोठमोठे शूरवीर आणि योद्धे तयार केले. युद्धातील जय-पराजयाची पूर्ण परिस्थिती आणि सामाजिक व राजकीय परिस्थिती बदलून टाकण्याची अफाट शक्ती त्यांच्या कवनशास्त्रात होती.

अशा काळात आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांनी प्रेषित्वाची घोषणा करताच संपूर्ण अरबस्थान त्यांच्या विरोधात पेटून उठला. त्यांच्या विरोधात या समाजाने तलवार आणि भाल्यासह कवनशास्त्राच्या अतिप्रभावी हत्याराचासुद्धा भरपूर वापर केला. आदरणीय प्रेषितांनी मायभूमीचा त्याग केल्यावरसुद्धा हा विरोध

थंडावण्याचे नाव घेत नव्हता. इस्लामद्रोह्यांनी इस्लाम व प्रेषितांविरुद्ध कवितांचा पर्वत रचून संपूर्ण अरब जगतात आणि अरब समाजाच्या प्रत्येक व्यक्तीत इस्लामविरोधी प्रेरणात्मक चळवळ उभी केली होती. इस्लामविरोधी कविता काही दिवसांतच कित्येक मैल दूरवर आपला प्रभाव टाकत होत्या. इस्लामसमर्थकांना रात्रंदिवस अशा काव्यांचा सामना करणे भाग होते. या मानसिक त्रासातून मुक्ती प्राप्त करण्यासाठी प्रेषितसोबत्यांनी माननीय अली (र.) यांना विनंती केली की, "आपण इस्लामद्रोह्यांच्या इस्लामविरोधी काव्यांचे सडेतोड आणि प्रभावी उत्तर देणाऱ्या कविता रचाव्यात' माननीय अली (र.) यांनी यासाठी आदरणीय प्रेषितांची परवानगी घेण्याची अट घातली. प्रेषितसोबत्यांनी ही विनंती प्रेषितांना केली, तेव्हा प्रेषितांनी या कामाची जबाबदारी माननीय अली (र.) यांच्यावर टाकण्याऐवजी मदीना शहरातील मुस्लिमांची सभा बोलावून आवाहन केले,

"ज्या लोकांनी तलवारीने माझे समर्थन केले, त्यांच्यापैकी कोण आहे जो या इस्लामविरोधी काव्यास तोंड देऊन इस्लामचे समर्थन करील?" एवढ्यात एक अन्सारी सोबती उठून उभे राहून म्हणाले, "हे प्रेषिता ! मी यासाठी तयार आहे."

"तुम्ही त्यांच्या काव्याचा सामना कसा कराल? प्रेषितांनी विचारले,

"हे प्रेषित! मी आपले काव्य इस्लामचे समर्थन आणि इस्लामद्रोह्यांच्या विरोधात तयार करेन."

आदरणीय प्रेषितांनी त्यांना परवानगी दिली. इस्लामसमर्थक कविता रचणारे हे महान कविवर्य म्हणजेच - 'माननीय हस्सान बिन साबित अन्सारी (र.)' होत.

(२)

माननीय हस्सान बिन साबित (र.) यांनी इस्लामसमर्थनार्थ आपल्या सर्व काव्यशक्ती पणाला लावून संपूर्ण अरब जगतात इस्लामविरोधी काव्याचे सड़ेतोड़ उत्तर दिले आणि इस्लामची भरपूर सेवा केली. माननीय हस्सान बिन साबित (र.) हे 'ख़जरज़' परिवाराच्या 'नज्जार' या प्रतिष्ठित शाखेचे सुपुत्र होत. त्यांची वंश शृंखला अशी आहे.

'हस्सान' पिता साबित पिता मंझर पिता हराम पिता अमरु पिता झैद मनात पिता अदी पिता अमरु पिता मालिक पिता नज्जार पिता सआलबा पिता अमरू पिता खजरज." त्यांचे प्रसिद्ध टोपण नाव 'अबू वलीद' असे होते. परंतु त्यांना 'शायर-ए-

रसूल' अर्थात 'प्रेषितांचे कवि' या नावानेच जास्त संबोधण्यात येते. त्यांच्या मातेचे नाव 'फरिआ बिन्त खालिद' असे होते. त्या 'खजरज' परिवाराच्या 'साअदा' या शाखेच्या गर्भश्रीमंत असलेल्या 'माननीय साअद बिन उबादा (र.)' यांची पुतनी होत. त्यांनासुद्धा इस्लाम स्वीकृतीचे सौभाग्य लाभले होते.

माननीय हस्सान (र.) यांनी एका अशा परिवारात जन्म घेतला, जो पहिल्यापासूनच काव्यशास्त्रात अरब समाजात प्रसिद्ध आणि प्रतिष्ठित होता. काव्यशास्त्राची या परिवारात परंपरागत आवड होती. त्यांनी आपल्या प्राचीन वाडवडिलांचा हा वारसा मोठ्या कौशल्याने जपला होता. तसेच या परिवाराने अरबी भाषेतील काव्यशास्त्रात नवनवीन संशोधनसुद्धा केले. म्हणून हा परिवार संपूर्ण अरबजगतात नावाजलेला आणि प्रसिद्ध होता.

माननीय हस्सान (र.) यांनी काही दिवसातच इस्लामविरोधी काव्याचे सडेतोड उत्तर देऊन विरोधकांची तोंडे बंद केली. ते हिजरी सन पूर्व ६५ वर्षांपूर्वी जन्मले आणि वयाच्या पासष्ठाव्या वर्षी त्यांनी इस्लाम धर्म स्वीकारून आपल्या कवन कौशल्याच्या माध्यमाने इस्लामची अभूतपूर्व सेवा केली. इस्लाम स्वीकारण्यापूर्वीही ते अरब जगतात क्रमांक एकचे कवि होते आणि अरब जगातील प्रत्येक व्यक्तीचे ते पहिल्या पसंतीचे नावाजलेले आणि आवडते कवि होते.

इस्लाम स्वीकृतीपूर्वी त्यांचे दिवस-रात्र याच कार्यात व्यतीत होत असे. कबिल्याच्या आपसांतील लढायांमध्ये ते योद्ध्यांना प्रेरित करण्यासाठी आवेशपूर्ण कवन करून त्यांची थैर्यशक्ती वाढवीत असत. युद्धभावना भडकाविण्यासाठी त्यांच्या कविता खूप प्रसिद्ध होत्या.

(३)

इस्लामस्वीकृतीच्या वेळी ते वयोवृद्ध होते. परंतु इस्लाम स्वीकृतीमुळे त्यांच्या काव्यात तारुण्य व नवचैतन्य निर्माण झाले. तसेच त्यांच्या काव्यशैलीतसुद्धा कमालीचा बदल झाला होता. प्रेषितकाळामध्ये त्यांनी सर्वांत मोठे 'जिहाद बिल लिसान' अर्थात मौखिल धर्मयुद्ध केले. एकीकडे त्यांनी इस्लामद्रोही कविंची आपल्या काव्यशक्तीने सड़ेतोड़ उत्तर देऊन तोंडे बंद केली तर दुसरीकडे त्यांनी इस्लामसमर्थनार्थ आणि प्रेषितत्वाच्या समर्थनार्थ सुद्धा प्रभावी काव्यरचना केली. या काव्यामुळे इस्लामसमर्थक वर्गात नवचैतन्य निर्माण झाले.

माननीय हस्सान (र.) हे अतिशय हळव्या स्वभावाचे होते. म्हणून त्यांना युद्धात सहभागी होण्याची संधी मिळाली नाही. इब्ने यसीर (र.) या इतिहासकाराने लिहिले की, 'एहज़ाब' च्या युद्धामध्ये (हिजरीसन '५') माननीय हस्सान (र.) यांच्या बाबतीत एक अतिशय विचित्र घटना घडली. या युद्धात सर्व इस्लामद्रोही लोकांनी आणि 'ज्यू' लोकांनी संघटित होऊन मदीना शहरावर हल्ला चढविण्याचा निश्चय केला. या कटकारस्थानाची वार्ता प्रेषितांना मिळाली. त्यांनी मुस्लिमांना एका किल्ल्यात थांबविले. कारण या ठिकाणी मुस्लिमांचा लष्करी दस्ता उपलब्ध नव्हता. या किल्ल्यात माननीय हस्सानसुद्धा इतर आबालवृद्धांसमवेत होते. याच काळात एक 'ज्यू' किल्ल्याजवळ येऊन परिस्थितीचा आढावा घेऊ लागला. आदरणीय प्रेषितांच्या आत्या सन्माननीय सफ़िया बिन्त अब्दुल मुतल्लिब (र.) त्या 'ज्यू' माणसास पाहून हस्सान बिन साबित (र.) यांना म्हणाल्या, 'त्या 'ज्यू' ला जाऊन ठार करा.' परंतु माननीय हस्सान बिन साबित (र.) यांचे धैर्य झाले नाही आणि माननीय सफ़िया (र.) यांनी एक लाकडी दांडा त्या शत्रूच्या डोक्यात इतक्या जोरात मारला की तो जागीच कोसळला. आता माननीय सफ़िया (र.) म्हणाल्या, "आता तरी जाऊन त्याचे शीर धडा वेगळे करा !" परंतु माननीय हस्सान (र.) म्हणाले, "हे अब्दुल मुतल्लिबच्या कन्ये! त्याचे मुंडके कापण्याचे धैर्य माझ्यात नाही."

माननीय हस्सान बिन साबित (र.) यांचे बरेच कवितासंग्रह प्रकाशित झाले आहेत. शिवाय त्यांचे काव्यसंग्रह भारत, ट्यूनेशिया, ब्रिटेन आणि इतर देशांत प्रकाशित झाले असून बऱ्याच भाषांमध्ये त्यांचे भाषांतरसुद्धा झाले आहे.

# माननीय नोअमान बिन बशीर अन्सारी (र.)

## (१)

धर्मावरील प्रेम ईश्वराचे महान वरदान आहे. स्त्री असो की पुरुष, मूल असो की वृद्ध, ईश्वर ज्याला इच्छितो त्याला हे वरदान देतो. प्रेषितत्वाच्या अंतिम काळात मदीनावासीयांनी एका निरागस मुलामध्ये धर्मश्रद्धा आणि प्रेषितप्रेमाचा एक विचित्र स्वभाव अनुभवला. हा मुलगा नेहमी प्रेषितदरबारी हजर राहात असून मोठ्या तल्लीनतेने आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांची वचने ऐकत असे. आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) भाषणासनावर विराजमान होत असत, तेव्हा हा मुलगा त्यांच्या जवळ जाऊन त्यांचे भाषण अगदी तन्मयतेने ऐकत असे. प्रत्येक बोल तो स्मरणात ठेवीत असे. तो प्रेषितांबरोबर नमाज़ अदा करीत असे आणि रमजान महिन्यात रात्रीच्या वेळी जागून प्रेषिताबरोबर ईशोपासना करीत असे. प्रेषितांचेही त्याच्यावर प्रेम होते. एकदा प्रेषितांच्या सेवेत 'ताईफ़' शहरातून द्राक्षे पाठविण्यात आली. हा मुलगादेखील तेथे हजर होता. प्रेषितांनी त्यास द्राक्षांचे दोन झुबके देऊन सांगितले की, "एक तुझ्यासाठी व एक तुझ्या आईसाठी. घरी जाऊन एक झुबका आईस दे ." त्याने स्वत:स दिलेला एक झुबका रस्त्यातच खाल्ला. त्यास तो खूप गोड लागल्याने त्याने आईस दिलेला दुसरा झुबका देखील खाऊन घेतला. शेवटी तो लहान मुलगाच होता. त्याने आपल्या आईस या बाबतीत काही सांगितले देखील नाही. काही दिवसांनी प्रेषितांनी त्यास विचारले, "हे मुला ! आईस द्राक्षाचा झुबका दिलास का ?" "नाही ! हे प्रेषिता (स.)! मी दिला नाही. दोन्ही झुबके मी स्वत:च खाल्ले." प्रेषितांच्या उपदेशाने तो मुलगा सत्यवचनी झाला होता. त्याचे हे उत्तर ऐकून प्रेषितांच्या चेहऱ्यावर स्मित हास्य उमटले. त्यांनी त्याचा कान धरून लाडिकपणे म्हणाले, "लबाड कुठला !"

हा मुलगा ज्याचा आदरणीय प्रेषित अत्यंत लाड पुरवीत असत. तोच मुलगा.. माननीय नोअमान बिन बशीर (र.) होय.

## (२)

माननीय नोअमान बिन बशीर (र.) हे 'खज़रज़' परिवाराच्या 'हारिस' शाखेचे सुपुत्र होत. त्यांची वंशशृंखला अशी आहे,

"नोअमान पिता बशीर पिता साअद पिता सआलबा पिता खलास पिता ज़ैद पिता मालिक पिता अगर पिता सआलबा पिता कआब पिता खज़रज पिता हारिस पिता खजरजुल अकबर.

बदरच्या युद्धाच्या तीन महिन्यांपूर्वी हिजरी सन '२' मध्ये माननीय नोअमान बिन बशीर (र.) यांचा जन्म झाला. त्यांनी एक इस्लामप्रिय परिवारात जन्म घेतला.

बालपणापासूनच त्यांचे शिक्षण-प्रशिक्षण इस्लामी वातावरणात झाले. त्यांचे पिता माननीय बशीर बिन साअद अन्सारी यांनी प्रेषितांच्या अगदी प्रारंभीच्या प्रतिकूल काळात इस्लामचा स्वीकार केला होता. तसेच ते आदरणीय प्रेषितांचे खूप जवळचे श्रद्धाळू आणि सोबती होते. ते बदर, ओहद, एहज़ाब आणि इतर सर्वच युद्धांत आदरणीय प्रेषितांसोबत शत्रूंशी लढले. आदरणीय प्रेषितांच्या स्वर्गवासानंतर इस्लामी शासनाची धुरा सांभाळण्यासाठी अन्सारी सोबत्यांच्या एका मोठ्या वर्गाची भूमिका होती की, इस्लामी शासनाची धुरा 'माननीय साअद बिन उबादा अन्सारी (र.)' यांना सोपविण्यात यावी. परंतु माननीय बशीर बिन साअद (र.) यांनी मुहाजिरीन सोबत्यांचे समर्थन केले आणि सर्व अन्सार सोबत्यांनी माननीय अबू बकर (र.) यांना इस्लामी शासक नेमले.

माननीय नोअमान बिन बशीर (र.) यांच्या माता सन्माननीय 'उमरा (र.)' या माननीय अब्दुल्लाह बिन खाहा (र.) यांची बहीण होती. त्यांचे पुत्र नोअमान (र.) वर अपार प्रेम होते. एकदा त्यांनी एक विशिष्ट संपत्ती नोअमान (र.) यांच्या नावे करण्यासाठी आपले पती बशीर (र.) यांचे मन वळविले आणि यासाठी आदरणीय प्रेषितांची साक्ष घेण्यासाठीदेखील तयार केले. माननीय बशीर (र.) हे आपल्या चिमुकल्या नोअमान (र.) यांना प्रेषितांसमोर हजर करून म्हणाले, "हे प्रेषिता ! मी आपली अमुक अमुक संपत्ती आपल्या साक्षीने या मुलाच्या नावे करीत आहे!" प्रेषितांनी विचारले, "तुम्ही याच्या इतर भावंडांनादेखील या संपत्तीचा वाटा दिला काय ?"

"नाही दिला, हे प्रेषिता !" बशीर (र.) उत्तरले. "तर मग हा अन्याय होईल आणि मी अन्यायाची साक्ष देऊ शकत नाही ! हे बशीर! ईश्वराच्या नाराजीचे भय बाळगा. त्याला अन्याय मुळीच पसंत नाही!!" प्रेषितांनी सांगितले. प्रेषितांचा आदेश ऐकून माननीय बशीर (र.) यांनी घरी येऊन आपल्या पत्नीस वृत्तांत सांगितला आणि त्यांच्या पत्नीनेसुद्धा प्रेषितांच्या आदेशावर मान झुकविली.

माननीय नोअमान बिन बशीर (र.) यांनी खूप कमी वयात प्रेषितांची असंख्य वचने मुखपाठ केली होती. ते आठ वर्षे आणि सात महिन्याचे असतानाच आदरणीय प्रेषितांनी परलोकमार्गी कूच केले.

## (३)

माननीय नोअमान बिन बशीर (र.) लहानपणापासूनच प्रेषितांच्या सोबत असल्याने त्यांच्या नीतिमत्तेत खूप पावित्र्य होते. त्यांच्यात धैर्य, संयम, मृदु स्वभाव आणि दानशूरता यासारखे असंख्य गुणधर्म आढळतात. त्यांच्या जीवनाचा एक अतिशय मोठा भाग तंटे-बखेड्यांत व्यतीत झाला, तरी देखील त्यांनी शक्य होईल तेवढे रक्तपातापासून स्वत:स अलिप्त ठेवण्याचा प्रयत्न केला. अतिशय नाजूक आणि गंभीर परिस्थितीतही स्वत:स नियंत्रणात ठेवले.

त्यांच्या दानशूरतेबाबत एक विचित्र घटना इतिहासात आढळते. ते 'हमस' शहराचे राज्यपाल असताना 'प्रसिद्ध कवि एअशा हमदानी' त्यांच्याकडे आले आणि म्हणाले, ''मी 'यज़ीद' बादशाहकडे गेलो आणि त्याला मदतीची विनंती केली. परंतु त्याने मला रिकाम्या हाती परत केले. नंतर मी आपल्याकडे खूप आशा व आकांक्षेने आलो आहे. माझ्यावर कर्जाचे प्रचंड ओझे असून मला आर्थिक मदतीची खूप गरज आहे.'' माननीय नोअमान (र.) यांनी त्यास सांगितले की, ''तुम्हाला देण्यासारखी रक्कम सध्या माझ्याजवळ नाही.'' 'एअशा हमदानी' त्यांचे उत्तर ऐकून फार निराश झाले. माननीय नोअमान (र.) यांचे हृदयदेखील त्यांची ही केविलवाणी परिस्थिती पाहून पाझरले. त्यांनी जनतेस हाक देऊन सांगितले, ''एअशा हमदानी यांना आज आर्थिक मदतीची खूप गरज आहे. म्हणून त्यांची मदत करावी.'' माननीय नोअमान यांच्या या आवाहनामुळे लोकांनी आपसात वर्गणी करून वीस हजार दिरहमची रक्कम जमा करून त्यांना दिली.

(४)

माननीय नोअमान बिन बशीर (र.) हे अतिशय उच्च कोटीचे ज्ञानी व विद्‌वान होते. आदरणीय प्रेषितांच्या काळात वयाने लहान असूनही आपल्या प्रचंड स्मरणशक्तीमुळे त्यांना प्रेषितांची प्रत्येक शिकवण, कार्यप्रणाली, जीवनशैली आणि नीतिमत्तेचे नियम अवगत झाले होते. आदरणीय प्रेषितांनी जगाचा निरोप घेतल्यानंतर त्यांनी सन्माननीय आयशा (र.) आणि माननीय उमर (र.) यांच्याकडून धर्मज्ञानाचे प्रशिक्षण घेतले. त्यांनी आदरणीय प्रेषितांचे एकूण १२२ वचने कथन केली. त्यांच्या शिष्यवृंदामध्ये इमाम शैबी, सिमाक बिन हरब, अबुइसहाक़, सालिम बिन अबू जाअद, उरवा बिन ज़ुबैर, अबू क़लाबा, उबैदुल्लाह, हबीब बिन सालिम, अब्दुल मलिक बिन और यासारखे तज्ज्ञ होत.

माननीय नोअमान (र.) यांनी विविध ठिकाणी राज्यपालपदाच्या जबाबदाऱ्या पार पाडल्या. म्हणून त्यांनी अनेक स्वरुपाच्या प्रकरणांचे निर्णय दिल्याने त्यांचा अनुभव तगडा होता. प्रकरणे हताळताना आणि निर्णय देताना दिव्य कुरआन आणि प्रेषित जीवनचरित्राच्या आधारावर निर्णय देण्यात ते तरबेज होते. शिवाय त्यांची वक्तृत्वशैलीसुद्धा खूप आकर्षक होती. भाषण देताना ते प्रेषितवचनांचे अचूक संदर्भ सादर करीत असत. आपल्या कानांकडे बोट दर्शवून म्हणत की, ''मी आदरणीय प्रेषितांकडून या कानांनी ऐकले.''

त्यांचे लिखाणशास्त्र माहितीचा खजिना असे. त्यांना भाषाशास्त्र आणि साहित्यात विशेष रस होता. साहित्य आणि कवनशास्त्राच्या नियमांचे काटेकोर पालन करून त्यांनी बरेच साहित्य आणि कविता रचल्या.

माननीय नोअमान बिन बशीर (र.) यांनी आदरणीय प्रेषितांची जी वचने कथन केली आहेत, त्यापैकी काही वचने या ठिकाणी सादर करीत आहोत.

१) नमाज पढण्यासाठी करण्यात आलेल्या रांगा सरळ ठेवा अन्यथा ईश्वर तुमच्यात मतभेद निर्माण करील.

२) तुम्ही श्रद्धावंतांना आपसात दया करणे, प्रेम करणे आणि कृपा व उपकार करण्याच्या बाबतीत अशा स्वरुपात पाहाल जसे शरीराच्या एका अवयवास त्रास अथवा क्षती पोहोचल्यास शरीराचे इतर अवयवदेखील ज्वराने फणफणतात.

३) जे वैध आणि धर्मसंमत आहे, ते अगदीच स्पष्ट आहे. तसेच जे अवैध आणि धर्मविरोधी आहे, तेदेखील अगदीच स्पष्ट आहे. या दोन्हींच्या दरम्यान केवळ काही बाबीच अस्पष्ट आहेत. बऱ्याच जणांना याचे ज्ञान नाही. अर्थात जो माणूस एखाद्या बाबीच्या संशयास्पद अथवा अस्पष्ट परिस्थितीतही स्वत:स त्यापासून दूर ठेवील, तोच आपला धर्म आणि आपली इभ्रत सुरक्षित ठेवू शकेल आणि पवित्र व डागरहित असेल. तसेच जो माणूस संशयास्पद अथवा अस्पष्ट बाबीत गुरफटून जाईल, तो अवैध आणि धर्मविरोधी बाबींच्या गर्तेत बुडून जाईल. खबरदार ! मानवी शरीरात एक मांसाचा गोळा आहे. तो ठीक राहिल्यास संपूर्ण शरीर सुदृढ असेल आणि तोच बिघडला तर संपूर्ण शरीर बिघडेल. तो मासाचा गोळा म्हणजेच तुझे हृदय होय !

४) ''प्रार्थना हीच उपासना आहे.'' असे म्हणून आदरणीय प्रेषितांनी दिव्य कुरआनची ही आयत पठन केली, ''तुमच्या पालनकर्त्याचा आदेश आहे की, माझ्याकडे प्रार्थना करा व मागणी करा. मी (निश्चितच तुमची मागणी) पूर्ण करीन आणि तुम्ही मागितलेली बाब तुम्हास प्रदान करीन. जे लोक माझ्या उपासनेस गर्विष्ठपणाने पाठ दाखवतील त्यांना अपमानित होऊन नरकाग्नीत जावे लागेल.''

(५)

माननीय नोअमान बिन बशीर (र.) यांनी हिजरी सन ६४ मध्ये माननीय अब्दुल्लाह बिन जुबैर (र.) यांचे इस्लामी शासन स्वीकारले. अब्दुल्लाह बिन जुबैर (र.) यांनी त्यांना 'हमस' च्या राज्यपालपदी नेमले आणि 'सीरिया' व इतर भागाच्या राज्यपालपदी 'ज़हाक़ बिन क़ैस' यांची नेमणूक केली. तिकडे मलिक बिन मरवान या जुलमी शासकाने 'ज़हाक़ बिन क़ैस' यांच्यावर आक्रमक स्वारी केली. माननीय नोअमान (र.) यांनी 'ज़हाक़ बिन कैस' यांच्या मदतीसाठी कुमक पाठविली. दोन्ही लष्करात घनघोर युद्ध झाले. या युद्धात इस्लामशासित लष्करास पराभव पत्करावा लागला. माननीय 'ज़हाक़ बिन क़ैस' यांच्या पराभवानंतर अब्दुल मलिकच्या लष्कराने माननीय नोअमान (र.) यांना एकटे गाठून ठार करून त्यांचे शीर त्यांच्या पत्नीला दिले. अशा प्रकारे माननीय नोअमान बिन बशीर अन्सारी (र.) यांनी आपल्या जीवनाचा प्रत्येक क्षण इस्लामच्या सेवेत अर्पण केला आणि शेवटी आपले प्राणसुद्धा ईश्वरीय धर्मावर बलिदान केले. ही घटना हिजरी सन ६५ मध्ये घडली. या वेळी त्यांचे वय ६४ वर्षांचे होते. त्यांच्या पश्चात तीन मुले आणि एक पत्नी असा परिवार होता.

**समाप्त**